इशकृपाही केवलं.

# विंचूरकर घराण्याचा

Vimcūrakara gharāṇyācā

# इतिहास.

itihāsa

Gadgil, Hari Raghunath

हा ग्रंथ

अनेक जुने लेख, कागदपत्र, दाखले

आणि कांहीं इंग्रजी ग्रंथ

यांच्या आधारानें

## हरी रघुनाथ गाडगीळ

निसबत विंचूरचे चीफ

यांनीं तयार करून


पुणें येथें

"पुणेंवैभव" छापखान्यांत छापविला.

—o—

आगस्ट सन १८८३ इसवी.

# समर्पणपत्र-

श्रीमंत राजमान्य राजश्री रघुनाथराव विठ्ठल उर्फ अंणासाहेब विंचूरकर, उमदेतुलमुल्क बाहादूर, कंपानियन ऑफ धि मोस्ट एक्झालटेड ऑर्डर ऑफ धि स्टार ऑफ इन्डिया, विंचूर संस्थानचे मालिक. स्वामींचे सेवेशी.

कृतानेक साष्टांग नमस्कार विनंतीविशेष. मी मोठ्या परिश्रमानें अनेक पुस्तकें व आपले दफ्तरांतील कित्येक कागदपत्र व दाखले यांचे आधारानें आपले थोर व नामांकित घराण्याचा इतिहास जमवून त्यांत आपले संस्थानचे मुळ संपादक विठ्ठल शिवदेव यांजपासून आपल्यांपर्यंत प्रत्येक पिढींत ज्या पुरुषास सरदारी प्राप्त झाली त्या पुरुषाचे कारकिर्दितील पृथक वृत्तांत दाखल केला आहे. हा इतिहास तयार झाल्यापर ह्याची लोकांत प्रसिद्धी करण्यास्तव मी आपली परवानगी मागीतली. ती देण्याची आपण मेहेरबानगी केल्यानें मी आपला फार आभारी झालों आहें.

विशेष सौजन्यता, मनाचा थोरपणा, विद्वत्ता, देशपर्यटणापासून—प्राप्तझालेली माहितगारी, परोपकारबुद्धी, क्षमाशिळता, राजनिष्टा वगैरे अनेक सद्गुणांचा संग्रह आपले ठिकाणीं प्रकाशीत आहे, त्यामुळें माझे अंतकर्णांत आपल्यांविषयीं मान्यताबुद्धी बहुत दिवसांपासून वस्तीकरून आहे. त्याचें सार्थक मानून मी हा ग्रंथ आपल्यांस परमादरानें नजर करीत आहें. याचा आपण स्विकार करावा अशी आपल्यांस माझी अंतःकर्ण पूर्वक प्रार्थना आहे. बहुतकाय लिहिणें; सेवेशी श्रुत होयः हि विज्ञापना.

पुणें. तारीख १ माहे आगस्ट सन १८८३ इसवी.

आपले पदरचा
हरी रघुनाथ गाडगीळ,
इंग्रजी व मराठी कारकून.

# प्रस्तावना.

---

अति प्राचीन कालापासून या भरतखंडास " आर्यावर्त " अशी संज्ञा असून यांत मुख्यत्वेंकरून उंच वर्णाचे लोकांत संस्कृत भाषा चालू होती व हे लोक सुशिक्षित, विद्वान, ज्ञानसंपन्न व पराक्रमीं असे असून यांत नानाप्रकारचे प्रतापी योध्धे, प्रख्यात ग्रंथकार व कवी असे होऊन गेले. त्या ग्रंथकारांपैकींच पाणिनी, अमरसिंह व कालिदास हे होत. पाणिनी यानें जें व्याकर्णशास्त्र केलें ते अद्यापी अपूर्व व अप्रतीम आहे. अमरसिंह याचे ग्रंथांपैकीं अमरकोश अद्यापी कायम असून तो संस्कृत अभ्यास करण्याचे कामीं पुष्कळ उपयोगीं पडतो. कालिदास यानें ज्या कविता, काव्यें, नाटकें वगैरे ग्रंथ केले ते सर्वमान्य असून संस्कृत विद्यार्थ्यांस त्यांपासून संस्कृत भाषेचें चांगलें परिज्ञान होतें.

जरी त्याकालीं हा देश स्वसत्ताक्रांत असून मोठा बलाढ्य होता, तरी ह्यांत पुढें अनेक घालमेली झाल्या, त्यामुळें हा दुर्बल होऊन याची स्थिति अगदीं निकृष्ट झाली. त्यासंबंधीं हकीकत पुढं थोडक्यांत लिहितों.

सुमारें २५०० वर्षांपूर्वीं या देशांत गया येथें बुध नांवाचा एक शास्त्रवेत्ता महापुरुष उत्पन्न झाला. त्यानें आपले विद्वत्तेचे जोरानें संपूर्ण ब्रह्मवृंदास जिंकून, अहिंसाधर्म चालू केला. त्यामुळें मुळचा वेदप्रणीतआर्यधर्म माजीपडून उत्तरोत्तर नष्टझाल्या सारिखा झाला. त्याचवेळेस बौध्यधर्मानुयायी राजे यांनीं आर्यधर्माचे वेत्ते ब्राह्मण यांचा अत्यंत छल करून त्यांचे पुस्तकांचा नाश केला. त्यामुळें त्यांस वस्तींतून निघून अरंण्यांत दरींकंदरीं राहणें भाग पडलें. हा नवीन दयाधर्म सुमारें ६०० वर्षे चालला. या कालाचे शेवटीं यवन जातीचा सिकंदर नामक बादशाहा पश्चिमेकडून मुलुक काबीज करीत येत असून तो भरतखंडावर स्वारी करणार अशी खबर या देशांतील चंद्रगुप्त नांवाचा आर्य बादशाहा ( माहाराजाधिराज ) याजकडे आल्यावरून त्यानें व त्याचे ताब्यांतील अनेक

क्षत्रिय राजे यांनीं अहिंसाधर्म सोडून देऊन आपले पूर्वजांचा जो वेदप्रणीतधर्म तो पुनः स्विकारिला, कारण, बौध्यधर्मांत हिंसा-करण्याची ह्मणजे कोणताही जीव मारण्याची मनाई केलेली असून आर्यधर्मांत लढाईंत तरवार करून मरूनजाणें हें मोठ्या पुरुषार्थाचे कृत्य धरिलेलें होतें. अणखी, निकरानेंबिकट लढाई करून जय मिळविल्या शिवाय उद्भवलेल्या परचक्राचें निवारण होण्याचा संभव मुळींच नव्हता.

त्याआलीकडे ह्मणजे सुमारे १९०० वर्षांपूर्वी या देशावर प्रथम हूण लोक व मागाहून पार्शी लोकांचा राजा यांनीं सरासरी १००–१२५ वर्षांचे अंतरानें निर्निराळ्या स्वाऱ्याकरून पुष्कळ नासधूस केली; परंतु क्षत्रिय लोकांचे भीतीमुळें त्यांस स्वदेशास परतजाणें भागपडलें. त्याआलीकडे ह्मणजे सुमारें ८०० वर्षांपूर्वी मुसलमान लोकांनीं तर ती गोष्ट शिखरासच नेऊन पोंहोंचविली, कारण, त्यांनीं या देशांत अंमल करून आपली बादशाहत स्थापन केली; आणि लक्षावधी हिंदू * लोक कत्तलकरून हजारों मनुष्यें जबरीनें बाटविलीं; आणि त्यांची कित्येक मोठ मोठालीं शहरें लुटून तीं जमीनदोस्त करून टाकिलीं; आणि शेंकडो देवालयें व मूर्ती फोडून, त्या देवालयांचे ठिकाणावर मसूजीदी स्थापन केल्या. त्याचप्रमाणें हिंदूंची जीं हजारों पुस्तकें त्यांचे हातीं लागलीं त्यांचाही त्यानीं नाश केला. त्यामुळें हिंदुस्थानांतील प्राचीन विद्या व कलाकौशल्यें यांवरील अमोलिक ग्रंथ व इतिहास नष्ट होऊन प्राचीन सुधारणूकेचा मागमोस सुद्धां राहिला नाहीं. इतकीं अनुचित कृत्यें केल्यावर देखील त्या लोकांनीं स्वस्थपणें राज्य केलें असें नाहीं. हिंदू लोकांवर इतका जुलूम चालविला

---

* भरतखंडावर मुसलमान लोकांची पहिली स्वारी होण्यापूर्वी भरतखंडवासी लोकांस, " आर्य " असी संज्ञा होती; परंतु मुसलमान लोक त्यांस " हिंदू " व भरतखंडास " हिंदुस्तान " असें ह्मणूं लागले, कारण, जे मुसलमान लोक प्रथम भरतखंडावर हल्ला करण्यास आले त्यांचा वर्ण गोरा होता व आर्य लोक हे त्यांजपेक्षां काळे होते; आणखी, आर्बी भाषेत " हिंदू " या शद्बाचा अर्थ काळा व " हिंदुस्तान " या शद्बाचा अर्थ काळेलोकांचादेश असा होतो. कालेंकरून फारशी शद्ब " स्तान " हा बदलून त्याचे ऐवजीं हिंदूलोकहे संस्कृत शद्ब " स्थान " याचा उपयोग करूं लागले.

कीं, ते अत्यंत त्रस्त होऊन त्यांचे मुखांनीं “ त्राही भगवान त्राही भगवान! ” असे उद्गार सर्वकाळ निघूं लागले. याप्रमाणें हिंदू लोकांची स्थिति झाल्यानें त्यांचे पुढील संतत्तीस सुशिक्षा न मिळून ती उत्तरोत्तर अज्ञानांधःकारांत बुडाली. मुसलमानलोकांचें राज्य या देशांत सुमारें ६०० वर्षं चालल्यामुळें प्राचीनकाळीं जें हिंदुस्थान विद्वत्ता व ज्ञानसंपत्ती यांचे मुख्य अगर होतें त्याचे स्वरूप अगदीं बदलून त्याची स्थिती प्राचीनकाळीं कशी होती याची सुद्धां माहिती बुडाली.

परंतु ईश्वरेच्छेनें आलिकडे सुमारें २५० वर्षें झालीं असतील, मराठे लोकांचा उदय होऊन, दक्षिणेत शिवाजी भोसले, बाजीराव बल्लाळपेशवे व त्यांचे चिरंजीव रघुनाथराव पेशवे, मल्हाररावहोळकर विठ्ठलशिवदेव,माहादजीशिंदे, वगैरे कित्येक पराक्रमी वीर उत्पन्न झाले. त्यांनीं तरवार गाजवून मुसलमान लोकांचे प्राबल्य मोडून टाकिलें, आणि आर्यधर्माचें रक्षण करून प्राचीन विद्यावृद्धीस उत्तेजन दिलें. त्यामुळें ब्राह्मणजातीमध्यें संस्कृत भाषेच्या ग्रंथांचा आभ्यास वाढून काशी वगैरे क्षेत्रें व पुणें वगैरे शहरें यांत हजारों वैदिक, शास्त्री, जोतिषी, पुराणीक वगैरे तयार झाले व अणखी ही पुष्कळ विद्वान तयार झाले असते; परंतु यादेशांत मराठे लोकांचे वर्चस्व व राज्य चीरकाळ चालावें अशी परमेश्वराची इच्छा नव्हती सें दिसतें. त्याचें कारण पुढें लिहितों.

दक्षिणेंत मराठ्यांचा उदय होण्याचे सुमारास इंग्लंड देशांतून व्यापारी लोकांची एक कंपनी ( मंडळी ) हिंदुस्थानांत येऊन तिनें दिल्ली येथील मोघल बादशाहाचे परवानगीनें सूरत, मुंबई, मद्रास, कलकत्ता, वगैरे ठिकाणीं विलायती मालाच्या कोठ्या बांधून व्यापार चालविला होता. हिंदुस्थानांतील राजे यांचे आपसांतील कलहामुळें उत्तरोत्तर त्या व्यापारी लोकांस राज्यकारस्थानांत शिरण्यास सवड झाल्यावरून त्यांनीं प्रथम बंगाल सुभ्याचा नबाब यास पदच्युत केलें, आणि त्याचे गादीवर आपले तर्फेचा नवा नबाब बसवून त्याचे रक्षणाकरितां पुष्कळ कवायती फौज ठेविली. त्या संधीस दिल्लीचे बादशाहाची सत्ता अगदीं कमी झाली असल्यामुळें बंगालचे नबाबास पदच्युत केल्याबद्दल परदेशी व्यापारी

मंडळीचे पारिपत्य करण्याचें सामर्थ्य त्याचें आंगी राहिलें नव्हतें. त्या कारणानें त्याकंपनीची सत्ता दिवसानदिवस अधिक वाढून त्या लोकानीं कर्नाटकांत टिपू सुलतान याचें राज्य बुडविलें आणि मागाहून पुणें येथील पेशव्यांचें राज्य ही नष्ट करूनटाकिलें. तेणेंकरून उत्तरोत्तर संपूर्ण हिंदुस्थानांत त्यांचें प्राबल्य होऊन तेथें ते सार्वभौम राज्य करूंलागले. ते लोक जरी आचारसंपन्न नव्हते तरी त्यांचे अंगी कित्येक सद्गुण होते. त्यां पैकीं विद्या व कलाकौसल्यें यांस उत्तेजन देणे, ज्ञानाचा प्रसार करून आपली प्रजा सुशिक्षित करणें, इनसाफ्‌करणें आणि व्यवहारांतील सर्व गोष्टी निर्बंधानें चालविणें, या मुख्य गोष्टी होत्या. दक्षिणेंत स्थीरस्थावर झाल्यावर त्या लोकांनीं जागोजाग शाळा स्थापून आपले रयतेस विद्यादान करण्याचा क्रम सुरू केल्यामुळें उत्तरोत्तर विद्येचा फैलाव होऊन हाल्लीं या देशांत पुष्कळ लोक विद्वान झाले आहेत. त्यांनीं जगाचे प्राचीन व आर्वाचीन इतिहास, निर्निराळे योध्ये व विद्वान पुरूष यांची चरित्रें, राजेरजवाडे यांच्या घराण्यांचे इतिहास वगैरे नानाप्रकारचे ग्रंथ छापून प्रसिद्ध केले आहेत. ते वाचिल्यानें मनास आवंद वाटते। इतकेंच नाहीं, तर, व्यवहारांत सुद्धां वाचणाराची अक्कल वाढत्ये.

खालींसहीकरणारा हा बहुत वर्षें विंचूरचे चीफ यांचे पदरीं आहे. त्याजकडे त्या चिफांचे इंग्रजी पत्रव्यवहाराचें काम आहे. त्या कामाचें संबंधानें त्यास विंचूर संस्थानचे दफ्तरांत पेशवाई व इंग्रजी अमलांतील मराठी कागदपत्र पाहाण्याचा पुष्कळ वेळा प्रसंग येतो. त्यावरून पेशवाई अमलांत विंचूर येथील दौलतीचे मुळसंपादक विठल शिवदेव यांनीं शिंदे, होळकर व इतर प्रख्यात सरदार यांच्याच प्रमाणें तरवार गाजवून दाक्षिणेंत व उत्तर हिंदुस्थानांत मोठी कीर्ती संपादन केली होती असें त्यास पक्कें माहीत झालें आहे.

आलिकडे नूतन विद्वान लोकांनीं पुष्कळ मराठी ग्रंथ छापून प्रसिद्ध केले आहेत असें वरलिहिलेंच आहे. त्यांपैकीं कित्येक चरित्रें खालींसहीकरणाराचे वाचण्यांत आलींआहेत; परंतु त्यांत विंचूर येथील दौलतीचे मूळसंपादक यांचे चरित्र किंवा

त्यांचे घराण्याचा इतिहास त्यास कोठें ही आढळला नाहीं. सबब इतर चरित्रें व इतिहास याचप्रमाणें त्यांचे चरित्र किंवा त्यांचे घराण्याचा इतिहास छापून लोकांत प्रसिद्ध करणें अवश्य आहे असें त्यास वाटल्यावरून त्यानें त्या कार्याकरितां दाखले वगैरे सामोग्रीची जमवाजमव चालविली. त्याजजवळ ग्रांटडफ साहेबांनीं पुर्वी मराठ्यांचा इंग्रजी इतिहास केला त्याची छापील प्रत होतीच. शिवाय, त्यानें हिंदुस्थानचा इंग्रजी इतिहास, मराठीबखरा, वगैरे बरेंच सामान पैदा केलें; परंतु तेवढ्याच सामोग्रीनें आपण योजीलेलें चरित्र किंवा समग्र इतिहास आपल्यास उत्तमप्रकारें तयार करितां येईल असें त्यास वाटलें नाहीं. सबब त्यानें आपले मालिक श्रीमंत राजमान्य राजश्री अंणासाहेब विंचूरकर यांस आपला हेतु कळवून विंचूरसंस्थानचे दफ्तरांतील कागदपत्राची मदत देण्याची मेहेरवानगी करण्याविषयीं त्यांस विनंती केली. ती विनंती विंचूरकरमौसूफ यांनीं मान्यकरून त्यास लागतील ते कागपपत्र आपले दफ्तरांतून घेण्याची उदारमनानें परवानगी दिली. त्यावरून त्यानें त्यांच्या दफ्तरांत तपास चालविला. तेव्हां त्यास त्या घराण्याची एक जुनी बखर, पेशजी त्यांनीं [ विंचूरचे चिफ यांनीं ] इंग्रज सरकारांत आपलेघराण्यासंबंधी जी एक कैफियत गुजराविली होती तिची नक्कल, विठ्ठलशिवदेव यांस पेशव्यांकडून सफरेत गेलेलीं पत्रें, यादी, व जमाखर्चाचे कागद, येणेंप्रमाणें दाखले मिळाले. शिवाय, त्यानें त्या संस्थानांतील पुरातन माहितगार लोकांकडून तोंडची माहिती ही मिळविली. नंतर त्यानें त्या सर्व दाखल्यांचे व माहितीचे आधारानें विंचूरकर यांचे घराण्याचा इतिहास लिहिण्यास आरंभ केला, आणि सरासरी दीडवर्षपर्यंत मेहेनत केल्यावर इश्वरकृपेनें हाल्लीं तो इतिहास तयार झाला आहे.

या इतिहासाची भाषा व लिहिण्याची पद्धत कारकूनी म्हणजे दरबारी असल्यामुळें नूतन अभ्यासी यांस यांतील कितीएक शद्ब समजणार नाहींत असें संभवतें. याकारितां ज्या टिकाणीं खालीं सहीकरणारास असें शद्ब समयविशेषीं घालणे उचीत वाटलें त्या ठिकाणीं त्यानें टीप करून त्या टिपेंत किंवा कौंस करून

त्या कौंसांत त्या शद्बांचें अर्थ लिहिले आहेत व त्याखेरीज त्यानें या ग्रंथास दरबारी शद्बांचा एक लाहानसा कोश जोडून त्यांत असे शद्ब अर्थां सुद्धां विल्हेवारीनें लिहिले आहेत. हा इतिहास वाचीत असतां वांचणारांस एकादे शद्बाचा अर्थ समजलानाहीं तर त्यांनीं तो शद्ब त्या कोशांत पाहावा, म्हणजे त्याचा अर्थ त्यांस तेथें कळून येईल.

आलिकडे नवीन मराठी ग्रंथ पुष्कळ होत असून मराठी वर्तमानपत्रें ही पुष्कळ चालू झालीं आहेत. त्यांत मराठी शद्बांचीं अक्षरें लिहिण्याची पद्धत पडली आहे ती प्रथम एकाचें लिहिलेलें पाहून त्याप्रमाणें दुसऱ्यानें ल्याहावें अशा प्रकारची आहे. याचीं उदाहरणे अशीं कीं पठाणलोकांचे देशास "आफघानस्तान" असें नांव आहे. त्या लोकांचे भाषेत "ण" हें अक्षर मुळींच नाहीं. असेंअसतां, हाल्लीं त्या शद्बाचे ऐवजीं नवीन मराठी ग्रंथांत व वर्तमानपत्रांत "आफगाणिस्थान" असा शद्ब आढळतो. या अपभ्रंशाचें कारण असें दिसतें कीं प्रथम कोणी आफगाणिस्थान असें चुकून लिहिलें असेल व तें पाहून दुसऱ्यानें व तिसऱ्यानें तसेंच लिहिलें असेल, कांकी, दुसऱ्यांचे पाहून लिहिण्याची आपले लोकांस संवयच आहे. याचप्रमाणें फारसी भाषेंत "वकूफ" म्हणजे ज्ञान किंवा अक्कल असा शद्ब आहे. त्यापासून "बेवकूफ" म्हणजे अज्ञान किंवा मूर्ख असा शद्ब झालेला आहे. परंतु "बेवकूफ" असें न लिहितां लोक हाल्लीं त्याचे ऐवजीं "बेकूब" असें बोलूं व लिहूं लागले आहेत. सारांश, मुळशद्बांची माहिती करून न घेता केवळ दुसऱ्याचे तोंडानें ऐकून त्या अजमासानें लोक कांहीं तरी बोलतात व लिहितात अशी उदाहरणें शेंकडों आहेत; परंतु स्थलसंकोचास्तव वर दोनच दाखविलीं आहेत.

खालींसहीकरणारानें थोडा फारसीचा अभ्यास केला असून त्याचा लखनौ शहरात कित्येक विद्वान व दरबारी फारसीनवीसां बरोबर सहवास झाला आहे. त्यायोगानें मराठी भाषेंत येणाऱ्या बहुतेक फारसी शद्बांचा चांगला शोधकरून ते शब्द शुद्धरीतीनें लिहिण्यास तो समर्थ झाला आहे. त्यानें हाल्लीं तयार केलेले विंचूरकर

घराण्याचे इतिहासांत जे दरबारी शब्द घातले आहेत ते चांगले माहितीनें घातले आहेत. त्यांविषयीं वाचणारांस कांहीं शंका येतील तर त्यांनीं त्यास विचारावें. ह्मणजे तो यथाशक्ती त्यांचे समाधान करील.

खालींसहीकरणारा हा केवळ एक इंग्रजी रायटर व मराठी कारकून आहे नवीन ग्रंथ रचण्याचा हा त्यास प्रथमच प्रसंग आहे सदर्हू इतिहास जरी त्यानें आपले मत्तें बिनचूक तयार केला आहे, तरी यात कदांचित अशुद्धें, वैगुण्यें, व दोष असतीलच, कारण, ज्याचे दोष त्यास कळून येत नांहींत, व चुकतनाहीं असा जगांत सर्वज्ञ परमेश्वरा शिवाय दुसरा कोणीच नाही. याकरितां सूज्ञ वाचकांस त्याची विनयकपूर्वक अशी प्रार्थना आहे कीं यांत कांहीं अशुद्धें, वैगुण्यें, अगर दोष आढळतील तर त्यांनीं त्यांबद्दल त्यास थोरमनानें क्षमा करावी.

हरी रघुनाथ गाडगीळ.



# अनुक्रमणिका.

## भाग १

## विठ्ठल शिवदेव विंचूरकर यांचे चरित्र.

### प्रकरण १.

विषयक्रम.


पृष्ट.

१ विठ्ठल शिवदेव यांचा मुळचा वृत्तांत. .... ....१

प्रकरण २.

२ दाउदखाना बरोबर लढाई, त्याचा मोड व कत्तल. ....९
३ नृसिंहपूर येथील श्रीनृसिंहाचे देवालयाचा जिर्णोद्धार...१०
४ दयाबाहादर याजबरोबर लढाई, त्याचा मोड व कत्तल...११
५ गढे मंडळावरील स्वांरी. .... .... ....११
६ फर्खाबादचा नबाब फतेखान बंगष याजवर हल्ला व त्याचा मोड. .... .... .... ....११
७ वसईचे किल्ल्याचा वेढा व त्यांत अंमल. .... ....१२
८ नासिरजंगाबरोबर लढाई व तह. .... ....१५

प्रकरण ३.

९ नागपूरचे रघोजी भोसल्यावर हल्ला व त्याचा मोड.....१७
१० नंदाजी दरेकर याची कत्तल व पेशव्यांचा विंचूर गांवांत अंमल. .... .... .... ....१८
११ शाहूमाहाराजांचा मृत्यू व पेशव्यांचे स्वतंत्र राज्याची स्थापना. .... .... .... ....१९
१२ राघोबादादांची गुजराथेंतील स्वांरी. .... ....२०
१३ अहमदाबाद शहर व किल्ला यांचे सर होणें. ....२१
१४ राघोबादादायांची उत्तर हिंदुस्थानांतील स्वांरी, कुभेरीच्या किल्ल्याचा वेढा व भरतपूरचे जाट राजाचा मोड. .... .... .... .... ....२२

१५ ग्वाल्हेरचे किल्ल्याचा वेढा व त्याचें सर होणें. ....२३
१६ सावनुरावरील स्वारी व तेथील नबाबाचा मोड. ....२९

प्रकरण ४.

१७ राघोबादादांची उत्तर हिंदुस्थानांतील दुसरी स्वारी. ....३२
१८ दिल्लीचे बादशाहाचा वजीर मीरशाबुद्दिन याजकडून त्यांस बोलावणें.,.... .... .... ....३४
१९ नजीबउद्दौला रोहिलासरदार यास दिल्लीहून काढून देण्याचें कामगिरीवर विठ्ठलशिवदेव यांची योजना व तेथून त्यासरदाराचे पलायन. .... ....३४
२० सदहू कामगिरी बजाविल्याबद्दल विठ्ठलशिवदेव यांस बादशाहाकडून बक्षिसी. .... .... ....३४
२१ राघोबादादांची पंजाबावरील स्वारी व त्या प्रदेशांत त्यांचा अंमल. .... .... .... ....३५
२२ माहाराष्ट्र देशाची त्याकालची स्थिती. .... ....३६

प्रकरण ५.

२३ पानिपतची लढाई, मराठ्यांचा मोड व त्याचा परिणाम.... .... .... .... ....३९
२४ बाळाजीबाजीराव पेशवे यांचा मृत्यू. .... ....४९

प्रकरण ६.

२५ माधवराव बल्लाळ यांस पेशवाईचीं वस्त्रें..... ....५०
२६ उत्तरहिंदुस्थानांतील मुलकांचा बंदोबस्त करण्याचे कामावर विठ्ठलशिवदेव यांची योजना. .... ....५०
२७ राघोबादादा व माधवराव पेशवे यांचा बेबनाव. ....५३
२८ विठ्ठलशिवदेव यांचें पुण्यास परत येणें. .... ....५४
२९ त्यांस कैद करण्याचा बेत. .... .... ....५४
३० विठ्ठलराव यांचें वाफगावास निघून जाणें.... ....५४
३१ राघोबादादांचे विंचुरास निघून जाणें. .... ....५४
३२ विंचूर येथें राघोबा दादांची पुण्यावर स्वारी करण्याची तयारी. .... .... .... ....५५

३३ रावोबादादा व सरदार लोक यां मध्यें कराराची यादी....५६
३४ त्यांचे मदतीस निजामांकडून मुरादखान नांवाचा सरदार आला. .... .... .... ....५९
३९ रावोबादादांचा पुण्यावर कूच.... .... ....५९
४० राघोबादादा व माधवराव यांची लढाई व माधवराव यांचा मोड. .... .... .... ....५९
४१ पटवर्धन वगैरे सरदार नाखुष होऊन हैदराबादेस निघून गेले. .... .... .... ....६०
४२ राघोबादादानीं मिरजेचा किल्ला घेऊन त्यांत लूट केली....६१
४३ राघोबादादांच्या अनुचित वर्तनामुळे रामचंद्रराव जाधव वगैरे सरदार नाखुष होऊन निजामांकडे मिळाले....६१
४४ निजामांची पुण्यावर चढाई. .... .... ....६२
४५ राघोबादादांनी हैदराबादेवर जाऊन त्याचे कोटा बाहेरचे वस्तिपासून खंडणी घेतली.... .... ....६३
४६ निजामांनी पुणें शहरांचा कांहीं भाग लुटिला, कांहीं जाळून टाकिला व कित्येक लोकांपासून पैसा घेतला....६४
४७ निजामांचा औरंगाबादेकडे कूच. .... ....६४
४८ राघोबादाहा व माधवराव यांचा समेट..... ....६५
४९ पटवर्धन वगैरे सरदार पेशव्यांकडे परत आले. ६५
५० जानोजी भोसलें यांस राघोबादादांनीं आपलेंसें करून घेतलें..... .... .... .... .....६५
५१ विठ्ठल सुंदर बाजरोवर राक्षस भुवनाजवळ लढाई व रावोबादादांचा मोड. .... .... ....६६
५२ माधवराव पेशवे यांजकडून फौजेची उटावणी, विठ्ठल सुंदर याची कत्तल व मोंवल फौजेचा मोड व दुर्दशा.६७
५३ निजामांचा पाठलाग व मोड..... .... ....६८
५४ निजामांचा पेशवे यांजबरोबर तह. .... ....६९
५५ माधवराव पेशवे यांजकडून मराठे सरदारांस नक्त नेमणुकांचे ऐवजीं मुलकांच्या पृथक सनदा.... ....७०
५६ विठल शिवदेव यांचा गोट लुटण्याविषयीं माधवराव

पेशवे यांचा बेत व तो बेत रद्दीतकरण्याविषयीं मल्हा-
रराव होळकर यांचा त्यांस बुद्धिवाद...... ....७१
५७ हैदरअली वरील स्वारी...... .... ....७४
५८ विठ्ठल शिवदेव यांचा विशेष पराक्रम..... ....७७
५९ हैदरअलीचा मोड व त्याचा पेशव्यावरोबर तह. ७८

## प्रकरण ७.

६० माधवराव पेशवे यांची नागपुरावर चढाई.... ....७९
६१ राघोबादादांची उत्तर हिंदुस्थानांतील स्वारी. ....८०
६२ गोहदचा वेढा.... .... .... ....८०
६३ मल्हाराव होळकर यांचा मृत्यू. .... ....८३
६४ गोहदचे राण्याबरोबर तह.... .... ....८४
६५ मरहूम् होळकरांचे नातू मालोजी होळकर यांस स-
रदारीचीं वस्त्रें..... .... .... ....८४
६३ दादासाहेबांचें दक्षिणेस परतयेणें. .... ....८४
६६ विठ्ठल शिवदेव यांची बेरामी व मृत्यू. ८६
६८ विठ्ठल शिवदेव यांचे कुटुंबाचे माणसांची हकीकत....८६
६९ त्यांचे पदरचे लोक व त्यांचे दौलतीची व्यवस्था. ....८८
७० त्यांची धर्म कृत्यें. .... .... ....९४

---

## भाग २.

## शिवाजी विठ्ठल विंचूरकर यांचे चरित्र.

७१ वडिलांचे मरणाने झालेल्या दुःखाबद्दल शिवाजी विठ्ठल
यांचें पेशवे यांजकडून समाधान. .... ....१०
७२ गणेश कृष्ण बिनीवाले, शिवाजी विठ्ठल, वगैरे सरदार
यांची उत्तर हिंदुस्थानांत रवानगी. .... ....१०
७३ त्यांची रोहिल खंडावरील चढाई व त्या प्रदेशाची
धुळधाणी. १०
७४ माधवराव पेशवे यांचा अकाल मृत्यू व त्यांचे बंधू

नारायणराव बल्लाळ यांस पेशवाईचीं वस्त्रें. ....१०४
७५ नारायणराव पेशवे यांचा खून. .... ....१०४
७६ माधवराव नारायण यांचे नांवानें राज्यकारभार चालू झाला. .... .... .... ....१०४
७७ माहादजी शिंदे यांची जयपुरावरील स्वारी व त्यांचा मोड. .... .... .... ....१०५
७८ शिवाजी विठ्ठल यांजकडून जयपूरचे केशरिया लोकांवर हल्ला, त्या लोकांचा मोड व जयपूरचे दरवाजा पर्यंत त्यांची कत्तल. .... .... ....१०७।८
७९ गुलामकादर नांवाच्या रोहिले सरदारावर माहादजी शिंदे यांची स्वारी, व त्या सरदादाराचा वध. ....१०९
८० आलम्गीर बादशाहाची तख्तावर पुनः स्थापना व त्याचा दगाबाज व फितुरी पुत्र बेदरबख्त याचावध. १०९
८१ शिंदे यांस व त्यांचे मार्फत पेशवे यांस खिताब वगैरेची देदेनगी व शिवाजी विठ्ठल यांचे वडीलांस मिळालेल्या खिताबाचें कायम होणें. .... ....११०
८२ पेशवे यांचे हुकुमावरून ग्वाल्हेरचा किल्ला व त्या खालचा मुलुक शिवाजी विठ्ठल यांजकडून निघून शिंद्यांचे ताब्यांत गेला. .... .... ....११०
८३ शिवाजी विठ्ठल यांचे लष्कराची मथुरा येथे छावणी झाली. .... .... .... ....११०
८४ शिवाजी विठ्ठल यांचे दक्षिणेस परत येणे व मृत्यू. ....११२
८५ त्यांचे कुटुंबाचे मनुष्यांची हकीकत व त्यांची धर्मकृत्ये..११२

## खंडेराव विठ्ठल विंचूरकर यांचे चरित्र.

८६ खंडेराव विठ्ठल यांस सरदारीची वस्त्रें..... ....१२०
८७ पेशवे व निजाम यांमध्यें बेवनाव. .... ....१२१
८८ खर्ड्याची लढाई. .... .... ....१२३
८९ निजामाचा मोड व त्यांचा पेशव्या बरोबर तह. १२४
९० खंडेराव विठ्ठल यांचा मृत्यू. .... ....१२७

## नरसिंह खंडेराव विंचूरकर यांचे चरित्र.


९१ नरसिंह खंडेराव यांस सरदारीचीं वस्त्रें.... ....१३०
९२ त्यांस शिक्षण..... .... .... ....१३१
९३ सवाईमाधवराव यांचा आकाल मृत्यू. .... ....१३२
९४ बाजीराव रघुनाथ यांस पेशवाईची वस्त्रें.. ....१३३
९५ तुकोजी होळकर यांचा मृत्यू व त्यांचे पुत्र विठूजी यांस देहांत शिक्षेचा ठराव. .... ....१३५
९६ विठुजी होळकर यांचे जीवाचे रक्षणाकरितां नरसिंह खंडेराव यांची पेशव्यांजवळ रदबदली. ....१३
९७ विठूजी होळकर यांचा अघोर मृत्यू. .... ....१३
९८ आपले प्रीयबंधूस जीवे मारविल्याबद्दल दौलतराव शिंदे यांचा सूड घेण्यासाठीं यशवंतराव होळकर यांची तयारी..... .... ... ....१३
९९ होळकर व शिंदे यांचे युद्ध.. .... ....१३
१०० होळकर यांची पुण्यावर चढाई. .... ....१३
१०१ धोंडोपंत गडबोले यांचा मोड. .... ....१४
१०२ अहमदखानाचा मोड व मृत्यू. .... ....१४
१०३ फणशे यांजकडून विंचूरकर यांचे विंचूर येथील वाड्याचा आगीने नाश. .... .... ....१४
१०४ फौजेनिशीं नरसिंह खंडेराव यांचें पुण्यास पोंहोंचणें. १४
१०९ यशवंतराव होळकर व पेशवे यांची पुण्यानजीक मोठीलढाई. .... .... .... ....१४
११० पेशव्यांकडील एकत्र जमलेल्या फौजेचा मोड. ....१४
१११ बाजीराव पेशवे यांचें पुणे सोडून निघून जाणें. ....१४
११२ नरसिंह खंडेराव यांस इंग्रजी फौजेचे मदतीने होळकर यांचे परीपत्य कर्ण्यास्तव पुण्यास जाण्याविषयीं- पेशव्यांचा हुकूम. .... .... ....१
११३ चतुरसिंग भोसले याचा मोड. .... ....१
११४ मिरजयेथे नरसिंहराव व वेलेस्ली साहेब यांची भेट व उभयसरदारांचा पुण्याकडे कूच. .... ....१

११५ यशवंतराव होळकर नुकतेंच पुणेशहर लुटून तेथून निघूनगेले होते. .... .... ....१५३
११६ बाजीराव पेशवे यांचा इंग्रजांबरोबर वसई येथे तह जाल्यावर त्यांचे पुण्यास परत येणे, व होळकरांचे पाठलागार्थ वेलेस्ली साहेबांची रवानगी. ....१५३
११७ खानदेशांतील पेंढारी लोकांचे दंगे मोडण्याचे कामीं कर्नल वालेस साहेबांस मदत करण्यास्तव नरसिंहराव यांची रवानगी. .... .... ....१५३
११८ खानदेशांतील पेंढारी व इतर दंगेवाले यांचें पारिपत्य व त्या प्रांताची आबादी. .... .... ....१५४
११९ नरसिंहराव यांचा अकालमृत्यू.. .... ....१५५
१२० त्यांचे मानीस्वभावासंबंधी गोष्टी. .... ....१५८

## विठ्ठलराव नरसिंह विंचूरकर यांचे चरित्र.

१२१ नरसिंह खंडेराव यांचे स्त्रीचे मांडीवर दत्तक देवविण्याविषयीं विंचूरचे कारभारी यांचा उद्योग. ....१६०
१२२ विठ्ठलराव यांचे दत्तविधान..... .... ....१६३
१२३ पेंढारी लोकांचा बंदोबस्तकरण्याचे कामीं कर्नल वालेस साहेबांस मदतकरण्यास्तव विठ्ठलराव नरसिंह यांची नेमणूक व त्यांचा कूच. .... ....१६७
१२४ दादेखान नांवाचा पेंढारी सरदार पकडलाजाऊन त्याची पुण्यास रवानगी. .... .... ....१६८
१२५ शूर्पकर्ण नांवाचे बंडवाल्याचा वध व विठ्ठलराव यांस शाबासकी. .... .... .... ....१६८
१२६ पेंढाऱ्यांचा दंगा मोडण्याचे कामांत इंग्रजकामदारांस चांगली मदत केल्याबद्दल विठ्ठलराव यांची वाहवा. १७०
१२७ गंगथडीतील भिल्ल लोकांचा बंदोबस्त केल्याबद्दल विठ्ठलराव यांस पेशव्यांकडून बक्षिसी..... ....१७१

१२८ शिंद्यांचे कामदार व दतियावाले राजे यांनीं विठ्ठलरावांचे उत्तर हिंदुस्थानांतील मुलुक बळकाविले होते ते त्यांस परत मिळाले.... .... ....१७२
१२९ पेंढारी लोकांनीं पुनः केलेला दंगा मोडण्याचे कामीं जनरल स्मिथ साहेबांस मदत कर्ण्यास्तव विठ्ठलराव यांचा कूच. .... .... .... ....१७३
१३० भिल्ल, रामोशी, कैकाडी वगैरे हलक्या जातीचे लोकांचे दंग्याचा बंदोबस्त. .... .... ....१७५
१३१ आपले उत्तर हिंदुस्थानांतील मुलकांबद्दल आपणास इंग्रज सरकारांकडून जाहागीरीची सनद मिळावी ह्मणून विठ्ठलरावांचा उद्योग.... .... ....१७६
१३२ बाजीरावपेशवे व इंग्रज लोक यांचे युद्ध.... ....१७६
१३३ बाजीराव पेशवे यांचें पुण्याहून निघूनजाणें. ....१८०
१३४ इंग्रज लोकांचा पुणेंशहरांत अंमल. .... ....१८१
१३५ कोरेगांव येथील लढाई. .... .... ....१८१
१३६ आष्टें येथील लढाई व बापूगोखले यांचा मृत्यू....१८२।८३
१३७ आदम साहेबांकडून बाजीराव पेशवे यांचामोड.....१८३
१३८ इंग्रज सरकाराबरोबर ठराव कर्ण्याविषयीं बाजीराव यांचा उद्योग..... .... .... ....१८४
१३९ माल्कम् साहेबांकडून आलेल्या ठरावाचेयादींतील शर्ती.... .... .... .... ....१८६
१४० बाजीरावपेशवे मालकम् साहेबांचे स्वाधीन झाले. ....१८८
१४१ बाजीराव यांची ब्रह्मावर्तास रवानगी.... ....१८८
१४२ बाजीराव यांजबरोबरचा लवाजमा. .... ....१८८
१४३ बाजीराव यांजबरोबर जे सरदार गेले त्यांच्या तैनाती.१९०
१४४ त्यांजबरोबरचे लोकांस इंग्रज सरकाराकडून पेनशनें मिळूं लागलीं त्यांच्या पृथक रकमा. ....१९०।९१
१४५ विठ्ठलराव विंचूरकर यांस जातीचीजाहागीर चालविण्याबद्दल मालकम् साहेबांचे वचन.... ....१९३
१४६ बाजीराव यांजबरोबर जे सरदार नर्मदेपर्यंत गेले होते त्यांचे स्थितीचा विचार. .... ....१९

१४७ विठ्ठलराव विंचूरकर यांचे स्थितीचा विचार. ....१९५
१४८ विठ्ठलराव हे विंचूरास परत आले व त्यांचे वाडे व जंगम मिळकत यांवरील जप्त्या उठल्या. ....१९५
१४९ एलफिन्स्टन्साहेबांकडून विठ्ठलराव यांची खातर.....१९६
१५० मालकम्साहेबांकडून एलफिन्स्टन्साहेबांस आलेलीं पत्रें.१९७
१५१ एलफिन्स्टन्साहेबांचे सरंजामपटाचा उतारा. ....२०३
१५२ एलफिन्स्टन्साहेबांकडून विठ्ठलराव यांची वडिलार्जित देण्याचे पेचांतून मुक्तता. .... .... ....२०७
१५३ विठ्ठलराव यांस दोन कुरणें बक्षिस मिळालीं. ....२०७
१५४ त्यांस दोन गांव ताहयात मिळाले. .... ....२०९
१५५ आपलीं उत्तर हिंदुस्थानांतील वडिलोपार्जित इनामें परत मिळण्यास्तव एलफिस्स्टन्साहेब गव्हरनर यांचे मार्फत गव्हरगर जनरल यांस विठ्ठलरावांचा अर्ज व त्यांस नामंजुरिचा जबाब. .... .... ....२१०
१५६ जनरल स्मिथ बांचा दाखला... .... ....२१४
१५७ सदर्हू इनामें सुटण्याबद्दल मालकम् साहेब गव्हरनर यांचे मार्फत विठ्ठलराव यांजकडून गव्हरनर जनरल यांस दुसरा अर्ज व त्यांस नाकबुलीचा जबाब. ....२१८
१५८ विठ्ठलराव यांजकडून ग्वाल्हेरचे शिंदे व रेसिडेंट यांजकडे वकिलांची रवानगी.... .... ....२१९
१५९ विठ्ठलराव यांचा मृत्यू. .... .... ....२२०
१६० त्यांचे कुटुंबाचे माणसांची हकीकत. .... ....२२१
१६१ त्यांचीं धर्मकृत्यें.... .... .... ....२२२
१६२ लोकांबरोबर त्यांचा स्नेहसंबंध होता त्याविषयीं गोष्टी.२२४

---

## भाग ३.

### रघुनाथराव विठ्ठल विंचुरकर यांचा वृत्तांत.

#### प्रकरण १

१६३ रघुनाराव यांचा जन्म. .... .... ....२२७
१६४ त्यांचे मातुश्रीचा देहांत. .... .... ....२२७

१६५ त्यांचे नांव पहिल्या प्रतिच्या सरदारांचे पटांत दाखल झालें. .... .... .... ....२२८
१६६ त्यांचे मौंजीबंधन व लग्न. .... .... ....२२८
१६७ त्यांचे वडिलांचा देहांत. .... .... ....२२८
१६८ वडिलांचें मरणानें त्यांस झालेल्या दुःखाबद्दल त्यांचें सरकाराकडून सांत्वन. .... .... ....२२८
१६९ त्यांचे नांवानें वडिलार्जित मिळकती चालविण्याबद्दल सरकारचा ठराव.... .... .... ....२२९
१७० त्यांचे पुरातन कारभारी हेच त्यांचे संस्थानचे कारभारावर कायम झाले.... .... ....२३१
१७१ त्यांचा विद्याभ्यास. .... .... ....२३२
१७२ त्यांचे दुःखदायक स्थितीचीं कारणें. .... ....२३३
१७३ त्यांनीं आपली सर्व स्थिती एजेंटसाहेबांस कळविली. २३६
१७४ विंचूर संस्थानचे कारभारावर ढमढेरे यांची योजना....२३७
१७५ त्यांचे सापत्न बंधू व मातुश्री यांचे गुजाऱ्या बद्दल सरकारचा ठराव. .... .... ....२३७
१७६ बंधूंशीं समेट होण्याबद्दल त्यांचा यत्न व त्याचे साफल्य .... .... .... ....२३९।४०
१७७ ढमढेरे कारभारी यांजकडून सरकारास रिपोर्ट. ....२४१
१७८ रघुनाथराव यांस मुखत्यारी मिळाली... ....२४२
१७९ सन १८४२ इसवीचे रुल. ( कानू ). .... ....२४३
१८० रघुनाथराव यांनीं आपले सरंजामाबद्दल पुरावा हाजिर केला. .... .... ....२४५
१८१ पाटिंजर साहेबांची गोष्ट. .... .... ....२४५
१८२ रघुनाथराव यांचें उत्तर हिंदुस्थानचे यात्रेस प्रयाण व परत येणें. .... .... ....२४८।४९
१८३ त्यांचे बंधू कृष्णराव यांची सदरअमिनीचे कामावर योजना. .... .... .... ....२४९
१८४ त्यांचे बंधू माधवराव यांजकडे त्यांचे संस्थानचे कारभाराची सोंप. .... .... ....२५०

१८४ रघुनाथराव यांनीं कागदपत्र मिळविण्याचे कामांत इनाम कमिटीस मदत केल्याबद्दल त्यांजवर सरकारची खुषमर्जी. .... .... ....२५२
१८६ त्यांजकडे कोंपरगांव येथील देवाचे संस्थान व नानजगांव यांच्या वाहिवाटी सरकारानें दिल्या. ....२५२
१८७ विंचूरचे कोर्टांत इनसाफाचें काम उत्तमप्रकारें चालत असल्याबद्दल व रघुनाथराव यांनीं विद्यावृद्धीस उत्तेजन दिल्याबद्दल सरकारची खुषमर्जी. ....२५३
१८८ वार्षिक दरबारांत स्वतः हाजीर होण्याची रघुनाथराव यांस माफी. .... .... ....२५४
१८९ उत्तर हिंस्थानांत पळटणी शिपाई लोकांचा दंगा....२५४
१९० अशा प्रसंगीं सरकार फर्मावितील ती नौकरी बजाविण्यास आपण सिद्ध असण्याविषयीं रघुनाथराव याजकडून सरकारास विनंती व त्याबद्दल सरकारची खुषमर्जी. .... .... .... ....२५५
१९१ भिल वगैरे बंडवाले लोकांचें बंड मोडण्याचे कामांत रघुनाथराव यांनीं सरकारचे कामगारांस मदत केल्याबद्दल सरकारची खुषमर्जी. .... ....२५६
१९२ मलिकामाआझमा यांचे सरकारचा जाहिरनामा. ....२५८
१९३ रघुनाथराव यांचे कनिष्ट बंधू माधवराव यांची कायदे कौन्सिलांत नेमणूक... .... ....२५९
१९४ माधवराव यांची वतन कमिशनरचे हुद्यावर नेमणूक..२६०
१९५ माधवराव यांची कायदे कौन्सिलांत पुनःनेमणूक..२६१
१९६ माधवराव यांचें नांव सरकारानें पहिल्या प्रतीचे सरदारांचे पटांत घातलें. .... .... ....२६२
१९७ माधवराव यांची अक्कलकोटचे संस्थानावर नेमणूक....२६४
१९८ गव्हरनर सर बार्टल फ्रीयर यांचा पुणें येथें वडा दरबार.२६४
१९९ गव्हरनरमोसूफ यांस तसबीर नजर कण्यास्तव दरबार.२६८
२०० लवादमार्फत स्थावर मिळकतीच्या बधूंमध्यें वांटण्या.२७१

२०१ माधवराव यांजकडून अक्कलकोट येथील कामाचा राजीनामा...... .... .... ....२७२
२०२ राजधर्माचें पुस्तक. .... .... ....२७२
२०३ रघुनाथराव व भाऊ शिंदे यांच्या परस्पर मेजवान्या.२७३
२०४ ड्युक ऑफ इंडिबरो यांचे मुंबईस आगमन. २७५
२०५ रघुनाथराव याची सापत्न मातुश्री लक्ष्मीबाईसाहेब यांचा मृत्यू.... .... .... ....२७७
२०६ लार्ड नार्थब्रूक यांचें मुंबईस आगमन व त्यांचा मनमाड येथें सत्कार.... .... .... ....२८०
२०७ माहाराज तुकोजीराव होळकर यांचा मनमाड येथें सत्कार व त्यांस विंचूर येथें मेजवानी..... ....२८१
२०८ युवराज प्रिन्स आफ वेल्स यांचे हिंदुस्थानांत आगमन.२८४
२०९ दक्षिणेंत व दाक्षिणहिंदुस्थानांत भयंकर दुष्काळ. ...२८७
२१० मलिका माआझमा यांनीं " केसरेहिंद " अशी पदवी धारण केल्याबद्दल दिल्ली येथे बादशाही बडा दरबार.... .... .... ....२८२
२११ कृष्णरावबापूसाहेब यांचा मृत्यू. .... ....२९८
२१२ होळकर माहाराज यांचें विंचूर येथें पुनरागमन. ....२९३
२१३ रघुनाथराव यांची पत्नी श्रीमंत सौभाग्यावती जानकीबाईसाहेब यांचा मृत्यू व रघुनाथराव यांचे मन प्रपंचातून ऊठणें .... .... ....२९५
२१४ रघुनाथराव यांचें मन प्रपंचांतून उठण्यास दुसरें विशेष कारण.... .... .... ....२९६
२१५ या ग्रंथाचे शेवटीं ग्रंथकर्त्याच्या चार ओळी. ....३०५

# प्रस्तावना.

---

अति प्राचीन कालापासून या भरतखंडास " आर्यावर्त " अशी संज्ञा असून यांत मुख्यत्वेंकरून उंच वर्णाचे लोकांत संस्कृत भाषा चालू होती व हे लोक सुशिक्षित, विद्वान, ज्ञानसंपन्न व पराक्रमीं असे असून यांत नानाप्रकारचे प्रतापी योध्धे, प्रख्यात ग्रंथकार व कवी असे होऊन गेले. त्या ग्रंथकारांपैकींच पाणिनी, अमरसिंह व कालिदास हे होत. पाणिनी यानें जें व्याकर्णशास्त्र केलें ते अद्यापी अपूर्व व अप्रतीम आहे. अमरसिंह याचे ग्रंथांपैकीं अमरकोश अद्यापी कायम असून तो संस्कृत अभ्यास करण्याचे कामीं पुष्कळ उपयोगीं पडतो. कालिदास यानें ज्या कविता, काव्यें, नाटकें वगैरे ग्रंथ केले ते सर्वमान्य असून संस्कृत विद्यार्थ्यांस त्यांपासून संस्कृत भाषेचें चांगलें परिज्ञान होतें.

जरी त्याकालीं हा देश स्वसत्ताक्रांत असून मोठा बलाढ्य होता, तरी ह्यांत पुढें अनेक घालमेली झाल्या, त्यामुळें हा दुर्बल होऊन याची स्थिति अगदीं निकृष्ट झाली. त्यासंबंध्धीं हकीकत पुढें थोडक्यांत लिहितों.

सुमारें २५०० वर्षांपूर्वीं या देशांत गया येथें बुध नांवाचा एक शास्त्रवेत्ता महापुरुष उत्पन्न झाला. त्यानें आपले विद्वत्तेचे जोरानें संपूर्ण ब्रह्मवृंदास जिंकून, अहिंसाधर्म चालू केला. त्यामुळें मुळचा वेदप्रणीतआर्यधर्म मागेपडून उत्तरोत्तर नष्टझाल्या सारिखा झाला. त्याचवेळेस बौध्यधर्मानुयायी राजे यांनीं आर्यधर्माचे वेत्ते ब्राह्मण यांचा अत्यंत छल करून त्यांचे पुस्तकांचा नाश केला. त्यामुळें त्यांस वस्तींतून निघून अरंण्यांत दरींकंदरीं राहणें भाग पडलें. हा नवीन दयाधर्म सुमारें १०० वर्षें चालला. या कालाचे शेवटीं यवन जातीचा सिकंदर नामक बादशाहा पश्चिमेकडून मुलुक काबीज करीत येत असून तो भरतखंडावर स्वारी करणार अशी खबर या देशांतील चंद्रगुप्त नांवाचा आर्य बादशाहा ( माहाराजाधिराज ) याजकडे आल्यावरून त्यानें व त्याचे ताब्यांतील अनेक

क्षत्रिय राजे यांनीं अहिंसाधर्म सोडून देऊन आपले पूर्वजांचा जो वेदप्रणीतधर्म तो पुनः स्विकारिला, कारण, बौध्यधर्मांत हिंसा-करण्याची ह्मणजे कोणताही जीव मारण्याची मनाई केलेली असून आर्यधर्मांत लढाईंत तरवार करून मरूनजाणें हें मोठ्या पुरुषा-र्थाचे कृत्य धरिलेलें होतें. अणखी, निकरानेंबिकट लढाई करून जय मिळविल्या शिवाय उद्भवलेल्या परचक्राचें निवारण होण्याचा संभव मुळींच नव्हता.

त्याआलीकडे ह्मणजे सुमारे १९०० वर्षांपूर्वीं या देशावर प्रथम हूण लोक व मागाहून पार्शी लोकांचा राजा यांनीं सरासरी १००–१२५ वर्षांचे अंतरानें निर्निराळ्या स्वाऱ्याकरून पुष्कळ नासधूस केली; परंतु क्षत्रिय लोकांचे भीतीमुळें त्यांस स्वदेशास परतजाणें भागपडलें. त्याआलीकडे ह्मणजे सुमारें ८०० वर्षांपूर्वीं मुसलमान लोकांनीं तर ती गोष्ट शिखरासच नेऊन पोंहों-चविली, कारण, त्यांनीं या देशांत अंमल करून आपली बादशा-हत स्थापन केली; आणि लक्षावधी हिंदू * लोक कत्तलकरून हजारों मनुष्यें जबरीनें बाटविलीं; आणि त्यांची कित्येक मोठ मोठालीं शहरें लुटून तीं जमीनदोस्त करून टाकिलीं; आणि शें-कडो देवालयें व मूर्ती फोडून, त्या देवालयांचे ठिकाणावर मसूजी-दी स्थापन केल्या. त्याचप्रमाणें हिंदूंची जीं हजारों पुस्तकें त्यांचे हातीं लागलीं त्यांचाही त्यानीं नाश केला. त्यामुळें हिंदुस्थानांतील प्राचीन विद्या व कलाकौशल्यें यांवरील अमोलिक ग्रंथ व इतिहास नष्ट होऊन प्राचीन सुधारणूकेचा मागमोस सुद्धां राहिला नाहीं. इतकीं अनुचित कृत्यें केल्यावर देखील त्या लोकांनीं स्वस्थपणें राज्य केलें असें नाहीं. हिंदू लोकांवर इतका जुलूम चालविला

* भरतखंडावर मुसलमान लोकांची पहिली स्वारी होण्यापूर्वी भरतखंडवासी लोकांस, “ आर्य ” असी संज्ञा होती; परंतु मुसलमान लोक त्यांस “ हिंदू ” व भरतखंडास “ हिंदुस्तान ” असें ह्मणूं लागले, कारण, जे मुसलमान लोक प्र-थम भरतखंडावर हल्ला करण्यास आले त्यांचा वर्ण गोरा होता व आर्य लोक हे त्यांजपेक्षां काळे होते; आणखी, आर्बी भाषेत “ हिंदू ” या शद्बाचा अर्थ काळा व “ हिंदुस्तान ” या शद्बाचा अर्थ काळेलोकांचादेश असा होतो. कालेंकरून फारशी शद्ब “ स्तान ” हा बदलून त्याचे ऐवजीं हिंदूलोकहे संस्कृत शद्ब “ स्थान ” याचा उपयोग करूं लागलें.

कीं, ते अत्यंत त्रस्त होऊन त्यांचे मुखांनीं " त्राही भगवान त्राही भगवान! " असे उद्गार सर्वकाळ निघूं लागले. याप्रमाणें हिंदू लोकांची स्थिति झाल्यानें त्यांचे पुढील संतत्तीस सुशिक्षा न मिळून ती उत्तरोत्तर अज्ञानांधःकारांत बुडाली. मुसलमानलोकांचें राज्य या देशांत सुमारें ६०० वर्षे चालल्यामुळें प्राचीनकाळीं जें हिंदुस्थान विद्वत्ता व ज्ञानसंपत्ती यांचे मुख्य अगर होतें त्याचे स्वरूप अगदीं बदलून त्याची स्थिती प्राचीनकाळीं कशी होती याची सुद्धां माहिती बुडाली.

परंतु ईश्वरेच्छेनें आलिकडे सुमारें २९० वर्षें झालीं असतील, मराठे लोकांचा उदय होऊन, दक्षिणेत शिवाजी भोसले, बाजीराव बल्लाळपेशवे व त्यांचे चिरंजीव रघुनाथराव पेशवे, मल्हाररावहोळकर विठ्ठलशिवदेव,माहादजीशिंदे, वगैरे कित्येक पराक्रमी वीर उत्पन्न झाले. त्यांनीं तरवार गाजवून मुसलमान लोकाचें प्राबल्य मोडून टाकिलें, आणि आर्यधर्माचें रक्षण करून प्राचीन विद्यावृद्धीस उत्तेजन दिलें. त्यामुळें ब्राह्मणजातीमध्यें संस्कृत भाषेच्या ग्रंथांचा आभ्यास वाढून काशी वगैरे क्षेत्रें व पुणें वगैरे शहरें यांत हजारों वैदिक, शास्त्री, जोतिषी, पुराणीक वगैरे तयार झाले व अणखी ही पुष्कळ विद्वान तयार झाले असते; परंतु यादेशांत मराठे लोकांचे वर्चस्व व राज्य चीरकाळ चालावें अशी परमेश्वराची इच्छा नव्हती सें दिसतें. त्याचें कारण पुढें लिहितों.

दक्षिणेंत मराठ्यांचा उदय होण्याचे सुमारास इंग्लंड देशांतून व्यापारी लोकांची एक कंपनी ( मंडळी ) हिंदुस्थानांत येऊन तिनें दिल्ली येथील मोघल बादशाहाचे परवानगीनें सूरत, मुंबई, मद्रास, कलकत्ता, वगैरे ठिकाणीं विलायती मालाच्या कोठ्या बांधून व्यापार चालविला होता. हिंदुस्थानांतील राजे यांचे आपसांतील कलहामुळें उत्तरोत्तर त्या व्यापारी लोकांस राज्यकारस्थानांत शिरण्यास सवड झाल्यावरून त्यांनीं प्रथम बंगाल सुभ्याचा नबाब यास पदच्युत केलें, आणि त्याचे गादीवर आपले तर्फेचा नवा नबाब बसवून त्याचे रक्षणाकरितां पुष्कळ कवायती फौज ठेविली. त्या संधीस दिल्लीचे बादशाहाची सत्ता अगदीं कमी झाली असल्यामुळें बंगालचे नबाबास पदच्युत केल्याबद्दल परदेशी व्यापारी

मंडळीचे पारिपत्य करण्याचें सामर्थ्य त्याचें आंगी राहिलें नव्हतें. त्या कारणानें त्याकंपनीची सत्ता दिवसानदिवस अधिक वाढून त्या लोकानीं कर्नाटकांत टिपू सुलतान याचें राज्य बुडविलें आणि मागाहून पुणें येथील पेशव्यांचें राज्य ही नष्ट करूनटाकिलें. तेणेंकरून उत्तरोत्तर संपूर्ण हिंदुस्थानांत त्यांचें प्राबल्य होऊन तेथें ते सार्वभौम राज्य करूंलागले. ते लोक जरी आचारसंपन्न नव्हते तरी त्यांचे अंगी कित्येक सद्गूण होते. त्यां पैकीं विद्या व कलाकौसल्यें यांस उत्तेजन देणें, ज्ञानाचा प्रसार करून आपली प्रजा सुशिक्षित करणें, इनसाफ्कर्णें आणि व्यवहारांतिल सर्व गोष्टी निर्बंधानें चालविणें, या मुख्य गोष्टी होत्या. दक्षिणेंत स्थीरस्थावर झाल्यावर त्या लोकांनीं जागोजाग शाळा स्थापून आपले रयतेस विद्यादान करण्याचा क्रम सुरू केल्यामुळें उत्तरोत्तर विद्येचा फैलाव होऊन हाल्लीं या देशांत पुष्कळ लोक विद्वान झाले आहेत. त्यांनीं जगाचे प्राचीन व आर्वाचीन इतिहास, निर्निराळे योध्धे व विद्वान पुरूष यांची चरित्रें, राजेरजवाडे यांच्या घराण्यांचे इतिहास वगैरे नानाप्रकारचे ग्रंथ छापून प्रसिद्ध केले आहेत. ते वाचिल्यानें मनास आवंद वाटते। इतकेंच नाहीं, तर, व्यवहारांत सुद्धां वाचणाराची अक्कल वाढत्ये.

खालींसहीकरणारा हा बहुत वर्षें विंचूरचे चीफ यांचे पदरीं आहे. त्याजकडे त्या चिफांचे इंग्रजी पत्रव्यवहाराचें काम आहे. त्या कामाचें संबंधानें त्यास विंचूर संस्थानचे दफ्तरांत पेशवाई व इंग्रजी अमलांतील मराठी कागदपत्र पाहाण्याचा पुष्कळ वेळा प्रसंग येतो. त्यावरून पेशवाई अमलांत विंचूर येथील दौलतीचे मुळसंपादक विठ्ठल शिवदेव यांनीं शिंदे, होळकर व इतर प्रख्यात सरदार यांच्याच प्रमाणें तरवार गाजवून दाक्षिणेंत व उत्तर हिंदुस्थानांत मोठी कीर्ती संपादन केली होती असें त्यास पक्कें माहीत झालें आहे.

आलिकडे नूतन विद्वान लोकांनीं पुष्कळ मराठी ग्रंथ छापून प्रसिद्ध केले आहेत असें वरलिहिलेंच आहे. त्यांपैकीं कित्येक चरित्रें खालींसहीकरणाराचे वाचण्यांत आलींआहेत; परंतु त्यांत विंचूर येथील दौलतीचे मूळसंपादक यांचे चरित्र किंवा

त्यांचे घराण्याचा इतिहास त्यास कोठे ही आढळला नाहीं. सबब इतर चरित्रे व इतिहास याचप्रमाणें त्यांचे चरित्र किंवा त्यांचे घराण्याचा इतिहास छापून लोकांत प्रसिद्ध करणें अवश्य आहे असें त्यास वाटल्यावरून त्यानें त्या कार्याकरितां दाखले वगैरे सामोग्रीची जमवाजमव चालविली. त्याजजवळ ग्रांटडफ साहेबांनीं पुर्वी मराठ्यांचा इंग्रजी इतिहास केला त्याची छापील प्रत होतीच. शिवाय, त्यानें हिंदुस्थानचा इंग्रजी इतिहास, मराठीबखरा, वगैरे बरेंच सामान पैदा केलें; परंतु तेवढ्याच सामोग्रीनें आपण योजीलेलें चरित्र किंवा समग्र इतिहास आपल्यास उत्तमप्रकारें तयार करितां येईल असें त्यास वाटलें नाहीं. सबब त्यानें आपले मालिक श्रीमंत राजमान्य राजश्री अंणासाहेब विंचूरकर यांस आपला हेतु कळवून विंचूरसंस्थानचे दफ्तरांतील कागदपत्राची मदत देण्याची मेहेरवानगी करण्याविषयीं त्यांस विनंती केली. ती विनंती विंचूरकरमौसूफ यांनीं मान्यकरून त्यास लागतील ते कागपपत्र आपले दफ्तरांतून घेण्याची उदारमनोंने परवानगी दिली. त्यावरून त्यानें त्यांच्या दफ्तरांत तपास चालविला. तेव्हां त्यास त्या घराण्याची एक जुनी बखर, पेशजी त्यांनीं [ विंचूरचे चिफ यांनीं ] इंग्रज सरकारांत आपलेघराण्यासंबंधी जी एक कैफियत गुजराविली होती तिची नक्कल, विठ्ठलशिवदेव यांस पेशव्यांकडून सफरेत गेलेलीं पत्रें, यादी, व जमाखर्चाचे कागद, येणेंप्रमाणें दाखले मिळाले. शिवाय, त्यानें त्या संस्थानांतील पुरातन माहितगार लोकांकडून तोंडची माहिती ही मिळविली. नंतर त्यानें त्या सर्व दाखल्यांचे व माहितीचे आधारानें विंचूरकर यांचे घराण्याचा इतिहास लिहिण्यास आरंभ केला, आणि सरासरी दीडवर्षपर्यंत मेहेनत केल्यावर इश्वरकृपेनें हाल्लीं तो इतिहास तयार झाला आहे.

या इतिहासाची भाषा व लिहिण्याची पद्धत कारकूनी म्हणजे दरबारी असल्यामुळें नूतन अभ्यासी यांस यांतील कितीएक शब्द समजणार नाहींत असें संभवतें. याकारितां ज्या ठिकाणीं खालीं सहीकरणारास असें शब्द समयविशेषीं घालणे उचीत वाटलें त्या ठिकाणीं त्यानें टीप करून त्या टिपेंत किंवा कौंस करून

त्या कौंसांत त्या शद्बांचें अर्थ लिहिले आहेत व त्याखेरीज त्यानें या ग्रंथास दरबारी शद्बांचा एक लाहानसा कोश जोडून त्यांत असे शद्ब अर्थां सुद्धां विल्हेवारीनें लिहिले आहेत. हा इतिहास वाचीत असतां वांचणारांस एकादे शद्बाचा अर्थ समजलानाहीं तर त्यांनीं तो शद्ब त्या कोशांत पाहावा, म्हणजे त्याचा अर्थ त्यांस तेथें कळून येईल.

आलिकडे नवीन मराठी ग्रंथ पुष्कळ होत असून मराठीं वर्तमानपत्रें ही पुष्कळ चालू झालीं आहेत. त्यांत मराठी शब्दांची अक्षरें लिहिण्याची पद्धत पडली आहे ती प्रथम एकाचें लिहिलेलें पाहून त्याप्रमाणें दुसऱ्यानें ल्याहावें अशा प्रकारची आहे. याचीं उदाहरणे अशीं कीं पठाणलोकांचे देशास "आफघानस्तान" असें नांव आहे. त्या लोकांचे भाषेंत "ण" हें अक्षर मुळींच नाहीं. असेंअसतां, हाल्लीं त्या शद्बाचे ऐवजीं नवीन मराठी ग्रंथांत व वर्तमानपत्रांत "आफगाणिस्थान" असा शद्ब आढळतो. या अपभ्रंशाचें कारण असें दिसतें कीं प्रथम कोणी आफगाणिस्थान असें चुकून लिहिलें असेल व तें पाहून दुसऱ्यानें व तिसऱ्यांनें तसेंच लिहिलें असेल, कांकी, दुसऱ्यांचे पाहून लिहिण्याची आपले लोकांस संवयच आहे. याचप्रमाणें फारसी भाषेंत "वकूफ" म्हणजे ज्ञान किंवा अक्कल असा शद्ब आहे. त्यापासून "बेवकूफ" म्हणजे अज्ञान किंवा मूर्ख असा शद्ब झालेला आहे. परंतु "बेवकूफ" असें न लिहितां लोक हाल्लीं त्याचे ऐवजीं "बेकूब" असें बोलूं व लिहूं लागले आहेत. सारांश, मुळशद्बांची माहिती करून न घेता केवळ दुसऱ्याचे तोंडानें ऐकून त्या अजमासानें लोक कांहीं तरी बोलतात व लिहितात अशी उदाहरणें शेंकडों आहेत; परंतु स्थलसंकोचास्तव वर दोनच दाखविलीं आहेत.

खालींसहीकरणारानें थोडा फारसीचा अभ्यास केला असून त्याचा लखनौ शहरात कित्येक विद्वान व दरबारी फारसीनवीसां बरोबर सहवास झाला आहे. त्यायोगानें मराठी भाषेंत येणाऱ्या बहुतेक फारसी शद्बांचा चांगला शोधकरून ते शब्द शुद्धरीतीनें लिहिण्यास तो समर्थ झाला आहे. त्यानें हाल्लीं तयार केलेले विचूरकर

घराण्याचे इतिहासांत जे दरबारी शब्द घातले आहेत ते चांगले माहितीनें घातले आहेत. त्यांविषयीं वाचणारांस कांहीं शंका येतील तर त्यांनीं त्यास विचारावें. ह्मणजे तो यथाशक्ती त्यांचे समाधान करील.

खालींसहीकरणारा हा केवळ एक इंग्रजी रायटर व मराठी कारकून आहे नवीन ग्रंथ रचण्याचा हा त्यास प्रथमच प्रसंग आहे सदर्हू इतिहास जरी त्यानें आपले मत्तें बिनचूक तयार केला आहे, तरी यात कदाचित अशुद्धें, वैगुण्यें, व दोष असतीलच, कारण, ज्याचे दोष त्यास कळून येत नांहींत, व चुकतनाहीं असा जगांत सर्वज्ञ परमेश्वरा शिवाय दुसरा कोणीच नाही. याकरितां सूज्ञ वाचकांस त्याची विनयकपूर्वक अशी प्रार्थना आहे कीं यांत कांहीं अशुद्धें, वैगुण्यें, अगर दोष आढळतील तर त्यांनीं त्यांबद्दल त्यास थोरमनानें क्षमा करावी.

हरी रघुनाथ गाडगीळ.

३३ राघोबादादा व सरदार लोक यां मध्यें कराराची यादी....५६
३४ त्यांचे मदतीस निजामांकडून मुरादखान नांवाचा सरदार आला. .... .... .... ....५९
३९ राघोबादादांचा पुण्यावर कूच.... .... ....५९
४० राघोबादादा व माधवराव यांची लढाई व माधवराव यांचा मोड. .... .... .... ....५९
४१ पटवर्धन वगैरे सरदार नाखुष होऊन हैदराबादेस निघून गेले. .... .... .... ....६०
४२ राघोबादादानीं मिरजेचा किल्ला घेऊन त्यांत लूट केली....६१
४३ राघोबादादांच्या अनुचित वर्तनामुळे रामचंद्रराव जाधव वगैरे सरदार नाखुष होऊन निजामांकडे मिळाले....६१
४४ निजामांची पुण्यावर चढाई. .... .... ....६२
४५ राघोबादादांनी हैदराबादेवर जाऊन त्याचे कोटा बाहेरचे वस्तिपासून खंडणी घेतली.... .... ....६३
४६ निजामांनी पुणें शहरांचा कांहीं भाग लुटिला, कांहीं जाळून टाकिला व कित्येक लोकांपासून पैसा घेतला....६४
४७ निजामांचा औरंगाबादेकडे कूच. .... ....६४
४८ राघोबादाहा व माधवराव यांचा समेट..... ....६५
४९ पटवर्धन वगैरे सरदार पेशव्यांकडे परत आले. ६५
५० जानोजी भोसलें यांस राघोबादादांनीं आपलेंसें करून घेतलें..... .... .... .... .....६५
५१ विठ्ठल सुंदर याजरोबर राक्षस भुवनाजवळ लढाई व राघोबादादांचा मोड. .... .... ....६६
५२ माधवराव पेशवे यांजकडून फौजेची उटावणी, विठ्ठल सुंदर याची कत्तल व मोघल फौजेचा मोड व दुर्दशा.६७
५३ निजामांचा पाठलाग व मोड..... .... ....६८
५४ निजामांचा पेशवे यांजबरोबर तह. .... ....६९
५५ माधवराव पेशवे यांजकडून मराठे सरदारांस नक्त नेमणुकांचे ऐवजीं मुलकांच्या पृथक सनदा.... ....७०
५६ विठ्ठल शिवदेव यांचा गोट लुटण्याविषयीं माधवराव

पेशवे यांचा बेत व तो बेत रहीतकरण्याविषयीं मल्हा-
रराव होळकर यांचा त्यांस बुद्धिवाद..... ....७१
५७ हैदरअली वरील स्वांरी...... .... ....७४
५८ विठ्ठल शिवदेव यांचा विशेष पराक्रम..... ....७७
५९ हैदरअलीचा मोड व त्याचा पेशव्याबरोबर तह. ७८

## प्रकरण ७.

६० माधवराव पेशवे यांचीनागपुरावर चढाई.... ....७९
६१ राघोबादादांची उत्तर हिंदुस्थांनातील स्वांरी. ....८०
६२ गोहदचा वेढा.... .... .... ....८०
६३ मल्हाराव होळकर यांचा मुत्यू. .... ....८३
६४ गोहदचे राण्याबरोबर तह.... .... ....८४
६५ मरहूम् होळकरांचे नातू मालोजी होळकर यांस स-
रदारीचीं वस्त्रें..... .... .... ....८४
६३ दादासाहेबांचें दक्षिणेस परतयेणें. .... ....८४
६६ विठ्ठल शिवदेव यांची बेरामी व मृत्यू. ८६
६८ विठ्ठल शिवदेव यांचे कुटुंबाचे माणसांची हकीकत....८६
६९ त्यांचे पदरचे लोक व त्यांचे दौलतीची व्यवस्था. ....८८
७० त्यांची धर्म कृत्यें. .... .... ....९४

---

# भाग २.

## शिवाजी विठ्ठल विंचूरकर यांचे चरित्र.

७१ वडिलांचे मरणाने झालेल्या दुःखाबद्दल शिवाजी विठ्ठल
यांचें पेशवे यांजकडून समाधान. .... ....१०२
७२ गणेश कृष्ण बिनीवाले, शिवाजी विठ्ठल, वगैरे सरदार
यांची उत्तर हिंदुस्थानांत रवानगी. .... ....१०३
७३ त्यांची रोहिल खंडावरील चढाई व त्या प्रदेशाची
धुळधाणी. १०३
७४ माधवराव पेशवे यांचा अकाल मृत्यू व त्यांचे बंधू

नारायणराव बल्लाळ यांस पेशवाईचीं वस्त्रें. ....१०४
७५ नारायणराव पेशवे यांचा खून. .... ....१०४
७६ माधवराव नारायण यांचे नांवानें राज्यकारभार चालू झाला. .... .... .... ....१०४
७७ माहादजी शिंदे यांची जयपुरावरील स्वारी व त्यांचा मोड. .... .... .... ....१०५
७८ शिवाजी विठ्ठल यांजकडून जयपूरचे केशरिया लोकांवर हल्ला, त्या लोकांचा मोड व जयपूरचे दरवाजा पर्यंत त्यांची कत्तल. .... .... ....१०७।८
७९ गुलामकादर नांवाच्या रोहिले सरदारावर माहादजी शिंदे यांची स्वारी, व त्या सरदादाराचा वध. ....१०९
८० आलम्गीर बादशाहाची तखूतावर पुनः स्थापना व त्याचा दगाबाज व फितुरी पुत्र बेदरबख्त याचावध. १०९
८१ शिंदे यांस व त्यांचे मार्फत पेशवे यांस खिताब वगैरेची देदेनगी व शिवाजी विठ्ठल यांचे वडीलांस मिळालेल्या खिताबाचें कायम होणें. .... ....११०
८२ पेशवे यांचे हुकुमावरून ग्वाल्हेरचा किल्ला व त्या खालचा मुलुक शिवाजी विठ्ठल यांजकडून निघून शिंद्यांचे ताब्यांत गेला. .... .... ....११०
८३ शिवाजी विठ्ठल यांचे लष्कराची मथुरा येथे छावणी झाली. .... .... .... ....११०
८४ शिवाजी विठ्ठल यांचे दक्षिणेस परत येणे व मृत्यू. ....११२
८५ त्यांचे कुटुंबाचे मनुष्यांची हकीकत व त्यांची धर्मकृत्ये..११२

---

## खंडेराव विठ्ठल विंचूरकर यांचे चारित्र.

८६ खंडेराव विठ्ठल यांस सरदारीची वस्त्रें..... ....१२०
८७ पेशवे व निजाम यांमध्यें वेबनाव. .... ....१२१
८८ खर्ड्याची लढाई. .... .... ....१२३
८९ निजामाचा मोड व त्यांचा पेशव्या बरोबर तह. १२४
९० खंडेराव विठ्ठल यांचा मृत्यू. .... ....१२७

---

## नरसिंह खंडेराव विंचूरकर यांचे चरित्र.

९१ नरसिंह खंडेराव यांस सरदारीचीं वस्त्रें.... ....१३०
९२ त्यांस शिक्षण..... .... .... ....१३१
९३ सवाईमाधवराव यांचा आकाल मृत्यू. .... ....१३२
९४ बाजीराव रघुनाथ यांस पेशवाईची वस्त्रें.. ....१३३
९५ तुकोजी होळकर यांचा मृत्यू व त्यांचे पुत्र विठूजी यांस देहांत शिक्षेचा ठराव. .... ....१३५
९६ विठुजी होळकर यांचे जीवाचे रक्षणाकरितां नरसिंह खंडेराव यांची पेशव्यांजवळ रदबदली. ....१३५
९७ विठूजी होळकर यांचा अघोर मृत्यू. .... ....१३७
९८ आपले प्रीयबंधूस जीवे मारविल्याबद्दल दौलतराव शिंदे यांचा सूड घेण्यासाठीं यशवंतराव होळकर यांची तयारी..... .... ... ....१३८
९९ होळकर व शिंदे यांचे युद्ध.. .... ....१३८
१०० होळकर यांची पुण्यावर चढाई. .... ....१३९
१०१ धोंडोपंत गद्दबोले यांचा मोड. .... ....१४१
१०२ अहमदखानाचा मोड व मृत्यू. .... ....१४३
१०३ फणशे यांजकडून विंचूरकर यांचे विंचूर येथील वाड्याचा आगीने नाश. .... .... ....१४४
१०४ फौजेनिशीं नरसिंह खंडेराव यांचें पुण्यास पोंहोंचणें. १४४
१०५ यशवंतराव होळकर व पेशवे यांची पुण्यानजीक मोठीलढाई. .... .... .... ....१४६
११० पेशव्यांकडील एकत्र जमलेल्या फौजेचा मोड. ....१४७
१११ बाजीराव पेशवे यांचें पुणे सोडून निघून जाणें. ....१४९
११२ नरसिंह खंडेराव यांस इंग्रजी फौजेचे मदतीने होळकर यांचे परीपत्य कर्ण्यास्तव पुण्यास जाण्याविषयीं पेशव्यांचा हुकूम. .... .... ....१५२
११३ चतुरसिंग भोसले याचा मोड. .... ....१५२
११४ मिरजयेथे नरसिंहराव व वेलेस्ली साहेब यांची भेट व उभयसरदारांचा पुण्याकडे कूच. .... ....१५३

११५ यशवंतराव होळकर नुकतेंच पुणेशहर लुटून तेथून निघूनगेले होते. .... .... ....१५३
११६ बाजीराव पेशवे यांचा इंग्रजांबरोबर वसई येथे तह जाल्यावर त्यांचे पुण्यास परत येणे, व होळकरांचे पाठलागार्थ वेलेस्ली साहेबांची रवानगी. ....१५३
११७ खानदेशांतील पेंढारी लोकांचे दंगे मोडण्याचे कामीं कर्नल वालेस साहेबांस मदत करण्यास्तव नरसिंहराव यांची रवानगी. .... .... ....१५३
११८ खानदेशांतील पेंढारी व इतर दंगेवाले यांचें पारिपत्य व त्या प्रांताची आबादी. .... .... ....१५४
११९ नरसिंहराव यांचा अकालमृत्यू.. .... ....१५५
१२० त्यांचे मानीस्वभावासंबंधी गोष्टी. .... ....१५८

---

## विठ्ठलराव नरसिंह विंचूरकर यांचे चरित्र.

१२१ नरसिंह खंडेराव यांचे स्त्रीचे मांडीवर दत्तक देवविण्याविषयीं विंचूरचे कारभारी यांचा उद्योग. ....१६०
१२२ विठ्ठलराव यांचे दत्तविधान..... .... ....१६२
१२३ पेंढारी लोकांचा बंदोबस्तकरण्याचे कामीं कर्नल वालेस साहेबांस मदतकरण्यास्तव विठ्ठलराव नरसिंह यांची नेमणूक व त्यांचा कूच. .... ....१६७
१२४ दादेखान नांवाचा पेंढारी सरदार पकडलाजाऊन त्याची पुण्यास रवानगी. .... .... ....१६८
१२५ शूर्पकर्ण नांवाचे बंडवाल्याचा वध व विठ्ठलराव यांस शाबासकी. .... .... .... ....१६८
१२६ पेंढाऱ्यांचा दंगा मोडण्याचे कामांत इंग्रजकामदारांस चांगली मदत केल्याबद्दल विठ्ठलराव यांची वाहवा. १७०
१२७ गंगथडीतील भिल्ल लोकांचा बंदोबस्त केल्याबद्दल विठ्ठलराव यांस पेशव्यांकडून बक्षिसी..... ....१७१

१२८ शिंद्यांचे कामदार व दतियावाले राजे यांनीं विठ्ठल-
रावांचे उत्तर हिंदुस्थानांतील मुलुक बळकाविले
होते ते त्यांस परत मिळाले.... .... ....१७२
१२९ पेंढारी लोकांनीं पुनः केलेला दंगा मोडण्याचे कामीं
जनरल स्मिथ साहेबांस मदत कर्ण्यास्तव विठ्ठलराव
यांचा कूच. .... .... .... ....१७३
१३० भिल्ल, रामोशी, कैकाडी वगैरे हलक्या जातीचे लो-
कांचे दंग्याचा बंदोबस्त. .... .... ....१७५
१३१ आपले उत्तर हिंदुस्थानांतील मुलकांबद्दल आपणास
इंग्रज सरकारांकडून जाहागीरीची सनद मिळावी
ह्मणून विठ्ठलरावांचा उद्योग.... .... ....१७६
१३२ बाजीरावपेशवे व इंग्रज लोक यांचे युद्ध.... ....१७६
१३३ बाजीराव पेशवे यांचें पुण्याहून निघूनजाणें. ....१८०
१३४ इंग्रज लोकांचा पुणेंशहरांत अंमल. .... ....१८१
१३५ कोरेगांव येथील लढाई. .... .... ....१८१
१३६ आष्टें येथील लढाई व बापूगोखले यांचा मृत्यू....१८२।८३
१३७ आदम साहेबांकडून बाजीराव पेशवे यांचामोड.....१८३
१३८ इंग्रज सरकाराबरोबर ठराव कर्ण्याविषयीं बाजीराव
यांचा उद्योग..... .... .... ....१८४
१३९ माल्कम् साहेबांकडून आलेल्या ठरावाचेयादींतील
शर्ती.... .... .... .... ....१८६
१४० बाजीरावपेशवे मालकम् साहेबांचे स्वाधीन झाले. ....१८८
१४१ बाजीराव यांची ब्रह्मावर्तास रवानगी.... ....१८८
१४२ बाजीराव यांजबरोबरचा लवाजमा. .... ....१८८
१४३ बाजीराव यांजबरोबर जे सरदार गेले त्यांच्या तैनाती.१९०
१४४ त्यांजबरोबरचे लोकांस इंग्रज सरकाराकडून पेनशनें
मिळूं लागलीं त्यांच्या पृथक् रकमा. ....१९०।९१
१४५ विठ्ठलराव विंचूरकर यांस जातीचीजाहागीर चा-
लविण्याबद्दल मालकम् साहेबांचे वचन.... ....१९३
१४६ बाजीराव यांजबरोबर जे सरदार नर्मदेपर्यंत गेले
होते त्यांचे स्थितीचा विचार. .... ....१९४

१४७ विठ्ठलराव विंचूरकर यांचे स्थितीचा विचार. ....१९५
१४८ विठ्ठलराव हे विंचूरास परत आले व त्यांचे वाडे व जगंम मिळकत यांवरील जप्त्या उठल्या. ....१९५
१४९ एलफिन्स्टन्साहेबांकडून विठ्ठलराव यांची खातर.....१९६
१५० मालकम्साहेबांकडून एलफिन्स्टन्साहेबांस आलेलीं पत्रें.१९७
१५१ एलफिन्स्टन्साहेबांचे सरंजामपटाचा उतारा. ....२०३
१५२ एलफिन्स्टन्साहेबांकडून विठ्ठलराव यांची वडिलार्जित देण्याचे पेचांतून मुक्तता. .... .... ....२०७
१५३ विठ्ठलराव यांस दोन कुरणें बक्षिस मिळालीं. ....२०७
१५४ त्यांस दोन गांव ताहयात मिळाले. .... ....२०९
१५५ आपलीं उत्तर हिंदुस्थानांतील वडिलोपार्जित इनामें परत मिळण्यास्तव एलफिस्स्टन्साहेब गव्हरनर यांचे मार्फत गव्हरगर जनरल यांस विठ्ठलरावांचा अर्ज व त्यांस नामंजुरिचा जबाब. .... .... ....२१०
१५६ जनरल स्मिथ यांचा दाखला... .... ....२१४
१५७ सदर्हू इनामें सुटण्याबद्दल मालकम् साहेब गव्हरनर यांचे मार्फत विठ्ठलराव यांजकडून गव्हरनर जनरल यांस दुसरा अर्ज व त्यांस नाकबुलीचा जबाब. ....२१८
१५८ विठ्ठलराव यांजकडून ग्वाल्हेरचे शिंदे व रेसिडेंट यांजकडे वकिलांची रवानगी.... .... ....२१९
१५९ विठ्ठलराव यांचा मृत्यू. .... .... ....२२०
१६० त्यांचे कुटुंबाचे माणसांची हकीकत. .... ....२२१
१६१ त्यांचीं धर्मकृत्यें.... .... .... ....२२२
१६२ लोकांबरोबर त्यांचा स्नेहसंबंध होता त्याविषयीं गोष्टी.२२४

---

## भाग ३.

## रघुनाथराव विठ्ठल विंचुरकर यांचा वृत्तांत.

### प्रकरण १

१६३ रघुनाराव यांचा जन्म. .... .... ....२२७
१६४ त्यांचे मातुश्रीचा देहांत. .... .... ....२२७

१६५ त्यांचे नांव पहिल्या प्रतिच्या सरदारांचे पटांत दाखल झालें. .... .... .... ....२२८
१६६ त्यांचे मौंजीबंधन व लग्न. .... .... ....२२८
१६७ त्यांचे वडिलांचा देहांत. .... .... ....२२८
१६८ वडिलांचें मरणानें त्यांस झालेल्या दुःखाबद्दल त्यांचें सरकाराकडून सांत्वन. .... .... ....२२८
१६९ त्यांचे नांवानें वडिलार्जित मिळकती चालविण्याबद्दल सरकारचा ठराव.... .... .... ....२२९
१७० त्यांचे पुरातन कारभारी हेच त्यांचे संस्थानचे कारभारावर कायम झाले.... .... ....२३१
१७१ त्यांचा विद्याभ्यास. .... .... ....२३२
१७२ त्यांचे दुःखदायक स्थितीचीं कारणें. .... ....२३३
१७३ त्यांनीं आपली सर्व स्थिती एजेंटसाहेबांस कळविली. २३६
१७४ विंचूर संस्थानचे कारभारावर ढमढेरे यांची योजना....२३७
१७५ त्यांचे सापत्न बंधू व मातुश्री यांचे गुजाऱ्या बद्दल सरकारचा ठराव. .... .... ....२३७
१७६ बंधूंशीं समेट होण्याबद्दल त्यांचा यत्न व त्याचे साफल्य .... .... .... ....२३९।४०
१७७ ढमढेरे कारभारी यांजकडून सरकारास रिपोर्ट. ....२४१
१७८ रघुनाथराव यांस मुखत्यारी मिळाली... ....२४२
१७९ सन १८४२ इसवीचे रुल. ( कानू ). ..... ....२४३
१८० रघुनाथराव यांनीं आपले सरंजामाबद्दल पुरावा हाजिर केला. ..... ..... ....२४५
१८१ पार्टिजर साहेबांची गोष्ट. ..... .... ....२४५
१८२ रघुनाथराव यांचें उत्तर हिंदुस्थानचे यात्रेस प्रयाण व परत येणें. .... .... ....२४८।४९
१८३ त्यांचे बंधू कृष्णराव यांची सदरअमिनीचे कामावर योजना. .... .... .... ....२४९
१८४ त्यांचे बंधू माधवराव यांजकडे त्यांचे संस्थानचे कारभाराची सोंप. ..... .... ....२५०

१८४ रघुनाथराव यांनीं कागदपत्र मिळविण्याचे कामांत इनाम कमिटीस मदत केल्याबद्दल त्यांजवर सरकारची खुषमर्जी. .... .... ....२५२
१८६ त्यांजकडे कोंपरगांव येथील देवाचे संस्थान व नानजगांव यांच्या वाहिवाटी सरकारानें दिल्या. ....२५२
१८७ विंचूरचे कोर्टात इनसाफाचें काम उत्तमप्रकारें चालत असल्याबद्दल व रघुनाथराव यांनीं विद्यावृद्धीस उत्तेजन दिल्याबद्दल सरकारची खुषमर्जी. ....२५३
१८८ वार्षिक दरबारांत स्वतः हाजीर होण्याची रघुनाथ राव यांस माफी. .... .... ....२५४
१८९ उत्तर हिंस्थानांत पळटणी शिपाई लोकांचा दंगा....२५४
१९० अशा प्रसंगीं सरकार फर्मावितील ती नौकरी बजाविण्यास आपण सिद्ध असण्याविषयीं रघुनाथराव याजकडून सरकारास विनंती व त्याबद्दल सरकारची खुषमर्जी. .... .... .... ....२५५
१९१ भिल वगैरे बंडवाले लोकांचें बंड मोडण्याचे कामांत रघुनाथराव यांनीं सरकारचे कामगारांस मदत केल्याबद्दल सरकारची खुषमर्जी. .... ....२५६
१९२ मलिकामाआझमा यांचे सरकारचा जाहिरनामा. ....२५८
१९३ रघुनाथराव यांचे कनिष्ट बंधू माधवराव यांची कायदे कौन्सिलांत नेमणूक... .... ....२५९
१९४ माधवराव यांची वतन कमिशनरचे हुद्यावर नेमणूक..२६०
१९५ माधवराव यांची कायदे कौन्सिलांत पुनःनेमणूक..२६१
१९६ माधवराव यांचें नांव सरकारानें पहिल्या प्रतीचे सरदारांचे पटांत घातलें. .... .... ....२६२
१९७ माधवराव यांची अक्कलकोटचे संस्थानावर नेमणूक....२६४
१९८ गव्हरनर सर बार्टल फ्रीयर यांचा पुणें येथें बडा दरबार.२६४
१९९ गव्हरनरमार्सूफ यांस तसबीर नजर करण्यास्तव दरबार.२६८
२०० लवादमार्फत स्थावर मिळकतीच्या बधूंमध्यें वांटण्या.२७१

२०१ माधवराव यांजकडून अक्कलकोट येथील कामाचा राजीनामा...... .... .... ....२७२
२०२ राजधर्माचें पुस्तक. .... .... ....२७२
२०३ रघुनाथराव व भाऊ शिंदे यांच्या परस्पर मेजवान्या.२७३
२०४ ड्युक ऑफ इंडिंबरो यांचे मुंबईस आगमन. २७५
२०५ रघुनाथराव याची सापत्न मातुश्री लक्ष्मीबाईसाहेब यांचा मृत्यू.... .... .... ....२७७
२०६ लार्ड नार्थब्रूक यांचें मुंबईस आगमन व त्यांचा मनमाड येथें सत्कार.... .... .... ....२८०
२०७ माहाराज तुकोजीराव होळकर यांचा मनमाड येथें सत्कार व त्यांस विंचूर येथें मेजवानी..... ....२८१
२०८ युवराज प्रिन्स आफ वेल्स यांचे हिंदुस्थानांत आगमन.२८४
२०९ दक्षिणेंत व दक्षिणहिंदुस्थानांत भयंकर दुष्काळ. ...२८७
२१० मलिका माआझमा यांनीं " केसरेहिंद " अशी पदवी धारण केल्याबद्दल दिल्ली येथे बादशाही बडा दरबार.... .... .... ....२८९
२११ कृष्णरावबापूसाहेब यांचा मृत्यू. .... ....२९८
२१२ होळकर माहाराज यांचें विंचूर येथें पुनरागमन. ....२९३
२१३ रघुनाथराव यांची पत्नी श्रीमंत सौभाग्यावती जानकीबाईसाहेब यांचा मृत्यू व रघुनाथराव यांचे मन प्रपंचातून ऊठणें .... .... ....२९५
२१४ रघुनाथराव यांचें मन प्रपंचांतून उठण्यास दुसरें विशेष कारण.... .... .... ....२९६
२१५ या ग्रंथाचे शेवटीं ग्रंथकर्त्याच्या चार ओळी. ....३०५

# विंचूरकर घराण्याचा वंशवृक्ष.




वर ज्या पुरुषांचे नांवास * अशी खूण केलेली आहे तो पुरुष विंचूर संस्थानचे गादीवर बसलेला असें समजावें.

# विंचूरकर घराण्याचा इतिहास.

## भाग पहिला.

### मूळपुरूष विठ्ठल शिवदेव विंचूरकर यांचें चरित्र.

### प्रकरण १

विठ्ठल शिवदेव हे ऋग्वेदी ब्राम्हण असून त्यांचें मूळचें उपनांव दाणी असें होतें. पुढें ते विंचुरास राहूंलागल्यापासून लोक त्यांस विंचूरकर असें ह्मणूंलागले. विंचुरास राहाण्याचें कारण वाचकांस पुढें चरित्रांत कळूनयेईल.

सुमारें दोनशें वर्षांपूर्वी सासवड येथील दाणीपणाचें वतन विंचूरकर यांचे पुर्वजांकडे चालत होतें. त्यावतनाचें काम त्या काळीं इतकेंच होतें कीं, दाण्यानें भरलेली गाडी, बैल किंवा तट्टू येईल तें दाणीनें टिपूनघेऊन दफ्तरांत ठेवावें. त्याबद्दल त्याचा हक्क ह्मटला तर त्यानें दरगोणीस एक एक ओंजळभर धान्य घेतजावें इतकाच होता. त्यावतनासंबंधीं दोनशे वर्षांपूर्वीचे जुने लेख विंचुरकरांचे दफ्तरीं आहेत त्यावरून वरील गोष्ट सिद्ध होते. या वतनावरूनच प्रथम त्यांचें दाणी असें उपनांव पडलेंअसावें असें दिसतें. या उत्पन्ना खेरीज प्राचीन काळापासून सासवड येथे त्यांच्या इनामी व मिराशी बागाईत अशा जमिनी होत्या; त्यांचें उत्पन्न हाल्लीं त्याचे वंशज उपभोगीत आहेत. *

वरसांगितलेले दाणीपणाचे वतनाचा उपभोगकरणारा यास दोन पुत्र झाले. तेव्हां शास्त्रप्रमाणें वतनाचा निमेंनिम विभाग झाला. वडील विभागदाराचा वंश हाल्लीं सासवड येथे कायम् असून तो तेथील इनामी व मिराशी जमिनी उपभोगीत आहे

* विंचूरकर याचें दफ्तर.

असें वर लिहिलेंच आहे. धाकटे विभागदाराचे वंशांत विठ्ठल शिवदेव ह्मणजे ज्या पुरुषाचा इतिहास आह्मी लिहीत आहों तो पुरुष सन १६९५ इसवी सालीं सासवड येथें जन्मला. वडील घराण्यांत मालेगांव आणि नाशिक येथील राजेबाहादर यांचे मूळपुरूष नारोशंकर हे जन्मले. विठ्ठल शिवदेव जिवंत होते तोंपर्यंत तीन दिवसांचा सुयेर सुतक धरण्याची उभय शाखांमध्यें परस्पर वहिवाट होती. पुढें पिढ्या तुटल्या. हक्कदारांनीं वतनसंबंधीं उत्पन्न घेऊनये असा कायदा इंग्रजसरकारानें सन १८४० इसवीचे सुमारास केला. त्यापूर्वीं वरील दोन्ही शाखांच्या पुरुषांनीं सासवडचे वतनाचा उपभोग निर्वेधपणें केला होता. पुढें कायद्याचे मनाईमुळें उभय शाखांतील पुरुषांस उत्पन्नाचे मानानें व कायद्यांतील अर्थाप्रमाणें रोखे देण्यात आले. पुढें रोख्यांत लिहिलेल्या रकमा सरकारानें वतनदार यांस रोख दिल्यामुळें त्यांस व्याज भरण्याची जरूर राहिली नाहीं. * त्या वेळेपासून सासवडचें सदर्हू वतन अगदीं बुडालें.

वर लिहिलेले धाकटे शाखेचे वंशांतील शिवाजीपंत यांस तीन पुत्र होते. वडील आबुराव शिवदेव, मधले त्रिंबक शिवदेव, आणि कनिष्ट विठ्ठल शिवदेव. विठ्ठल शिवदेव हेच काय ते विंचूरकर यांचे दौलतीचे मूळसंपादक असून त्यांस जातीची जाहागीर मिळाल्यावर त्यांनी वडील बंधू आबुराव यांचे वंशाचे गुजाऱ्यास आपले जाहागिरीपैकीं धोंडवें म्हणून गांव दिला. त्या गांवाचा कमाल आकार रुपये १, ६६९८४ आहे. तो गांव हाल्लीं वडील वंशाकडे चालत आहे. मधले बंधू त्रिंबकराव यांचे गुजाऱ्यास त्यांनीं आपले फौज सरंजामापैकीं निंबगांव ह्मणून एक गांव दिला; परंतु पुढें तो गांव फौज सरंजामाबरोबर इंग्रज सरकारानें खालसा केला. यास्तव विठ्ठल शिवदेव यांजपासून पुढें चवथे पुरुष विठ्ठलराव नरसिंह ऊर्फ तात्यासाहेब यांनीं आपले जात सरंजामापैकीं मौजे मानोरी हा गांव त्या मधल्या भावाचे वंशास दिला. त्या

* विंचूरचे दफ्तरांतील बखर.

गांवचा कमाल आकार रु. १,२४० आहे. तो गांव त्रिंबकरावांचे वंशज हाल्लीं उपभोगीत आहेत *

विठ्ठल शिवदेव यांचे वडील शिवाजीपंत यांचे घरची मुळची स्थिति साधारण होती. त्यांचे आबुराव आणि त्रिंबकराव हे दोघे पुत्र शाहाणे असून त्याच उभयतांनीं प्रापंचाचें ओझें संभाळिलें होतें; परंतु कनिष्ठ पुत्र विठ्ठलराव यांजपासून प्रापंचास कोणत्याच प्रकारची मदत होत नसे, कारण, त्यांस मुळापासून तालीम करणें व घोड्यावर बसणें यांचा मनस्वी शौक होता. विठ्ठलरावांनीं आपली शरीरसंपत्ती अशी वाढविली होती कीं, त्यांच्या इतका जोरदार पुरुष आसपास कोणीही नव्हता. त्यांनीं घोड्यावरबसणें व कसरत करणें या दोन गोष्टींचा अभ्यास रात्रंदिवस चालविला असतां, उभयतां वडील बंधू हे त्यांस वाईटसाईट बोलून फारच त्रास देत असत. ते त्यांस म्हणत कीं, "तू उगीच जोर काढून व मलखांबावर उड्या मारून आयुष्य मात्र व्यर्थ घालवितोस ! त्यांपेक्षां कोणाची तरी चाकरी केलीस तर पोटभर खाशील, व कदाचित् तुझें लग्न ही होईल." अशा प्रकारें उभयतां बंधूंकडून विठ्ठलरावांस वारंवार तसदी होत होती.

एके दिवशीं असा प्रकार झाला कीं, विठ्ठलरावांचे वडील त्यांस असें बोलले कीं, "तूं घरांत निरुद्योगी बसून दुसऱ्याचे कमाईवर उपजीविका करतोस; त्यापेक्षां मरतास तर बरें होतें ! तुझे बंधू मिळवितात आणि तूं आयते खाऊन उनाडासारखा फिरतोस याची तुला लाज म्हणून वाटतच नाहीं काय. ? आणि असेंच वर्तन पुढें ही ठेवणें असेल तर तूं घरांत राहूंनको, निघुन जा. हे शब्द विठ्ठलरावांस विषतुल्य वाटून त्यांच्या मनांत विरश्री-उत्पन्न झाली; आणि त्या वीरश्रीचे भरांत वडील, मातुश्री आणि उभयतां वडील बंधू यांस नमस्कारकरून ते घरांतून बाहेर निघून गेले. ते साताऱ्यानजीक तीन कोसांवर कृष्णा नदीचे तिरीं मर्ढे

* विंचूरचे दफ्तर.

ह्मणून गांव आहे तेथें गेले. त्या मढें गांवांत आमृतस्वामी म्ह-णून रामउपासक व ब्रह्मचारी असे मोठे सिद्ध पुरुष होते. विठ्ठ-लराव यांनीं त्यांचें दर्शन घेतलें, आणि कांहीं दिवस त्यांची सेवा एकनिष्ठेनें केल्यानंतर स्वामीनीं त्यांजवर कृपा केली. पुढें स्वामी तीर्थयात्रेस गेल्यावर त्यांचे मठांत पावनबावा म्हणून त्यांचे मुख्य शिष्य होते त्यांजवळ विठ्ठलराव हे राहिले. त्यांनीं बावांच्या मठांतील कामकाज करावें आणि ते भजन करूंलागले ह्मणजे त्यांस साथ करावी. असा क्रम कांहीं दिवस चालला. त्या यो-गेंकरून पुढें विठ्ठलराव यांजवर पावनबावांची ही कृपा झाली. या-प्रमाणें विठ्ठलराव हे पावनबावाची सेवा करीत असतां, तो सत्समा-गमरूपी वृक्ष फलद्रूप झाला. विठ्ठलराव यांची बुद्धी थोर हो-ऊन त्यांच्या आंगीं सत्कीर्ति मिळविण्याजोगें सामर्थ्य आलें. थोरांचा महिमा अगाध आहे. त्यांचे सहवासानें काय म्हणून होणार नाहीं. ? मनुष्यास थोरपणा येण्यास व त्याचे हातून अद्भुत पराक्रम घडण्यास सत्पुरुषांचे कृपेवांचून उत्तम साधन म्हणून दुसरें कोण-तेंच नाहीं. शिवाजीमाहाराज यांस रामदास स्वामींचा प्रसाद किती उपयोगीं पडला. ? त्याचप्रमाणें धावडशीचे माहापुरुषापासून थोरले बाजीराव यांस स्वराज्य स्थापनकरण्याचा बीजमंत्र मिळू-न त्यानीं महत्कृत्यें केलीं आणि त्यांची सुकीर्ति दिगांतरीं गेली. तात्पर्य, प्रत्येक व्यक्तीकडून अलौकिक पराक्रम घडण्यास सत्पुरु-षाचा प्रसादच कारणिभूत होतो हें निर्विवाद आहे.

वरलिहिलेले मढें गांवांत एक प्रतिष्टित गृहस्थ राहात असून ते सातान्यास शाहुमाहाराजांचे पदरीं बक्षिगिरीचे कामावर होते. त्यांनीं पावनबावांचा अनुग्रह घेतला होता त्यामुळें बावांच्या मठांत त्यांचें येणें जाणें वारंवार होतहोतें. बावांनीं एके दिवशीं बक्षी यांस सांगितलें कीं, " मजजवळ विठोबा सासवडकर आहे. हा प्रामाणिक असून अत्यंत मेहनती ही आहे. यास तुम्ही आपले ज-वळ ठेवूनघेऊन याची साताऱ्यास कोठे तरी सोय करून द्यावी."

ही अज्ञा बक्षी यांनीं मान्य केली आणि विठ्ठलराव यांस आपले बरोबर साताऱ्यास नेऊन आपले घरीं ठेविलें. तेथें विठ्ठलराव हे मुख्यत्वेंकरून बक्षी यांचे घोड्यांची देखरेख करीत, व त्याखेरीज किरकोळ कामें ही करून त्यांचे पंक्तीस भोजन करीत असत.

शाहूमाहाराज यांस शिकारीचा मनस्वी शौक होता. एकेदिवशीं माहाराजांची स्वारी शिकारीस निघाली असतां विठ्ठलराव यांनीं ही स्वारीबरोबर जाण्याचा बेत केला. नंतर बक्षी यांचे पागेंतील एक घोडा बसावयास घेऊन ते स्वारींतील बारगिरांत मिश्र झाले. स्वारी कृष्णातीरीं गेल्यावर माहाराजांचे स्वारांनीं रानांत एका रानडुकरास घेरा घालून त्यासभोंवतें कडें केलें, आणि त्या डुकरास पळून जाण्यास अगदींच मार्ग ठेविला नाहीं. डुकर पळून जाण्यासाठीं हिकडून तिकडे व तिकडून हिकडे मुसांड्या मारूं लागला; परंतु त्यास कोठे ही रस्ता मिळेना. शेवटीं तो चवताळला आणि कडें फोडून जाण्यासाठीं मुसांडी मारून पळत असतां, विठ्ठलरावांस असें वाटलें कीं डुकर हातचा जातो; सबब त्यांनीं घोड्यावरून तात्काळ उडी टाकिली आणि धांवतजाऊन डुकरास दोन्ही पायांत जोरानें दाबून धरिलें, व दोन हातांनीं त्याचे कान धरून त्याचें पळूनजाणें बंद केलें. अशा रीतीनें कैद्याप्रमाणें धरून ठेविलेल्या डुकरावर शाहूमाहाराज हे घोडा टाकीत धांवून आले आणि त्यांनीं त्यास भाला मारून तात्काळ ठार केलें.

विठ्ठलराव यांची विलक्षण शक्ति व अनिवार्य धैर्य पाहून माहाराजांस साश्चर्य संतोष वाटला. तेव्हां त्यांनीं विठ्ठलरावांस विचारिलें कीं, " तुम्ही कोण, कोठील राहणार, व येथें येण्याचें कारण काय. ?" या प्रश्नांवरून विठ्ठलराव यांनीं शाहूमाहाराजांस आपली सर्व स्थीति कळविली; आणि शेवटीं " सरकारचे बक्षी यांचें घरीं मीं भोजन करून निर्वाह करितों. " असें देखील सांगितलें. तें ऐकून माहाराजांनीं त्याच वेळेस विठ्ठलराव यांस बसण्यास सरकारी पागेंतील एक घोडा देऊन बारगिराचे पटांत त्यांचें नांव दाखल करवून त्यांस सदोदित हुजूर राहण्याची आज्ञा केली. ही गोष्ट सन १७१५

इ०सालीं झालीं. ह्याच काय तो विठ्ठलराव यांस प्रथम राजाश्रय मिळाला. परंतु शिंदेहोळकरवगैरे मराठे सरदार आणि फडकेपटवर्धनवगैरे ब्राम्हण सरदार हे जसे पेशव्यांचे चाकर म्हणवीत असत तसे विंचूरकर हे पेशव्यांचे चाकर नसून जुने सरदारांप्रमाणें हे माहाराजांजे पदरचे होते असें उघड दिसतें.

ज्या विंचूरकरांचे संस्थानावर पेशवाईत सहस्त्रावधी माणसांचा उदरनिर्वाह चालत होता त्या विंचूरकरांस आपल्या पोषणा सार्डीं प्रथम बक्षी यांचे आश्रयावर अवलंबून राहणें भाग पडलें ! बहुतेक प्रख्यात पुरुषांची मूळस्थिती पाहिली तर ह्याच प्रकार आढळून येईल. श्रीमंत घराण्यांत उत्पन्न होऊन द्रव्याची व सुखाची सदा रेलचेल, अशा प्रकारच्या स्थितींत वाढून पुढें मोठचा योग्यतेस चढलेले पुरुष वरच्या मानानें फारच कमी यांत संशय नाहीं. प्रत्येक मनुष्यास केव्हां तरी दुसऱ्याच्या टेंक्याची गरज लागते. प्रत्येकानें आपले पराक्रमावरच भरंवसा ठेवून चालावें ही गोष्ट जरी खरी आहे, तरी बाळपणीं मातेच्या संरक्षणावांचून मुलाचें ह्मणून चालावयाचेंच नाहीं. त्याचप्रमाणें थोर पुरुषांचा उदयकाळ येईतोंपर्यंत त्यांस दुसऱ्यांचें साह्य घ्यावेंच लागतें; आणि त्या प्रसंगीं जर दुसऱ्यांकडून त्यांस योग्य मदत न झाली तर ज्या पुरुषापासून पुढें शेंकडों पुरुषांस साह्य मिळावयाचें तो पुरुष समान्य पुरुषाप्रमाणें जागचे जागीं अप्रसिद्धच राहील.

पुढें कितीएक शिकारीचे प्रसंगांत आणि राजकीय कामांत माहाराजानीं विठ्ठलराव यांचें धैर्य व चातुर्य पाहील्यावर त्यांनीं त्यांस दाहा घोडचांची शिलेदारी देऊन हमेषा जवळ राहाण्याची आज्ञा केली. त्या वेळेस विठ्ठल शिवदेव यांचें वय एकवीस वर्षांचें होतें. विठ्ठलराव यांस शिलेदारी मिळाल्यावर त्यांनी आपलें लग्न केलें. त्यांची पत्नी वांईजवळील केंजळगांवाचे कुळकर्ण्याची कन्या होती. तिचें नांव त्यानीं रखमाबाई असें ठेविलें.*

* विंचूरकर यांचे दफ्तरांतील जुनी बखर.

मुंबई बेटानजीक जंजिरा ह्मणून एक बेट आहे. तेथें सन १७२० इ. सालीं सिद्दी साद नांवाचा नवाब अंमल करीत होता. त्यानें दक्षिण कोंकणांत अतिशय धामधूम केली. त्याचें पारिपत्य करण्यासाठीं शाहूमाहाराज यांनीं बाळाजी विश्वनाथ पेशवे यांचे धाकटे पुत्र चिमाजीआपा यांस त्याजवर पाठवून विठ्ठल शिवदेव हे एक मोठे बाहादर शिलेदार ह्मणून त्यांचे तैनातीस दिले. चिमाजीआपा हे सिद्दी साद याचे छावणीजवळ पोंहोंचतांच लढाई सुरू झाली. त्या लढाईंत विठ्ठल शिवदेव हे आपली कीर्ती व्हावी म्हणून अत्यंत उत्कंठित असतां, त्यांनीं खुद्द सिद्दी साद याजवर त्वेषानें हल्ला केला. त्या हल्ल्यांतच त्यांनीं त्या नवाबास कत्तलकरून त्याचे फौजेचा अगदीं मोड केला आणि त्याचे पुष्कळ घोडे हस्तगत करून आपले गोटांत आणिले.

या विजयाचा सविस्तर मजकूर चिमाजीआपा यांनीं माहाराजांस लेखीं कळविल्यावरून माहाराज फार खुष झाले; आणि त्यांनीं कोंकणांत चिमाजीआपांस असा हुकूम पाठविला कीं, "पेशव्यांचें निशाण पूर्वींपासून भगवें आहे त्यास आतां जरीपटका लावावा; तसेंच विठ्ठल शिवदेव यांनीं आपल्या बाहादुरीनें सिद्दीपासून जे घोडे हिसकावून घेतलेआहेत त्यांजवर स्वारांची नेमणूक करून त्या स्वारांची सरदारी विठ्ठल शिवदेव यांसच द्यावी." पुढें चिमाजीआपा हे सातान्यास आल्यावर त्यांनीं माहाराजांस लढाईची सर्व हकीकत कळविली. विठ्ठल शिवदेव यांजवर माहाराजांची मर्जी खुष होऊन त्यांनीं त्यांस पेशव्यांच्या मुलुकगिरींत हमेषा राहण्याविषयीं हुकूम केला. त्या दिवसापासून विठ्ठल शिवदेव हे पेशव्यांचे तैनातीस राहूं लागले. *

सन १७२० इसवीचे आकटोबर महिन्यांत एक विशेष गोष्ट घडून आली. ती अशी कीं, सातारचे मुख्य प्रधान बाळाजी वि-

* विंचूरकर यांचे दफतरांतील जुनी बखर.

श्वनाथ हे मरण पावले. त्यांच्यामागें त्यांचे वडील पुत्र बाजीराव यांस पंतप्रधानाचे हुद्यावर कायम करूंनये असें प्रतिनिधी व अष्टप्रधान मंडळीचें ह्मणणें होतें, कारण राजमंडळांत कोंकणस्थ ब्राह्मण नसावा अशी त्या मंडळीची इच्छा होती. या हरकतीमुळेंच कांहीं दिवस पर्यंत बाजीरावबल्लाळ यांस पेशवाईचीं वस्त्रें देणें तहकूब राहिलें होतें. तथापि शाहूमाहाराज यांनीं प्रधानमंडळीची जात्याभिमानजन्य हरकत न ऐकतां प्रधानाचे अंगीं चातुर्य आणि शूरत्व हे गुण असावयाचे ते बाजीराव यांचे अंगीं आहेत असें पाहून सन १७२१ इसवीचे आरंभीं त्यांस पेशवाईचीं वस्त्रें दिलीं. *

---

## प्रकरण २.

## थोरले बाजीराव साहेब यांच्या कारकीर्दींत विठ्ठल शिवदेव यांनीं केलेला पराक्रम.

---

सन १७१३ इसवी सालीं माळव्याचा सुभेदार आजिमुल्लाखान यानें आपला सरदार दाऊदखान यास बाजीरावसाहेब पेशवे यांजवर पाठविलें असतां, खानदेशांत बऱ्हाणपुरानजीक त्या उभयतांची गाठपडून लढाइ झाली, तींत विठ्ठल शिवदेव हे बाजीरावसाहेब पेशवे यांजबरोबर होते. त्यांनीं दाऊदखान याचा अगदीं मोड करून त्यास कत्तलकेलें; आणि त्याच्या फौजेची दाणादाण करून पूर्ण जय मिळविला. †

सन १७२४ इसवी सालीं बाजीरावसाहेब दिल्लीस गेले, त्या वेळेस ही विठ्ठल शिवदेव त्यांजबरोबर होते. त्यांनीं त्या स्वारींत दरएक वेळेस आघाडीची शिपाईगिरी केली, म्हणून त्यांस बाजीरावसाहेबांनीं फौज वाढविण्याचा हुकूम दिला.

---

* ग्रांटडफसाहेबांनीं केलेला मराठ्यांचा इतिहास.

† विंचूरचे दफ्तर.

वर पहिले प्रकरणांत मरढे येथिल अमृतस्वामी तीर्थयात्रा करण्यास गेले असें लिहिलें आहे. ते यात्रा करीतकरीत नीरा व भीमा ह्यांचे संगमतीर्थीं नृसिंहपूर म्हणून क्षेत्र आहे तेथें आले. नृसिंहाचें देवालय उभय नद्यांचें चिमटयांत असून जीर्ण दशेस आलें होतें; शिवाय, त्यानद्यांचे उदकाचे धक्यानें दोन्हीबाजूंस त्यादेवालयाचा पाया पुष्कळ खचलाहोता. त्याचा जीर्णोद्धार लवकर झालानाहीं तर तें शेवटीं लयास जाईल असें त्यांस वाटलें. स्वामी पुढें सर्व तीर्थयात्रा करून दाहा-बारा वर्षांनीं मरढे गांवास परत आले. त्यासंधीस विठ्ठलशिवदेव यांचा उत्कर्ष झाला असून त्यांस सरदारी मिळालीहोती आणि ते पेशवे बाजीराव व त्यांचे बंधू चिमाजीआप्पा यांजबरोबर परराज्यावरील स्वाऱ्यांत तरवार गाजवीतहोते. स्वामी मरढयास परत आल्याची खबर त्यांस कळतांच ते त्यांचे दर्शनास गेले, आणि त्यांचे चरणांवर मस्तक ठेउनउठल्यावर सद्गुरू कृपेनें आपला उत्कर्ष झाला होता त्या संबंधीं त्यांनीं सर्व हकीकत त्यांस निवेदन करून विज्ञापना केली. ते म्हणाले, “माहाराज! मी जन्मास येऊन जें कर्तव्य तें केलें. इतउत्तर चरणा संनिध राहून सेवा करण्याची आज्ञा मला द्यावी.” हें ऐकून स्वामी बोलले कीं, “अद्यापि तुझे हातांनीं मोटमोठालीं कृत्यें व्हावयाचीं आहेत. याकरितां तूं पेशव्यांचे संनीध राहून त्यांची एकनिष्टेनें सेवा कर, आणि नीतीनें वागून गाई ब्राह्मणांचें रक्षण कर.” नंतर भाषणाचा ओघ तीर्थयात्रेकडे वळला. त्यांत स्वामींनीं नृसिंहपूर येथील मुख्य देवाचें देवालय उभय नद्यांचे प्रवाहानीं अगदीं जीर्ण दशेस आलेंआहे असे त्यांस सांगून आज्ञा केली कीं, “तो देव तुझा कुलस्वामी आहे, याकारितां तूं त्या मंदिराचा जीर्णोद्धार कर.” विठ्ठलराव यांस ती आज्ञा शिरसावंद्य होती; परंतु त्यांनीं विनंती केली कीं, “माहाराज! मी गरीब आहे. एवढें मोठें महत्कृत्य माझ्या हातांनीं कसें घडेल.?” स्वामींच्या मुखांतून अशीच अक्षरें निघालीं कीं, “श्रीराम तुझ्यांत

हातांनीं तें काम करवील. " त्या आशीर्वचनाप्रमाणें विठ्ठलराव यांनीं पुढें कांहीं कालानें तें देवालय बहुत पैसा खर्च करून उंच व अधीक प्रशस्त व पक्क्या दगडांचें आणि मजबूत असें बांधिलें.

पुढें स्वल्प कालांतच आमृतस्वामी यांचेंमरढेंयेथें निरयाण झालें. त्यांचा मठ व एकांतांत बसण्याची गुहा अद्यापपर्यंत मरढें येथें कायम राहिलीआहे; शिवाय, कृष्णेच्या कांठीं त्यांचें पक्कें बांधीव वृंदावन हीं आहे. पुढें अमृतस्वामींच्या गादीवर त्यांचे मुख्य शिष्य पावनबावा हे बसले. त्यांचा वंश अद्यापपर्यंत त्यासंस्थानांत कायम आहे. *

सन १७३० इ० सालीं चिमाजीआपा यांची फौज माळव्यांत गेली होती, त्या वेळेस वीठ्ठल शिवदेव हे त्याफौजेबरोबर होते. दिल्लीचे बादशाहाकडून माळव्याचे सुभ्यावर दयाबहादूर नांवाचे सरदाराची नुकतीच नेमणूक झाली होती. त्या सुभेदारानें चौथ व सरदेशमुखी यांचा वसूलकरण्यास पेशव्यांस हरकत केली; त्यावरून दयाबाहादूर याशीं एक लढाई करण्याचा बेत झाला. त्या लढाईंत विठ्ठलशिवदेव यांनीं आपलें काम मोठ्याशौर्यानें व निर्भयपनानें बजावून दयाबाहादूर याचे फौजेची अगदीं दाणादाण केली आणि शेवटीं त्यास कत्तल करून पूर्ण जय मिळविला. †

सन १७३१ इसवी सालीं सयाजी गुजर यांस पेशव्यानीं गढेमंडळावर पाठवीलें. त्यावेळेस गुजर यांजबरोबर विठ्ठल शिवदेव यांस जाण्याची आज्ञा झाली. त्यालढाइंत विठ्ठल शिवदेव यांनीं तरवार गाजवून तो किल्ला सर केला. ही सर्व हकीकत गुजर यांनी पेशव्यांस कळविल्यावर त्यांची मर्जी खुष होऊन त्यांनीं विठ्ठल शिवदेव यांस एकपृथक टोळीचे सरदार केलें. या वेळेपर्यंत विठ्ठल शिवदेव यांस साताऱ्याहूनच तैनात मिळतहोती. पुढें सन १७३३ इ० सालापासून ती पेशवे यांजकडून मिळूंलागली.

---

* विंचूरचे दफतरांतील जुनी बखर.

† विंचूरकर यांची कैफियत.

सन १७३३ इसवी सालीं फरखाबादचा नबाव फत्तेखान बंगष याची नेमणूक दिल्लीचे बादशाहाकडून माळव्याचे सुभ्यावर झाली. तेव्हां त्यानें बुंदेलखंडावर स्वारी करून छत्रपूरचे राजास संकटांत घातलें. त्यामुळें छत्रपूरचाराजा छत्रसाल यास बाजीरावसाहेब पेशवे यांची मदत मागणें भागपडलें.* त्या राजानें बाजीरावसाहेबांस मोठ्या मिन्नतवारीनें पत्र लिहिलें कीं, " माझ्या राज्याचें संरक्षण करावें. " बाजीरावसाहेब त्यावेळेस माळव्यांत होते. त्यांनीं मोठ्या षिताबीनें कूच करून बंगष याजवर छापा मारीला. तेव्हां बंगष याच्या फौजेची धूळधाणी होऊन त्यास त्या प्रांतांतून पळूनजावेंलागलें. त्या हल्लयांत विठ्ठल शिवदेव हे पेशव्यांच्या उजवे बाजूस असून त्यांनीं पेशव्यांबरोबर आपलें काम मोठ्या बाहादुरीनें बजाविलें. †

सन १७३९ इसवी सालीं चिमाजीआपा यांनीं वसईचा किल्ला सर करण्याची कामगिरी अपल्याकडे घेतली. त्यास्वारींत त्यांजबरोबर विठ्ठल शिवदेव होते. त्यावेळेस वसई आणि तिचे आसपासचे गांव यांची स्थिति फारच चमत्कारिक झाली होती. पोर्तुगीज लोकांनीं समुद्रकिनाऱ्यावरील पुष्कळ गांवें बाटविलींअसून धर्माचेबाबदींत त्यांनीं हिंदूलोकांवर पराकाष्टेचा जुलूम चालविला होता. सर्व कोंकणप्रांत फिरंगाणाचा करून सोडावा असा त्या लोकांनीं घाट घातलाहोता. या गोष्टींचीं चिन्हें त्या प्रांतीं गेलें असतां अद्यापी दिसून येतात. त्यांनीं ठाण्याचे आसपासचीं पुष्कळ गांवें बाटविल्यामुळें हाल्लीं तिकडे किरिस्तांव लोकांची वस्ती पुष्कळ वाढली आहे. असो; पोर्तुगीज लोकांच्या ताब्यातून वसईचा किल्ला घेण्यासाठीं ज्यावेळेस चिमाजीआपा यांनीं लढाई सुरूकेली, त्या वेळेस त्यांजबरोबर मुख्य सरदार म्हटले म्हणजे मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे,

* हा सविस्तर वृत्तांत ' श्रीमंत बाजीराव बल्लाळ पेशवे यांचे चरित्रांत ' रावसाहेब नागेशराव विनायक बापट यानीं उत्कृष्टरितीनें लिहिला आहे.

† विंचूरचे दफ्तरांतील जुनी बखर.

विठ्ठल शिवदेव, शंकराजी नारायण, मानाजी आंग्रे, व खंडोजी मानकर हे होते. कांहीं दिवस लढाई चालल्यानंतर पोर्तुगीज लोकांचे किल्लेदारानें विनंती केली कीं, "जंजिऱ्याचे सिद्दीबरोबर जसा तुमचा करार झालाआहे, तसा करार आम्हांबरोबर कराल तर आम्ही आसपासचा मुलुक सोडून देतों." परंतु ती गोष्ट चिमाजीआपा यांचे मनास आलीनांहीं, कारण, त्यांस असें वाटलें कीं, असा मजबूत किल्ला शत्रूचे हातीं असतां आपण तेथून निघूनगेलों तर ते लोक दिलेला मुलुक सहज परत घेतील. याकरितां किल्ला सर केल्याशिवाय परत जाणें प्रशस्त नव्हे. मग लढाई पुनः झपाट्यानें चालू झाली. चिमाजीआपा यांचे मनांत बरसात सुरूहोण्यापूर्वी कसेंही करून किल्ला सरकरावा असें होतें. सबब त्यांनीं अनेकप्रकारें यत्न चालविला. तो असा कीं, मैदानांत जागोजाग मोर्चे बांधिले आणि किल्यावरील तोफांचा मारा चुकवून, एका मोर्च्यांतून दुसऱ्या मोर्च्यांस जाण्याकरितां सलाबतकूचा (ह्मणजे जमीन खणून आंतून नागमोडीच्या आकाराचा रस्ता) तयार केला. किल्यावरून त्यांजवर तोफा व गरनाळा यांचा वर्षाव सदोदित होत असे. त्यांमुळें लोक बहुत मरत. किल्यांत तोफा पुष्कळ होत्या; परंतु मराठ्यांनीं आपले मोर्च्यांत त्यांहीपेक्षां मोठाल्या तोफा व गरनाळा लावून शत्रूच्या तोफा बंद केल्या आणि किल्याचे तटास तोफेच्या गोळ्यांनीं हल्ला पोहोंचविण्यासारखा रस्ता केला. परंतु पोर्तुगीज लोकांनीं आपल्या सर्व तोफांचा भडिमार त्या एकाच ठिकाणावर केल्यामुळें मराठ्यांस आंत शिरतांआलेंनाहीं. नंतर फेब्रुवारीचे १७ वे तारिखेस मराठ्यांनीं किल्ल्यास पूर्ण वेढा दिला. तथापि तीन महिने पर्यंत किल्ला हातीं आला नाहीं. दोहींकडील युद्धनिपुणतेची कमाल झाली. मराठ्यांच्या शूर शिपायांनीं होती तितकी पराकाष्ठा करून पाहिली; पण सर्व व्यर्थझाली. शेवटीं त्यानीं किल्यास पांचठिकाणीं सुरुंग लाविले. त्यांपैकीं दोन उडाले; तेणेंकरून तटास मोठें खिंडार पडलें. त्यावाटेनें

किल्यांत शिरण्याकरितां मराठे जवळ गेले; परंतु दुर्दैवेंकरून त्या वेळेस तटाचा तिसरा सुरुंग उडाला; तेणेंकरून पुष्कळ लोक पडले, व पोर्तुगीज लोकांनीं तीसंधी साधून गोळ्यांचा एकसारखा भडिमार चालविला; बंदुकांचा मारा तर असा केला कीं, त्या वेळेस मराठ्यांस मागें हटणें भाग पडलें. ते मागें हटतांच पोर्तुगीज लोकांनीं त्याखिंडारांत तात्काळ दगड रचून तो मार्ग बंद करून टाकिला. तटाचा एक सुरुंग मात्र उडणें राहिला होता. तो उडविण्याचे काम मल्हारराव होळकरांनीं पत्करिलें होतें. त्या सुरुंगास त्यांनीं बत्ती दिली त्या वेळेस तो चांगला उडून किल्याचा अर्धा बुरूज कोसळून पडला. नंतर मराठ्यांनी पुनः हल्ला केला; परंतु पोर्तुगीज लोकांनीं मातीच्या टोपल्या भिंतीसारख्या रचिल्या आणि त्यांजवर तोफा लावून याही वेळेस मराठ्यांचा हल्ला फिरविला. तत्रापि, पोर्तुगीज लोकांजवळ दारूगोळा फार थोडा शिलक राहिला असून खाण्यापिण्याचे पदार्थ तर संपतच आलेहोते. त्या कारणामुळें कसा तरी ठराव करून आपले जीव जगवावे ह्मणून त्या लोकांनीं कांहीं शर्तींनीं किल्ला स्वाधीन करूनदेण्याविषयीं पेशव्यांशीं बोलणें लाविलें. तें बोलणें मान्य झाल्यावर पोर्तुगीज लोक आपल्या मुलाबाळांनिशी जाहाजांत बसून निघून गेले. नंतर मराठे लोकांनीं किल्यांत प्रवेश केला. या लढाइंत पोर्तुगीज लोकांकडील मेलेले व जखमी मिळून आठशांहून जास्त झाले नाहींत, कारण ते युद्धाचे कामांत बरेच कुशल असून शिवाय किल्याच्या आश्रयानें लढत होते. मराठे लोकांकडे माणसांचें नुकसान पांच हजारांवर झालें. *

हा जय झाल्यावर पुढें कोंकणप्रांत निर्वेध ताब्यांत येण्याकरितां विठ्ठल शिवदेव यांनीं बरोबर एक जैय्यद फौज घेऊन समुद्रकिनाऱ्यावरील साष्टी, कल्याण, वगैरे ठिकाणांवर हल्ले केले आणि पोर्तुगीज लोकांशीं लढाया करून तीं सर्व ठिकाणें काबीज

* ग्रांडडफकृत मराठ्यांचा इतिहास.

केली; आणि पोर्तुगीज लोकांस हांकूनदेऊन सर्व कोंकण प्रांतांत पेशव्यांचा अंमल बसविला. *

सन १७४० इसवी सालीं बाजीरावसाहेब उदेपूर, जयपूर, बुंदी, कोटा वगैरे ठिकाणचे रजपूत राजांबरोबर गुप्त स्नेह करून सर्वांच्या ऐक्यानें उत्तर हिंदुस्थानांतील मोघलांची सत्ता अजीबाद नाहींशी करण्याची मसलत करण्याकरितां त्या प्रांतीं गेले. त्याही वेळेस विठ्ठल शिवदेव हे त्यांजबरोबर होते. बाजीराव साहेब साताऱ्याहून निघालें ते सत्तावीसाव्या दिवशीं हिंदुस्थानांत धन्नापन्ना यास जाऊन पोंहोंचलें. या सत्तावीस दिवसांत त्यांनीं घोडयावरचें खोगीर देखील उतरिलें नाहीं. वरसांगितलेल्या रजपूत राजां पैकीं विशेषेंकरून छत्रपूरचा राजा छत्रसाल हा नुकताच मरण पावला असून त्याचे दोन पुत्र जगदेव व हरदेसा असे होते; त्यांजबरोबर बाजीराव साहेबांचा विशेष स्नेह जडला. या दोन राजांचे वडिलावर बाजीरावसाहेब यांनीं सन १७३३ इसवी सालीं बंगष यास बुंदेलखंडांतून हाकून देंण्याचे कामांत महदुपकार केले होते, ते त्या उभयता बंधूनीं स्मरून, आपल्या पित्यानें बाजीराव साहेबांसाठीं जो तेहतीस लक्षांचा मुलुक ठेविला होता तो त्यांचे स्वाधीन केला आणि परस्परांनीं परस्परांस साह्य करण्याच्या शपथा करून करारमाना केला. त्यांतील शर्ति येणेंप्रमाणें:—

१. त्या उभयतां बंधूंनीं यमुना आणि चंमेल यांचे पलीकडचा मुलुक खेरीज करून बाकी सर्व मुलुकांवरील स्वाऱ्यांत बाजीराव साहेबांबरोबर जाऊन आपल्याबरोबरच्या फौजेच्या मानानें सर्व लुटींत आणि जिंकलेले मुलुकांत वांटणीदार व्हांवें.

२. बाजीरावसाहेब दक्षिणेंतील युद्धांत गुंतले म्हणजे त्यांबंधूंनीं बुंदेलखंडाचा किमानपक्ष दोन महिनेपर्यंत तरी बचाव करावा.

---

* विंचूरचे दफ्तरांतील बखर.

३. छत्रसाल राजे यांनीं बाजीरावसाहेब यांस पुत्राप्रमाणें मानिलें होतें ह्मणून बाजीरावसाहेबांनीं त्यांच्या त्या दोन पुत्रांचें बंधुप्रमाणें रक्षण करावें.

या वेळेस निजाम-उल-मुल्काचा पुत्र नासिरजंग हा औरंगाबादेजवळ थोड्या फौजेनिशीं होता. तीखबर बाजीराव यांस लागल्यावरून त्यांनीं तेथें मोठ्या त्वरेनें येऊन त्या राजपुत्रास एकाएकीं घेरिलें. परंतु त्यास वेळेवर कुमक आल्यामुळें मोठी लढाई झाली. त्या लढाईत विठ्ठल शिवदेव यांनीं शूरत्वाची कमाल केली. शेवटीं मुंगीपैठण येथें तह ठरला. त्यांत निजामानीं पेशव्यांस नर्मदेच्या काठीं दोन माहाल व चांदवड परगण्यांतील कांहीं गांव जाहागीर दिले. पैकीं चांदवड माहालांतील गांव पेशव्यांनीं विठ्ठल शिवदेव यांचे पागेचे खर्चाकडे लावून दिले.

नंतर बाजीराव साहेब पुनः हिंदुस्थानांत जाण्यास निघाले; परंतु नर्मदेच्या कांठीं एकाएकीं त्यांची प्रकृति बिघडून ता. २८ एप्रिल सन १८४० इसवी रोजीं त्यांस देवाज्ञा झाली.

सन १७४१ इ० सालीं बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब यांस शाहूमाहाराजांनीं पेशवाईचीं वस्त्रें दिलीं. पण मध्यंतरीं नानासाहेब यांस तीं वस्त्रें देऊंनयेत अशी नागपूरचे रघोजी भोसल्यांनीं माहाराजांस भीड घातलीहोती. त्यांनीं माहाराजांस गुप्तपणें असे सांगितलें होतें कीं, “ येथें बापूजीनाईक बारामतीकर ह्मणून एक मराठे श्रीमंत गृहस्थ आहेत; त्यांस पेशवाईचीं वस्त्रें दिलीं तर ते आपणांस पुष्कळ पैसा देतील. ” पण दाखविलेली लालूच तुच्छ मानून छत्रपतींनीं नानासाहेबांसच मुख्य प्रधानकेलें. *

---

* ग्रांटडफकृत मराठ्यांचा इतिहास.

## प्रकरण ३.

### बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब यांचे कारकीर्दीत विठ्ठल शिवदेव यांनीं केलेला पराक्रम.

---

सन १७४३ इसवी सालीं नागपूरचे रघोजी भोंसल्यांचे सेनापती भास्करपंत हे बंगालप्रांत सर करण्याचे इराद्यानें मुर्शदाबादेकडे कूच करून त्या प्रांतांत लूट करूंलागले असतां, त्या प्रांताचा बादशाही सुभेदार अलिमर्दाखान् यानें त्यांजवर पुष्कळवेळा हल्ले करून त्यांचे मोड केले; परंतु ते पुनःपुनः येऊन मुलुक लुटूं लागले. त्यामुळें त्यासुभेदारास पुष्कळ खर्च येऊन त्यास दिल्लीचे बादशाहास पाठविण्यास त्या प्रांतांतील काळींचे वसुला पैकीं कांहींच ऐवज राहात नसे. ह्या गोष्टीचा इतल्ला त्यानें बादशाहास केला. याचसंधीस बाळाजी बाजीराव पेशवे हे बादशाहापाशीं माळव्याची सनद मागत होते. त्यांस बादशाहानें असें कळविलें कीं बंगाल सुभ्यांत जाऊन नागपूरचे जे मराठे तेथें लूट करितात त्यांस हाकून दिलें असतां तुम्हास त्या सुभ्याचे एक वर्षाचे वसुलाची चवथाई बक्षिस देण्यांतयेईल व त्याशिवाय माळव्याची सनद ही देण्यांत येईल. नागपूरचे रघोजीभोसले यांनीं पूर्वी सन १७४१ इ० सालीं पेशव्यास पेशवाईचीं वस्त्रें देऊंनये असा शाहू माहाराजांस आग्रह केला होता; त्यामुळें त्यांजविषयीं पेशव्यांचे मनांत शत्रुभाव होताच; तशांत त्यांस ( भोसल्यांस ) बंगाल्यांतून हाकून देण्याविषयीं पेशव्यांस बादशाहाची सूचना झाली, तेणें करून त्यांस भोसल्यावर स्वारी करण्यास योग्यकारण होऊन त्यांनीं साठ हजार फौजेनिशीं प्रयागावरून बंगाल्यांत कूच केला. या स्वारींत नाना साहेब पेशव्यांबरोबर विठ्ठल शिवदेव हे होते. पेशव्यांनीं भोसल्यांस बंगालचे दक्षिणेकडील सरहद्दीवर गांठून त्यांचे फौजेवर झपाट्यानें हल्ला केला, आणि त्यांचा मोड करून त्यांस

बंगाल्या बाहेर हाकून लाविलें. * नंतर पेशवे नाना साहेब यांनीं कटक प्रांतांत शिरून तेथें अमल केला आणि भोसले यांचे गोंडवण वगैरे प्रांतांपासून खंडण्या घेऊन ते माळव्यास परत आले. या संपुर्ण मोहिमेंत विठ्ठल शिवदेव यांनीं आघाडीच्या कामगिऱ्या बजाविल्या असून मुख्यत्वेंकरून त्यांच्याच बाहादुरीमुळें पेशव्यांचा हरएक लढाईत जय झाला. सबब नानासाहेब यांस दिल्लीचे बादशाहाकडून माळव्याची सनद मिळून त्यांत त्यांचा अमल पूर्णरीतीनें बसल्यानंतर त्यांनीं विठ्ठलशिवदेव यांस उत्तर हिंदूस्थानांत फौजेचे खर्चाकरितां अकरा माहाल सरंजाम करून दिले व शिवाय पुर्णे प्रांतीं रासें व मांडकी या नावांची दोन गांवें त्यांच्या जात सरंजामास लावून दिलीं. †

वरलिहिल्याप्रमाणें पेशवे यांजकडून नागपूरचे भोसले यांचा मोड झाला; परंतु तेणें करून त्यांचें पेशव्याशीं वैरवाढून त्यांनीं पुण्यावर स्वारी करण्याची तयारी चालविली आणि दक्षिणेंत जे कितीएक मराठे सरदार पेशव्यांस प्रतिकूळ होते त्यांस आपले साह्य संकेती करून घेतलें. ह्या प्रमाणें आपसांत लवकरच मोठी लढाई होण्याचा संभव दिसूं लागला; परंतु शाहू माहाराज मध्यें पडले आणि त्यांनीं उभयतांस स्वाऱ्या करण्याकरितां निरनिराळे मुलुक नेमून देऊन पृथक सनदा करून दिल्या; तेणें करून उभयतांचा समेट झाला.

सन १७४४ इ० सालीं विंचूर येथें नंदाजी दरेकर या नांवाच्या एका मराठे पेंढाऱ्यानें दंगा केला होता. तो मोडण्यासाठीं पेशव्यांनीं विठ्ठलशिवदेव यांस पाठविलें असतां, त्यांनीं त्या पेंढाऱ्यावर जाऊन रात्रीं विंचूर येथें त्याजवर छापा घातला; आणि त्यास कत्तलकरून तेथें आपला अंमल चालूकेला. त्या बाहादुरीबद्दल

* ग्रांड डफ कृत मराठ्यांचा इतिहास.

† विंचूरचे दफ्तरांतील जुनी बखर.

पेशव्यांनीं विठ्ठल शिवदेव यांची मोठी वाहवा करून त्यांचे पतकाचे गुजाऱ्यास उत्तर हिंदुस्थानांत पूर्वी जो सरंजाम दिलाहोता त्यांत विंचूर हें गांव सामील करूनदिलें. ह्याच वेळेस विंचूर गांवचें पाटीलकीचें वतन ही विठ्ठलशिवदेव यांस वंशपरंपरेनें मिळालें. त्या वेळेपासून विठ्ठल शिवदेव हे विंचूरयेथें वाडाबांधून राहूं लागले., व त्याच कारणानें त्यांस विंचूरकर असें लोक ह्मणूं लागले.

पुढें सन १७४९ इसवी सालीं शाहू माहाराज आपला सर्व राज्यकारभार बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब पेशवे यांचे स्वाधीन करून कैलासवासी झाले. नंतर पेशवे हे पुणें शहर संपूर्ण मराठी राज्याची राजधानी करून तेथें राज्यकारभार चालवूं लागले. तेथें बाजीराव साहेब पेशवे यानीं शनवारचा वाडा पूर्वींच कांहींसा बांधिला होता. त्याची नानासाहेब यांनीं पूर्णता केली आणि पदरच्या बहुतेक सरदारांस व इतर लोकांस निरनिराळ्या जागा नेमूनदेऊन तेथें आपले वाडे बांधण्याची त्यांस परवानगी दिली. विठ्ठल शिवदेव यांसही शनवार पेठेंत श्री ओंकारेश्वराचे देवळाचे दक्षिण बाजूस जागा मिळाल्यावरून त्यांनीं तेथें वाडा बांधिला. त्यांचा मुक्काम पुण्यांत असला ह्मणजे ते त्यावाड्यांत राहात, आणि त्यांचे फौजेचा तळ नदीचे उत्तरेकडील किनाऱ्याजवळ पडत असे. वरलिहिल्याप्रमाणें पेशवे यांजकडून सरदार, मानकरी आणि सावकारलोक यांस पुण्यांत वाडे बांधण्याची परवानगी मिलाल्यावरून तेथें पुष्कळ मोठमोठाले वाडे होऊन वस्ती झपाट्यानें वाढूं लागली, आणि जेंपुणें पूर्वी कसबें म्हणवीत होतें तेंपुणें पुढें शहर म्हणवूंलागलें.

शाहू माहाराजांचें दफ्तर त्यांचे चिटणीस ठेवीतअसत.त्यांत जमाखर्च वगैरे कारकुनी लिहिणें असे. परंतु राज्य दिवसांदिवस वाढत चाललें असतां, पुढें लिहिणें कसें टेवावें हा प्रश्न येऊन पडला. त्या काळीं लिहिणारे ह्मटले म्हणजे विशेषेंकरून परभू व शेणवी

हेच असत, कारण, शिवाजीमाहाराजांपासून मुत्सदी, अमलदार आणि कारखानदार परभूच असत, पण त्यांच्या आंगीं मोठ्या राज्यास आळा घालण्याचें सामर्थ्य नव्हतें. त्यावेळेस राज्याचा किता काय तो मोघलांचाच होता. याकरितां पेशव्यांनीं दिल्लीहून दोन मुनशी पुण्यास आणविले आणि त्यांपासून मोघलाई पद्धतीचे नमुने लिहून घेववून त्याप्रमाणें राज्याची पद्धत चालू केली. ती अशी कीं, सरसुभे, दरकदार, हुजूरचे दिवाण, फडनवीस, मजमदार, वगैरे हुद्देदार नेमिले, आणि असें ठरविलें कीं मजमदार यानीं सरसुभे आणि सरदार यांचे दफ्तरदार नेमावे. पेशवाईंत पुणें, कोंकण, नगर, खानदेश, गुजराथ, आणि करनाटक हे सरसुभे होते. शिंदे, होळकर, वगैरे सरदार होते. त्यांजपाशीं हुजूरचे दरकदार असत. त्यांचे विद्यमाने हुजुरास हिशेब येतअसत. हुजूर जें मोठें दफ्तर होतें त्यास "फड" असें म्हणत असत. त्या फडावर कोंकणचे ब्राम्हण लिहिणें शिकून राहूंलागले. त्याकाळीं बाळाजी बाजीरावपेशवे यांचें मोडीचें अक्षर उत्तम होतें, म्हणून ते कोंकणस्थ ब्राम्हणांस स्वतः कित्ते घालून देऊन विद्यावृद्धीस उत्तेजन देत असत.

सन १७५२ इ० सालीं नानासाहेब व भाऊसाहेब हे विठ्ठल शिवदेव यांस फौजेसुद्धां बरोबर घेऊन कर्नाटकचे स्वारीस गेले. प्रथम त्यांनीं श्रीरंगपट्टणास जाऊन तेथील राजापासून खंडणी घेतली. त्या स्वारींत विठ्ठल शिवदेव यांनीं होळिहोनूर किल्ला मोठ्या जुररीनें सर केला. ही मोहिम करून पेशवे पुण्यास परत आल्यावर सन १७५३ इ० सालीं नानासाहेब पेशवे यांचें मनांत आलें कीं, आपले कनिष्ट बंधू राघोबादादा यांस प्रांतांतून स्वारीस पाठवित जावें; म्हणजे त्यांच्या चपल मनांत पराक्रम करण्याची उम्मेद उत्पन्न होईल, आणि आपणास निष्काळजी राज्यकारभार पाहाण्यास व त्यांत सुधारणा करण्यास ठीकपडेल. नानासाहेब

हे आपल्या वडिलांप्रमाणें मेहेनती नसत असें इतिहासांत सांगितलें आहे. राघोबादादा मात्र शूर असून फार चालाख असत. स्वारींत पंचवीस-तीस कोसांचे मुक्काम करणें हें चापल्य त्यांच्या आंगी सहजीं होतें, ह्या त्यांच्या चंचल वर्तनावरून शिपाई लोक त्यांस " राघोबा भरारी " असें ह्मणतअसत. असो; नानासाहेबांनीं सखारामबापू यांस राघोबादादांचें कारभारी नेमून विठ्ठल शिवदेव यांस त्यांच्या सर्व फौजेचें आधिपत्य दिलें. याप्रमाणें त्यांनीं योजना करून गुजराथच्या स्वारीवर राघोबादादांची नेमणूक केली.

राघोबादादांची स्वारी गुजराथेंत शिरल्यावर प्रथम त्यांनीं सुरतेचें ठाणें मारून तेथें आपला अमल बसविला. नंतर त्यांनीं ठिकठिकाणीं ठाणीं बसवून उरपाड माहाल विठ्ठल शिवदेव यांनीं सर केला होता म्हणून त्यामाहालाची वहिवाट त्यांचेच हवालीं केली. परंतु ह्या दुसऱ्या कामांस दिवसगत लागल्यामुळें अहमदाबाद शहर घेण्याचें जें मुख्यकाम तें नेमलेले वेळेवर झालें नाहीं. ह्मणून राघोबादादांचे मदतीसाटीं तावडतोब जाण्याविषयीं पुण्याहून दत्ताजी शिंदे यांस हुकूम लिहून गेला. ही बातमी राघोबादादा यांस कळल्यावर ते व सखारामबापू यांनीं विठ्ठल शिवदेव व नारो शंकर राजेबाहादर यांस बोलवून सांगितलें कीं " शिंदे येण्यापूर्वी अहमदाबाद शहर व किल्ला हस्तगत झाला तर आपला नक्षा राहील; नाहीं तर ते यशाचे वांटेकरी होतील. " तें ऐकून उभय सरदारांनीं शिंदे येण्यापूर्वी किल्ल्यासुद्धा अहमदाबाद शहर सरकरण्याचा पत्कर घेतला, आणि लागलीच आपापल्या फौजांची तयारी करून किल्ल्यावर चाल केली. हें वर्तमान मोघल बादशाहाचा सुभेदार जवांमर्दखान बाबी यास कळतांच त्यानें मोठ्या शौर्यानें त्यांचा सामना केला; परंतु त्याचा अगदीं मोड होऊन त्यास पळून जावें लागलें, आणि शेवटीं किल्ला व शहर विठ्ठल

शिवदेव व नारो शंकर यांनीं सरकरून त्यावर पेशव्यांचा झेंडा उभा केला. नंतर जंबामर्दखान याने रघुनाथराव यांशीं तहाचें बोलणें लाविल्यावरून त्यांनीं उदारमनानें त्याजकडे पट्टन, राधनपूर वगैरे परगणें कायम ठेविलें. * नानासाहेब पेशवे यांचे हुकुमावरून दत्ताजी शिंदे पुष्कळ फौजेनिशीं कोंडाई बारींतून रघुनाथराव यांचे मदतीस त्वरेनें चालले होते; परंतु त्यांस त्याजयांचे वर्तमान मार्गांत समजल्यावरून ते अहमदाबादेस सावकाशीनें जाऊन पोंहोंचले. ह्या मोठ्या जयामुळें संपूर्ण गुजराथेंत पेशव्यांचें तेज पडून त्यांतील राजे रजवाडे यांजवर दरारा बसला. याच वेळेस विठ्ठल शिवदेव यांस रघुनाथराव यांनीं अहमदाबाद येथें सातशें रुपयांच्या दरकी असाम्या करून दिल्या व नारो शंकर राजे बाहादर यांजकडे ही जंबुसर माहालाची वहिवाट सांगितली. ह्या सर्व गोष्टी रघुनाथराव यांनीं नानासाहेब पेशवे यांस लिहून कळविल्यावर त्यांनीं त्यांस उत्तर हिंदुस्थानचे स्वारीस जाण्यांविषयीं हुकूम पाठविला. वरलिहिलेल्या मोहिमेंत दमाजी गायकवाड हे रघुनाथराव यांजबरोबर होतेच. त्यांजकडे गुजराथ प्रांताचा बंदोबस्त सोंपूनदेऊन रघुनाथराव हे पुढें मेवाडाकडे चालते झाले.

रघुनाथराव उत्तरहिंदुस्थानचे हद्दींत गेल्यावर मल्हारराव होळकरांचे पुत्र खंडेराव हे त्यांस येऊन मिळाले. मग हें संपूर्ण मराठी लष्कर अजमीर प्रांतांत शिरलें. तेथें रघुनाथराव यांनीं चौथ व सरदेशमुखी वसूल केल्यावर ते तेथून खंडण्या घेत घेत भरतपूरचे जाटराजाचा कुंभेरी नांवाचा किल्ला याजजवळ पोंहोंचले. जाटराजानें त्यांस खंडणी देण्याचे नाकबूल केल्यावरून रघुनाथराव यांनीं त्या किल्ल्यास वेढा घालून त्याजवर तोफांचा भडिमार चालविला. या लढाईंत खंडेराव होळकर पडले; परंतु शेवटीं जाट राजास पेशव्यानां खंडणी देणें भागपडलें.

---

* ग्रांडडफकृत मराठ्यांचा इतिहास.

रघुनाथराव यांचा तळ कुंभेरीजवळ असतां, त्यांस दिल्लीचे बादशाहचा वजीर मीरशाबुद्दीन यानें दिल्लीस येण्याविषयीं विनंती लिहिली; त्यावरून ते तिकडे जाऊन संपूर्ण मराठी लष्कराचा तळ त्या शहराजवळ पडला. त्यांतच विठ्ठल शिवदेव यांचे फौजेचा गोट होता.

कुंभेरीस वेढा असतां विठ्ठल शिवदेव यांची पत्नी रखमाबाई यांस देवाज्ञा झाली. पुढें दिल्लीस स्वारी गेल्यावर वधूचा शोध करण्यास्तव विठ्ठलराव यांनीं कालपी वगैरे टिकाणीं कारकून रवाना केले. त्यांनीं कालपीसच वधू पाहून लग्नाचा निश्चयकेल्यावर विठ्ठलराव यांनीं सडया स्वारीनिशीं तेथें जाऊन लग्न केलें. हें लग्न यमुनातीरीं झाल्याकारणानें या स्त्रीचें नांव यमुनाबाई असें ठेवण्यांत आलें. * नंतर ते दिल्लीस परत जाण्यास निघाले. वाटेनें त्यांचा मुक्काम ग्वाल्हेरीजवळ झाला. त्या वेळेस त्यांच्या फौजेंतील कांहीं स्वार, कही करण्यास ( घोडयांस चंदी वैरण वगैरे सरंजाम मिळविण्यास ) गेलें असतां त्यांची व जाट राजाचे एके टोळीची गांठ पडून तिनें त्या स्वारांस कही कर्ण्याची मनाई केली. त्यावरून उभयतांची चकमक झडली. तींत विठ्ठलराव यांजकडील कांहीं स्वार मारले जाऊन बाकीचे जाटलोकांनीं धरून नेले. तेस्वार सोडविण्याकरितां विठ्ठलराव यांनीं जाट राजाकडे वकील पाठविला; परंतु त्या वकिलाची आणि राजाची भेट न होतां त्याचे दिवाणाचीभेट झाली. उभयतांचें बोलणें झालें त्यांत त्या वकीलास दिवाण म्हणाला कीं, "तुम्हांस कुंभेरीस जय मिळाला त्यामुळें तुम्ही फार चढलां आहांत आणि आम्हांसारख्या शूर जाटांच्या राज्यांत शिरून निर्भयपणें वर्तन करितां हें तुमच्या नाशाचे कारण आहे. तुम्ही ब्राह्मण, शूरत्व हा विषय तुमचा नव्हे! तूमचे मालिक पेशवे यांस आम्ही जाणतों. त्यांचे तुम्ही सरदार आहां. तुम्हांस हि आम्ही ओ-

* विंचूरचे दफ्तरांतील जुनीबखर.

ळखतो. आतां जर तुम्हांस कैद केलेले स्वार सोडवावयाचे असतील तर, तुम्हीं आमचे राजधानींत परवानगीवांचून मुक्काम केला त्याबद्दल अगोदर माफी मागा; म्हणजे आमचे राजे तुम्ही ब्राम्हण म्हणून तुम्हांस माफी देतील आणि तुमचे जे स्वार कैदेंत आहेत त्यांस ही सोडूनदेतील." हें भाषण ऐकून वकील परत गेला आणि त्यानें सर्व मजकूर विठ्ठलरावांस कळविला. तो ऐकून विठ्ठलराव यांस अत्यंत त्वेष येऊन त्यांजपाशीं जी काय थोडीशी फौज होती तिजवरील हुद्देदारांस त्यांनीं लढाईचे तयारीचा हुकूम केला; आणि आपण ही स्वतः तयार झाले. त्यांची फौज दिल्लीस होती ती त्यांनीं तोफखान्यासहित तेथे बोलाविली; आणि नवीन फौजेची भरतीकरण्यास्तव कलमजारी करून थोड्याच दिवसांतजाटाशीं लढाई सुरूकेली आणि दिल्लीची फौज आल्यावर ग्वाल्हेरचे किल्यास वेढा घालून किल्याबाहेर जाण्यायेण्याचे सर्व मार्ग बंद केले आणि मोर्चे बांधून किल्यावर तोफांचा मारा सुरू केला. तो पाहाडी किल्ला बहुत मजबूत असून जाट शिपाईही मोठे कट्टे लढणारे असल्यामुळें दक्षिणी फौजेचा कांहीं इलाज चालेना. लढाईस तीन महिने गुजरल्यावर दिल्लीहून सखारामबापू यांचे सल्यानें राघोबादादा यांजकडून विठ्ठलराव यांस असा हुकूम आला कीं, "जाटाबरोबर लढाई सुरू करण्यास तुह्मीं आज्ञा घेतली नाहीं व किल्ला कोणते प्रकारचा आहे याचा विचार मनांत न आणितां एकदम लढाई चालूकेली हा वेडेपणा केला आहे. आतां या युद्धास जो खर्च होईल तो तुह्मांस सरकारांतून मिळणार नाहीं व शेवटीं अपयश येईल त्याबद्दल तुम्हांपासून सरकार सक्तीनें जबाब घेईल." हा सर्व मजकूर राघोबादादांनीं पुण्यास नानासाहेब पेशवे यांस ही लिहूनपाठविला. विठ्ठलराव यांस हा हुकूम पोहोंचला. तथापि धैर्य न सोडितां त्याराञीस आपल्या फौजेंतील सर्व सरदार एकत्र करून ते त्यांस म्हणा-

ले कीं, " अजूनही किल्ला हस्तगत न होईल तर लढाइत मरून जाणें बेहेत्तर आहे; जय झाल्याशिवाय मालिकांस तोंड दाखविणें वाजवी नाहीं." त्याजवर आपाजी मुढे बोलले किं, " उदईक बेलाशक हल्ला करावा. मी आघाडीस जातो आणि सुरुंग लावून किल्लयाचा दरवाजा उडवून देतों. तुम्ही मागोमाग हल्ला करून किल्ला स्वाधीन करून घ्यावा." याप्रमाणें बेत टरल्यावर विठ्ठलराव यांनीं सूर्योदयापूर्वी स्नानसंध्या केली आणि आपला कुलस्वामी नरहरी यास नमस्कार करून असा पण केला कीं, "आज मी हा किल्ला सरकरीन किंवा लढाइत आपला प्राण खर्ची घालीन." नंतर दृढ निश्चयानें बाहेर निघून त्यांनीं हल्लयाची सुरुवात केली. दोन प्रहरचे सुमारास आपाजी मुढे हे किल्याचे दरवाज्या जवळ जाऊन पोंहों-चले. या बिकट समयीं निकराची लढाई करून जय मिळविला पा हिजेअसें जाटांस वाटलें. तेव्हा त्यानीं किल्याचा दरवाजा एकदम खुला करून हल्लाकरणारे लोकांवर झपाटयानें चाल केली. मराठी फौजे-चा ही दृढनिश्चय झालाच होता. त्यामुळें तुमुल रण माजून जाटांनीं मराठयांचा हल्ला मागें फिरविला. हें विठ्ठलराव यांनीं मागून पाहि-ल्यावरून त्यांस अत्यंत त्वेष चढला व त्यांनीं तरवार खेचून झपा-टयानें शत्रूवर चाल केली. त्या संधीस बंदुकांचा मारा बंद झाला आणि दोहींकडील दळें हातघाईवर येऊन परस्परें मोठा दारूण युद्धसंग्राम झाला. विठ्ठलराव हे स्वतः शत्रूवर तुटून पडले. तें पाहून माहादजी शितोळे, यमाजी रवळेकर आणि मोतीराम * ब्राह्मण, तसेंच सर्व मानकरी, यांनीं घोडयावरून उडया टाकून झपाटयानें हल्ला केला आणि ती सर्व गर्दी जाट राज्याच्या घोडया पर्यंत जाऊन पोंहोंचली. तेव्हां माहादजी शितोळे यांनीं पुढें सर-सावून त्या राजास घोडयावरून खालीं पाडिलें आणि त्याच संधीस

* हा जातीचा कनौजिया ब्राह्मण असून लढाईत घोड्यावर पाण्याच्या झाऱ्या बाळगून विठ्ठलराव यांस ताहान लागेल तेव्हां पाणी पाजीत असे.

विठ्ठलराव यांनीं त्याचे छातीवर पाय देऊन तरवारीचे एकाच हाता-नें त्याचें शीर उडविलें. त्या दुर्घट रणकंदनांत मराठी फौजेनें शेवटीं जाटाचे फौजेची मोठी कत्तल उडवून किल्ला सरकेला आणि तेथें पेशव्यांचा झेंडा उभा करून चांगला बंदोबस्त ठेविला. किल्ल्यावर बाहुटा चढला त्यावेळेस संध्याकाळचा चार घटका दिवस उरला होता. हा मोठा जय झाल्यावर विठ्ठलराव यांनीं जखमी झालेल्या वीरांच्या जखमा शिवण्याचा वगैरे बंदोबस्त करून माहादजी शितोळे, यमाजी खळेकर आणि आपाजी मुंढे यांस सोन्याचीं कडीं आणि उंची पोषाग देऊन त्यांची मोठी वडेजाव केली व पेशवे यांस विनंति करून निरंतर चालणारीं इनामें देव-विण्याविषयीं त्यांस वचनें दिलीं. त्याप्रमाणेंच मोतीराम ब्राम्हण यासही बक्षिस देऊन त्यादिवसापासून त्यास फौजेंतील एक हुद्देदार केलें. ही सर्व व्यवस्था इकडे चालली असतां, जाट राजाचा पुत्र राजा गिरधर हा कारभारी मंडळीसुद्धां विठ्ठल शिवदेव यांस शरण आला. तेव्हां विठ्ठलरावांस मोटा संतोष होऊन त्यांनीं त्या मुलास आश्वासन दिलें आणि ज्या दिवाणानें पूर्वीं बेआदबीचीं भाषणें केलीं होतीं त्यास बोलावून असें विचारिलें कीं, "आतां शूरत्व हा ब्राम्हणाचा विषय आहे किंवा कसें. ?" या प्रश्नानें तो कुंटित होऊन स्तब्ध बसला. नंतर ग्वाल्हेरचा किल्ला, ग्वाल्हेर शहर आणि त्याखालचा मुलुक असें विठ्ठलरावांनीं आपले मालिक पेशवे यांजकरितां ठेवून घेतलें आणि बाकीचें गोहोद संस्थान राजा गिरधर यास बहाल करून त्यास परत जाण्याची परवानगी दिली; तसेंच नवीन जिंकिलेल्या किल्ल्याची व मुलुकाची वहिवाट गोविंद शामराज शिरवळकर यांस सांगून लढाईचे आरंभीं ज्या जाग्यावर तोफा मारण्यासाठीं मोर्चे बांधिले होते, तेथें देऊळ बांधून त्यांत मारुतीची मूर्ति स्थापन केली. ती मूर्ति आद्यापर्यंत कायम असून तीस " मोर्च्याचा मारुती " असें ह्मणतात. याप्रकारें किल्ल्यासह ग्वाल्हेर प्रांत सरकरून विठ्ठल शिवदेव हे राघो-

बादादांचे छावणींत जाऊन मिळाले. नंतर राघोबादादांनीं उत्तर हिंदुस्थान प्रांतांत बंदोबस्त टेवण्याकारितां जनकोजी शिंदे यांस ठेवून मल्हारराव होळकर आणि दत्ताजी शिंदे यांस माळव्यांत ठेविलें; व आपण विठ्ठल शिवदेव व इतर सरदार यांसुद्धां पुण्यास परत आले.

विठ्ठल शिवदेव यांनीं सदाशिवरावभाऊंची भेट घेतल्यावर त्यांस ग्वाल्हेरच्या लढाई संबंधी सर्व हकीकत कळवून, "फौजे बद्दल बारालक्ष रुपये देण्याचे पेचांत मीं आहें, त्याची मेहेरबानगीनें मिसल लाऊन द्यावी." अशी त्यांस विनंती केली. तेव्हां भाऊसाहेब हे त्याबद्दल त्यांस दूषण देऊन म्हणाले कीं, "आज्ञेवांचून ग्वाल्हेरची मसलत तुह्मीं कशासाठीं केली. ? आतां हा खर्च तुम्हांस मिळणार नाहीं." विठ्ठल शिवदेव हे कर्जाचे पेंचामुळें फारच उदासीन झाले होते. त्यांतून सदाशिवरावभाऊ जेव्हां असें रागानें बोलले, तेव्हां तर त्यांस फारच वाईट वाटलें. शिवाय भाऊंच्या त्या बोलण्यानें फौजेंत बेबंदी होऊन घोटाळा होऊं लागला. तें पाहून नानासाहेबांनीं विठ्ठल शिवदेव यांस एकांतीं बोलावून सांगितलें कीं, "तुम्ही घाबरे होऊं नका; तुमचे मर्जीप्रमाणें देण्याचा फडशा करून टाकूं." यावरून असें दिसतें कीं, सदाशिव-राव भाऊंचा वचक नानासाहेबांस देखील बाळगावा लागत असे. !

आतां यापुढें कर्नाटकाच्या स्वारीचा वृत्तांत सादर करावयाचा आहे. पण वाचकांची समज बरोबर व्हावी म्हणून कांहीं मज-कूर उपोद्घातासारखा येथें लिहितों. सांप्रत आम्ही ज्या काळाचा इतिहास लिहित आहों त्या काळीं संपूर्ण हिंदुस्थानांत अनेक राज्यें असून नवेनवे योद्धे व नवेनवे उमेदवार ही पुष्कळ उत्पन्न होत होते. त्या वेळेस या देशांत शिपाईगिरीचा धंदा मुख्य होऊन गेला होता. तसेंच प्रत्येक राजास आपला अधिकार व मुलुख वाढ-विण्याची इच्छा असल्यामुळें जागोजाग राजकारणें होत होतीं. त्याचप्रमाणें एका राजाचे हक्कास दुसरे राजाकडून कांहीं बाध आला कीं लागलीच त्याजवर स्वारी व्हावयाची. असा क्रम चा-

लत असल्याकारणानें सर्व देशभर हमेषा लढायाच चाललेल्या असत. याच संधीस पेशवे यांनीं कर्नाटकावर स्वारी केली. त्यास एक क्षुल्लक कारण झालें होतें; पण तेणेंकरून आपल्या हक्कास कमीपणा आला असें पेशव्यांस वाटून त्यांनीं सावनूरचे नवाबावर स्वारी केली. तें क्षुल्लक कारण असेंः—पोंदिचरी येथें फ्रेंच लोकांचा सरदार मान्सीयर बुसी याचे फौजेंत मुजफ्फरखान नावांचा एक हुद्देदार होता. तो फ्रेंच पलटणींतून चाकरी सोडून सन १७५० इ० चे सुमारास पेशव्यांचे फौजेंत नौकरीस राहिला, व त्यानें कांहीं कवाइती फौज ही तयार केली. पुढें सन १७५१ इ. सालीं पेशव्यानीं माहादाजीपंत पुरंदरे यांच्या हाताखालीं जी फौज कर्नाटकांत पाठविली त्याच फौजेच्या मदतीस मुजफ्फरखान यास आपल्या कवाइती फौजेनिशीं पाठविलें. त्याचे ताब्यातील पलटणांच्या कामकाजांत माहादाजीपंत यांनीं कांहीं त्रास दिल्यामुळें त्यास राग येऊन तो पेशव्यांची चाकरी सोडून श्रीरंगपट्टणास गेला; परंतु तेथें त्याची टांकी न लागल्यामुळें पुढें तो सावनूरचे नवाबापाशीं राहिला आणि तेथें कवाइती फौज व तोफखाना तयार करूंलागला. हें वर्तमान नानासाहेब पेशवे यांस समजलें तेव्हां त्यांनीं तो मुसलमानसरदार आपले स्वाधीन करण्याविषयीं सावनूरचे नवाबास पत्र लिहिलें; परंतु त्यानें तो मनुष्य देण्याचें नाकबूल केलें. त्यानाकबुलीस नवाबाचे पुरातन साह्यकर्ते गुत्ती व सुंडुर येथील घोरपडे यांनीं अनुमोदन दिलें. त्यामुळें पेशव्यांस वैषम्य वाटून त्यांनीं मोठी फौज जमा केली. त्या फौजेचे मदतीस जानोजी भोंसले यांनीं दाहाहजार स्वार दिल्यामुळें ती फारच मोठी झाली. पेशव्यांचे फौजेंत मुख्य सरदार होते ते;—स्वतःनानासाहेबपेशवे, सदाशिवरावभाऊ, मल्हारराव होळकर, विठ्ठल शिवदेव व जानोजी भोंसले यांच्या स्वारांवरील सरदार, याप्रमाणेंहोते. या एकत्र झालेल्या फौजेनें कृष्णानदी उतरून प्रथम बागलकोट किल्ला घेतला; मग सावनुरावर

हल्ला करण्यास्तव तीनें पुढें कूचकेला. हैदराबादचा मुख्य वजीर शाहानवाजखान यानें त्या वेळेस कांहीं एका विशेष कारणास्तव पेशव्यांबरोबर गुप्त बोलणें चालविलें होतें. त्यानें पेशव्यांची ही मोटी भयंकर फौज जमलेली पाहून त्याचे मनांत भय उत्पन्न झालें; परंतु त्यानें तें छपवून कृष्णानदीवर देखरेख ठेवण्याकरितां म्हणून एक फौज तयार केली. हें वर्तमान पेशव्यांस कळलें तेव्हां " आमचा इरादा शत्रुत्वाचा नसून मित्रत्वाचा आहे. " असें त्या वजिरास कळविण्याकारितां त्यांनीं त्याजकडे वकील पाठविला. त्या वकिलानें वजिरास असें कळविलें कीं, " सावनूरच्या नबाबाचें वर्तन उभय राजांशीं ह्मणजे तुमच्याशीं आणि आमच्याशीं शत्रुत्वाचे असून त्याचा अधिकार आतांच न तोडला तर तो संपूर्ण कर्नाटक काबीज करील. यासाटींच त्याजवर स्वारी केली असून आपणही अशा वेळेस आम्हास ( पेशव्यांस ) मदत करावी. " त्या वजिरानें वकिलापाशीं मदत देण्याचें कबूल केलें, व मानसियर बुसी याजबरोबर साह्यसंकेत करून जी मराठे लोकांची फौज सावनूरचे किल्यास वेढा घालीत होती तीस मदत करण्यास्तव त्यास तिकडे पाठवून दिलें.

वरलिहिलेली मदतीची फौज सावनुरापासून पंचवीस कोसांचे अतरावर दाखल झाली. तेव्हां नानासाहेब पेशवे यांचे मनांत वारंवार अशी गोष्ट येऊं लागली कीं, " आपलेकडून सावनुरच्या नबाबाचें पारिपत्य होईना सबब हैदराबादेहून मदतीस्तव फौज आणविली असें लोक म्हणतील; आणि निजामाची मदत घेणें हें कृत्य तरी आपले शिपाईगिरिच्या बाण्यास दूषण लावणारेंच आहे. शिवाय, निजामाची फौज येऊन या युद्धांत कदाचित तिची मदत झालीतर एकंदर लाभांत निजामास वांटा द्यावा लागेल; यासाटीं ती फौज येऊन दाखल होण्यापूर्वींच सावनूर हस्तगत झालें तर फार चांगलें होईल; तर ही कार्यसिद्धि होण्यास काय युक्ति योजावी. ? " ही गोष्ट नानासाहेबांच्या मनांत घोळत

असतां, त्यांनीं मल्हारराव होळकर यांस बोलावून आपल्या मुत्सद्दी मंडळींत त्या गोष्टीचा विचार केला. त्या प्रसंगीं होळकर बोलले कीं, " थोर आणि प्रसंगीं उपयोगीं पडणारेमर्द असे विठ्ठलराव विंचूरकर हे आहेत; पण ग्वाल्हेर सरकरण्याचे कामीं त्यांचा पैसा खर्च झाला तो त्यांस मिळण्याची गोष्ट तर एकीकडेसच राहिली. ! उलटें, हुकुमाशिवाय जाटाबरोबर लढाई केली हा दोष मात्र त्यांस देण्यांत आला. ! या कारणानें ते उदास आहेत. त्यांस बोलावून त्यांची समजूत केली असतां, ते व मीं मिळून हल्ला करून किल्ला सर करूं. " हे ऐकतांच नानासाहेब पेशवे यांनीं विठ्ठलराव विंचूरकर यांस बोलावून आणविलें आणि त्यांची बहुत प्रकारें समजूत करून त्यांस अज्ञा केली कीं, " निजामाची फौज येऊन पोंहोंचण्यापूर्वीं सावनूरचा किल्ला हस्तगत झालापाहिजे. " ही आज्ञा ऐकून होळकर आणि विठ्ठलराव मोठ्या विरश्रीनें बोलले कीं, " यश येणें हें सरकारचे पुण्यप्रतापावर आहे. आमचें काम इतकेंच आहे कीं, स्वामिसेवेंत आपली पराकाष्टा करावी. ती करण्यास आह्मी सिद्ध आहों." नंतर श्रीमंतांनीं उभयतांस विडे देऊन रवाना केलें. विठ्ठलराव आपले गोटांत गेल्यावर त्यांनीं आपले सर्व सरदार आणि मानकरी यांस बोलावून दरबार केला आणि पेशव्यांबरोबर आपलें झालेलें भाषण त्यांस कळवून " उदईक हल्ला करून सावनूर घ्यावयाचें अथवा लढाईंत पडून स्वर्गप्राप्ति करावयाची." असा आपला दृढ निश्चय सर्वांस सांगितला. त्याजवर सर्व मानकरी व सरदार बोलले कीं, " आम्ही सर्व आपली शिरें खर्चीं घालण्यास तयार आहों; हल्ल्याची तयारि करावी." मग दुसरे दिवशीं पाहाटेस मागील चारघटका रात्रीस तयार असण्याविषयीं होळकर यांस सूचना पाटवून विठ्ठलराव यांनीं निद्रा केली; पण काळजीमुळें निद्रा लागली नाहीं. शेवटीं पाहाटेस उठून स्नान झाल्यावर विठ्ठलराव यांनीं कुळस्वामी नरसिंह याची पूजा करून दिवाण निमगाजी खंडेराव

यांजबरोबर नानासाहेब पेशवे यांस निरोप पाठविला कीं. "मी आतां हल्ल्यावर जाणार; अस्तमानपर्यंत सावनूर हस्तगत करीन, नाहीं तर रणांत पडून स्वर्गास जाईन." हा निरोप ऐकून श्रीमंतांस फार संतोष वाटला; आणि विठ्ठलराव यांचे मदतीस जाण्याविषयीं त्यांनीं दुसऱ्या फौजेस हुकूम केला. सूर्योदयापूर्वींच हल्ल्यास आरंभ झाला. इतक्यांत होळकर ही आपली फौज घेऊन हल्ल्यांत येऊन मिळाले. या दोन्ही फौजा एकत्र होऊन शत्रूवर एकसारखे हल्ल्यावर हल्ले चालले असतां, शत्रूकडूनही प्रत्येक हल्ल्याचा प्रतिकार करण्यांत कसूर झाली नाहीं. सावनूरचे नबाबाकडील फ्रेंच सरदाराचे हाताखालीं शिकलेले अंमलदारांनीं या हल्ल्याच्या वेळेस मराठी फौजेवर गोळ्यांची पर्जन्यासारखी वृष्टी केली. तथापि ती फौज कच न खातां कोटाचे दरवाज्यापर्यंत मोठ्या जुरतीनें जाऊन पोंहोंचली. नंतर हत्तीच्या गंडस्थळाच्या टकरेनें तो दरवाजा फोडून मराठे शहरांत घुसले. मग बिकट लढाईचा प्रसंग आला, तेव्हां विंचूरकर यांच्या पदरचे कितीएक जवांमर्द लोक पडले. मग विठ्ठलराव सर्व मानकऱ्यांसुद्धां घोड्यावरून खालीं उतरून शत्रूवर पाण्याच्या लोटाप्रमाणें हल्ला करीत चालले. त्या दारुण रणसंग्रामांत कृष्णा नदीचे कांठावरील पांचवड येथें राहणारे सरजेखान व मस्तखान या नांवाच्या उभयतां बंधूंनीं पुढें घुसूनजाऊन किल्ल्यावरील बावटा खालीं पाडिला आणि आपल्या पागोट्याचें निशाण करून त्या ठिकाणीं चढवून दिलें. तें पेशव्यांचे निशाण पाहातांच सावनूरच्या फौजेचें धैर्य अगदीं खचून तिनें पळ काढिला. या लढाईत विठ्ठलराव यांचे खांद्यावर तरवारीची एक जखम लागली. नंतर त्यांनीं ठाणें बसविलें आणि चोहोंकडे फौजेच्या टोळ्या पाठवून शत्रू नाहींसा केला. तेथें स्थिरस्थावर झाल्यानंतर उभयतां सरदार आपापले गोटांत गेले. पुढें शस्त्रवैद्यानें विठ्ठलराव यांची जखम शिवून तिला योग्य उपचार केले.

याप्रमाणें अल्पकाळांत अत्यंत मोठा जयप्राप्त झाल्यामुळें नानासाहेब पेशवे यांस फारच संतोष झाला. त्यांनीं त्याच रात्रीं होळकरांस बरोबर घेऊन ज्या डेऱ्यांत विठ्ठलराव जखमी होते त्या डेऱ्यांत जाऊन त्यांची बहुत खातर केली. तेत्यांस ह्मणाले कीं, "तुह्मी माझे मोठे रणजीत सरदार आहां याचें मला फार भूषण वाटतें. तुह्मी कैलासवासी बाजीरावसाहेब यांचे अव्वलीपासून मोठ्या परीश्रमानें नोकरी केली आहे. तुम्ही आमचे दौलतीचे वांटेदार आहां." असा गौरव करून विठ्ठलराव यांस ग्वाल्हेर सरकरण्याचे कामीं बारा लक्ष रुपये खर्च झाला होता, त्याबद्दल त्यांनीं त्याच वेळेस बाळाजी गोविंद बुंदेले यांजवर वरात दिली; याशिवाय त्यांनीं विठ्ठलराव यांस चौघडा, जरीपटका, साहेबनौबत, व जरीलगी अशीं राजकीय भूषणें देऊन खेरीज एक उंची पोषाग व पुष्कळ जवाहीर बक्षिस दिले. नंतर विठ्ठलराव यांचे विनंतीवरून त्याच वेळेस माहादजी शितोळे मांजरीकर व अपाजी मुढे (म्हणजे ज्यांनीं ग्वाल्हेरीस जाटाचे युद्धांत मोठें शौर्य केलें होतें ते,) यांस बक्षिसें दिलीं. तीं अशीं:—माहादजी शितोळे यांस कृष्णातिरीं येडुराजवळ मांजरी नांवाचा गांव वंशपरंपरेनें इनाम करून दिला. आपाजी मुढे बारगीर होते, त्यांस पागे करून एक गांव दिला. याप्रमाणें व्यावस्था करून नानासाहेब पेशव्यांची स्वारी होळकरांसह खासगी डेऱ्यास गेली. विठ्ठलराव हे जरी जखमी होते तरी ते दुसरे दिवशीं तसेच उठले आणि त्यांनीं आपले सरदार व मानकरी यांचा दरबार करून सावनूरचे संग्रामांत ज्यांनीं पराक्रम केले होते त्यांस बक्षिसें देऊन संतोषित केलें. सरजेखान व मस्तखान (म्हणजे ज्यांनीं किल्ल्यावरचें निशाण पाडून त्याच्या जागीं पागोट्याचें निशाण चढविलें होतें) यांस फार मोठ्या किमतीचे पोषाग दिले आणि श्रीमंतांकडून आपल्यास जी जरीलगी मिळाली होती ती त्या उभयतांचे स्वाधीन करून त्यांस पागेचीं वस्त्रें दिलीं.

पायगुडे आडनांवाचे मानकरी होते त्यांचे स्वाधीन जरीपटका करून त्यांस पोषाग दिला. अशा प्रकारें विठ्ठलराव यांनीं आपल्या फौजेंतील शूर व विजयीं पुरुषांचा सन्मान करून त्यांचे आभार मानिले. सरजेखान, मत्तेखान व पायगुडे यांचे वंशज अद्याप विंचूर संस्थानांत पिढीजादे नौकर ह्मणून राहात आहेत.

याप्रमाणें सावनूरचा नबाब पराजीत झाला असतां, त्यानें पेशव्यांबरोबर तह केला. त्यांतील ठरावाअन्वयें पेशव्यांनीं त्यास सावनूरचा किल्ला बाहाल केला आणि त्या नबाबानें त्यांस आपलें संस्थानापैकीं कांहीं मुलुक देऊन त्या स्वारीचें मुळकारण जो मुजफ्फरखान त्यास आपले नौकरीतून बडतर्फ केलें. नंतर पेशव्यांची स्वारी जयश्रीनें पुण्यास परत आली. ही गोष्ट सन १७५६ इ० च्या अव्वलीस झाली.

---

## प्रकरण ४.

### रघुनाथराव दादासाहेब यांची उत्तर हिंदुस्थानांतील दुसरी स्वारी.

विठ्ठल शिवदेव यांनीं सन १७५४ इ०सालीं रघुनाथराव पेशवे यांचे परवानगीवांचून ग्वाल्हेरचा किल्ला सरकेल्यामुळें त्यांजवर त्यांची व मुख्य पेशवे नानासाहेब यांची इतराजी झाली होती; परंतु सन १७५५ इ०सालीं त्यांनीं सावनूर येथें जो पराक्रम केला त्यामुळें उभयतांचीही त्यांजवर कमाल मेहेरबानगी झाली. पुढें सन १७५६ इ० चे आखेरीस उत्तरहिंदुस्थानांत मुलुकगिरी करावयाची तिजवर नानासाहेब यांनीं पूर्वीप्रमाणें रघुनाथराव यांचीच योजना केली असतां, त्यांनीं विठ्ठल शिवदेव व मल्हारराव होळकर वगैरे कित्येक सरदार व दिवाण सखाराम बापू वोकील यांस

बरोबर घेऊन माळव्याकडे कुच केला. याही मुलुकगिरींत दादासाहेब यांजबरोबर पन्नास साठ हजार मराठी फौज होती. हें लष्कर प्रथम उज्जनीस गेल्यावर दादासाहेब यांच्या मनांत आलें कीं, विठ्ठल शिवदेव यांनीं दोन वर्षांपूर्वीं जो ग्वाल्हेरचा किल्ला व मुलूख घेतला आहे तो समक्ष पाहावा. त्यावरून ते ग्वाल्हेरीस गेले आणि तें शहर व तो किल्ला पाहून व विठ्ठल शिवदेव यांनीं तो घेण्यास्तव जी पराकाष्टेची मर्दुमी केली होती ती ऐकून त्यांजवर त्यांची पराकाष्टेची मेहेरबानगी झाली. दादासाहेब यांचे ग्वाल्हेर येथील मुक्कामांत त्यांस दिल्लीचे बादशाहाचा वजीर गिरशाबुद्दीन याजकडून आकस्मात आदरपूर्वक बोलावण्यास वकील आला, त्यावरून ते एक लाख फौजेनिशीं दिल्लीस कूच करून गेले. त्या बोलावण्याचें कारण पुढें लिहितों.

सन १७५३ इसवी सालीं आफगाणस्थानचा बादशाहा अहमदशाह हा हिंदुस्थानावर स्वारी करण्याचे इराद्यानें एक जबरदस्त फौजेनिशीं अटक नदी उतरून आला. त्यास माघारा घालविण्यास दिल्लीचे बादशाहास त्या वेळेस सामर्थ्य नव्हते म्हणून त्यानें लाहोर व मुलतान हे दोन सुभे अहमदशाहा यास देऊन त्याबरोबर तह केला. या दोन सुभ्यांत दिल्लीचे बादशाहाचा मीरमनू नांवें जो कामगार होता तो जुना माहीतगार असून अबदालीची ताबेदारी करण्यास राजी झाला, सबब त्या बादशाहानें त्यासच त्या दोन सुभ्यावर कायम ठेविलें. पुढें दिल्लीचा वजीर मीरशाबुद्दीन यानें पंजाबास जाऊन अदिनाबेग नांवाच्या ज्या राज्यकारस्थानी पुरुषाचे कारणास्तव पूर्वीं अबदाली यानें त्या मुलुखावर स्वारी केली होती त्या पुरुषास हातीं धरिलें आणि त्याचे मदतीनें दोन्ही सुभ्यांत अंमल करून त्यासच आपल्या तर्फेनें दोन्ही सुभ्यांचा सुभेदार नेमिलें. हें वर्तमान अबदाली बादशाहास समजतांच त्यानें सन १७५५ सालीं बिन हरकत दिल्लीवर येऊन तें व मथुरा अशीं दोन्हीं शहरें लुटून पस्त केलीं.

वजीर मीरजाशाबुद्दीन यामध्यें त्या बादशाहास जिंकण्याचें सामर्थ्य नव्हतें सबब त्यानें त्याची खुषामद करून माफी मिळविली. तथापि त्या वजीरास आकळून धरावें म्हणून अबदाली बादशाहानें नजीबउद्दौला नांवाच्या रोहिले सरदारास अमीरउलउमराव असा खिताब देऊन दिल्लीचे दरबारांत त्यास मुख्य वजीर नेमिलें, आणि आपण आफघानस्थानास परत गेल्यावर सदर्हू दोन्ही सुभ्यांवर आपलें तर्फेचे कामगार पाठवून दिले, परंतु ही व्यवस्था मीरशाबुद्दीन यास न आवडून त्यानें प्रथम नजीबउद्दौला यास दिल्लीतून हाकून देण्याचा निश्चय केला, आणि तो निश्चय शेवटास नेण्यास्तव रघुनाथराव दादासाहेब यास वर लिहिल्याप्रमाणें बोलावणें पाठविलें; तें स्वीकारून दादासाहेब दिल्लीस कूच करून गेले. तेणेंकरून नजीबउद्दौला यास आपले जिवाचें रक्षण कसें होईल याविषयीं फिकीर प्राप्त झाली.

ही कामगिरी बजाविण्यास दादासाहेब यांनीं विठ्ठल शिवदेव यांस नेमिलें असतां, त्यांनीं दिल्ली शहर घेऊन मोघल बादशाहाचें मीरशाबुद्दीनाशीं सख्य करून दिलें, आणि नजीबऊद्दौल्याचेही लष्करावर हल्ला केला; परंतु तो रोहीलखंडास पळून गेला. नजीबउद्दौला मोघल बादशाहा यासही आवडत नव्हता, यामुळें विठ्ठलराव यांजवर बादशाहाची मर्जी प्रसन्न होऊन त्यांनीं त्यांस भर दरबारांत उंची पोषाग, जवांहीर, *मोर्चेलाची जोडी आणि आपले हातांतील तरवार देऊन "राजे उमदेतुलमुल्क बाहादर" असा खिताब दिला. ही तरवार अद्यापपर्यंत विंचूर येथें विठ्ठल शिवदेव यांचे वंशजापाशीं कायम आहे. या खेरीज चांदवड तालुक्यांत

* विठ्ठल शिवदेव यांस बादशाहाकडून मोर्चेलें वारविण्याचा मान मिळाला; पण हा मान आपले मालिक पेशवे यांस नाहीं, तेव्हां आपण जर तो स्वीकारला तर मालिकांची बेआदबी होईल असें समजून त्या मोर्चेलाचा उपयोग आपण खुद्द न करितां तें मोर्चेल त्यांनीं आपले घोड्यावरील डंक्यास लावून दिलें.

विंचुरसुद्धां पांच गांवें आणि मनमाड परगणे पाटोदे, दहिवड परगणे वाखारी, चाटोरी परगणे नाशिक, आणि करंजी परगणे कुंभारी अशीं नऊ गांवें इनाम देऊन सनद करून दिली; शिवाय विठ्ठलराव दरबारास येतील तेव्हां त्यांस सरदार लोकांत बसण्याची परवानगी दिली.

दादासाहेब पेशवे यांचा तळ दिल्लीजवळ असतां पंजाबांत असें झालें कीं, अबदाली बादशाहानें अदिनाबेग नांवाच्या ज्या मनुष्यास पंजाबावर नेमिलें होतें त्या मनुष्यावर त्याची इतराजी होऊन त्यानें त्यास पकडण्याकरितां फौज पाठविली. परंतु अदिनाबेगानें शीख लोकांचे मदतीनें ती फौज तूर्त मागें हटवून रघुनाथराव याशीं वकीलमार्फत बोलणें लाविलें कीं, "तुम्ही माझें रक्षण करून संपूर्ण पजाबांत अंमल करावा." हें बोलणें कबूल करून दादासाहेबांनीं दरोबस्त फौजेनिशीं पंजाबावर कूच केला. परंतु लाहोर येथें जाहानखान नांवांचा जो सरदार अबदालीबादशाहानें ठेविला होता त्यानें रघुनाथराव याजवर हल्ला केला. तथापि रघुनाथराव यांनीं त्यांचे कितीएक वेळां मोड करून त्यांस अटक नदी पलीकडे पळून जाणें भाग पाडिलें, आणि त्या नदीचे कांठीं भगवा झेंडा उभा करून आपले स्वारांचे घोड्यांस त्या नदीचें पाणी पाजिलें. नंतर त्यांनीं मुलतानावर कुच करून तेथील ही दुराणी बादशाहाचें ठाणें मारून टाकिलें; मग अदिनाबेग यास मुलतान व लाहोर या दोन सुभ्यांचा सुभेदार करून त्याचे रक्षणा करितां पंजाबांत पंचवीस हजार फौज ठेविली. त्याच प्रमाणें लाहोरचे फौजेस मदत करण्यास व रजपूत लोकांपासून खंडण्या वसूल करण्यास जनकोजी शिंदे यांस कांहीं फौजेनिशीं दिल्ली जवळ ठेविलें. आणि माळव्यांत बंदोबस्त राखण्याकरितां मल्हारराव होळकर व दत्तोजी सिंदे यांस ठेऊन आपण पुण्याकडे कूच केला. इतक्यांत रजपुतान्यांत कांहीं बखेडा झाल्याचें वर्तमान आलें सबब त्यांनीं तात्काल तिकडे जाऊन अज-

मीर काबीज केलें. आणि जोधपूर वाल्यापासून खंडणी घ्याव-याची तिचा ठराव केला. नंतर ते पुण्यास आले. ही गोष्ट सन १७५८ चे आखेरीस झाली.

दादासाहेब पुण्यास पोहोंचले त्या वेळेस त्यांजजवळ रोकड शिलक मुळीच नसून उलटे त्यांस ऐंशी लाख रुपये कर्ज होतें. त्यांनीं मुख्य कारभारी सदाशिवराव भाऊ पेशवे यांजकडे त्या स्वारीचा जो हिशेब गुजराविला, त्यांत कर्जाची रक्कम ऐंशी लाख रुपये होती. ती पाहून ते दादासाहेब यांस रागानें बोलले कीं " स्वारीस जाऊन द्रव्य कमावून अणावयाचें तें तर एकीकडेसच राहिलें; उलटे माथीं कर्ज घेऊन आलां हें शाहाणपण कोठचें ? " त्याजवर दादा साहेब बोलिले कीं " कोणतीही गोष्ट प्रत्यक्ष करून पाहिल्याशिवाय अनुभव येत नाहीं. स्वारींत कधीं मिळकत होते व कधीं प्रसंगानुरूप नुकसानही होतें. हालींचे स्वारींत पुष्कळ फौज ठेवावी लागली, यामुळें मनस्वी खर्च वाढून कर्ज करावें लागलें, यांत माझा कांहीं कसूर नाहीं; परंतु मला कांहीं कळत नाहीं असें आपणास वाटत असेल तर, मी घरीं बसून लिहिण्याचें काम करितों, आणि स्वारीवर आपणच जात जावें. " हेंच बोलणें त्यांनीं खरें केलें, कारण, त्यांनीं त्यावेळे पासून तरवार म्यान्यांत घालून लेखणी हातीं धरिली. त्या वेळेपासून असा नेम ठरला कीं, रघुनाथराव यांनीं पुण्यांत राहून कारभार पाहावा. आणि सदाशिवराव यांनीं स्वारीस जात जावें.

आपल्या महाराष्ट्र देशाची स्थिति त्या वेळेस अत्यंत वर्णनीय होती. बाजीराव साहेबांनीं जो कित्ता एकदा घालून दिला होता, तोच वळविण्यास सर्व सरदार आणि पदरचे मुत्सद्दी हे नेहमीं कंबरा बांधून तयार असत. तो प्रकार असा कीं, पर्जन्य काळ संपला कीं सर्व सरदार आपापला लढाईचा कड्डा सरंजाम आणि शूर शिपाई बरोबर घेऊन पेशव्याचे तळावर येऊन दाखल होत. मग पेशव्याचा जरीपटका जिकडे फिरेल तिकडे सर्व सैन्यांतील

प्रत्येक शिपाई त्यांची पाठ राखण्यास हातावर शीर घेऊन उभा असे. पेशवे दर साल विजया दशमीच्या मुहूर्तानें ज्या दिशेस जावयाचें असेल त्या दिशेस ढाला देऊन त्याच सुमुहूर्तावर शहरांतून त्यांची स्वारी पुण्यांतील सर्व सरदारांसह बाहेर पडत असे; ही गोष्ट शोधक वाचकांस माहित असेलच. आज हा प्रांत घेतला, उद्यां तो प्रांत घेतला, अशा रोज नव्या खबरा पुण्यास येत. पेशव्यांची स्वारी आज कर्नाटकांत आहे; तेथून उद्यां गुजराथेंत जाणार; तेथून माळव्यांत जाणार; तिकडील व्यवस्था झाली कीं, निजामाकडे स्वारी फिरणार! अशा धारिष्टाच्या वार्ता नित्य लोकांच्या कानीं पडत! दिल्ली कोणीकडे! ग्वाल्हेर कोणीकडे! बंगाला कोणीकडे! पण या सर्व ठिकाणीं दक्षिणेचे घोडे जाऊन अटकेचें ही पाणी प्यालें होतें! भिवरथडीचे घोडे मोठे मेहनती! आपल्या धन्या बरोबर प्रांतो प्रांतीं फिरतांनां त्यांनीं अपला पाय जमिनीस देखील पुरता टेकिला नाहीं! धन्य त्या घोड्यांची व त्यांच्या धन्यांची! या मराठ्यांच्या वर्तना वरून कित्येक लोक ( गुजराथी, बंगाली इत्यादि ) त्यांस लुटारू म्हणत असत; व मुसलमानी बादशाहींतील लोक गनीम म्हणत असत; परंतु वस्तुतः ते केवळ लुटी सांठींच देशांतरास जात असत असें नाहीं; तर, स्वराज्य स्थापण्याचें विलक्षण वारें त्यांच्या आंगांत सदोदीत भरलेलें असल्यामुळें कोठें अंमल बसविण्यास, कोठें खडणी घेण्यास, कोठें परचक्राच्या कचाट्यांतून एकाद्या राजास सोडविण्यास, अशा अनेक तऱ्हेच्या कारणांनीं त्यांनीं सर्व हिंदुस्थानभर आकांड तांडव केलें. त्यामुळें शंभर वर्षांत ह्या भरत खंडामध्यें ब्राम्हणाचा पगडा असा पडला कीं, तो अजूनही आमच्या वैभवाचा नगारा वाजण्यास कारणीभूत झाला आहे! असो; पेशव्यांनीं कामगारिस्तव निरनिराळ्या देशास सरदार योजिलेतः— सिंदे, होळकर, विंचूरकर, राजेबाहादर; बुंदेले वगैरे हे उत्तर हिंदुस्थानांतील सरदार; या सरदारांनीं उत्तरेस स्वाऱ्या करून

मुलूक काबीज करावा व खंडण्या घ्याव्या. पटवर्धन, रास्ते, पेठे वगैरे हे कर्नाटकचे सरदार; यांनीं त्याप्रांतीं वसूल वाढवून मुलूख घ्यावा. आणि आंग्रे, धुळप, खानवेलकर, माणकर, बिवलकर, हे कोंकणचे सरदार यांनीं गोव्यापासून सुरते पर्यंत मुलूख घ्यावा. अशी राज्य व्यवस्था ज्या वेळेस होती त्यावेळेस संपत्ती आमच्या या महाराष्ट्र देशांत पाणी भरीत होती यांत नवल तें काय ? सालोसाल नवी संपत्ती, नवे जवाहीर, नवे घोडे, नवे हत्ती, नव्या पालख्या, नवे जरतार, नवीं वस्त्रें, नवीं शस्त्रें, इत्यादि अनेक प्रकारचें सामान या महाराष्ट्र देशांत येत असे. या शिवाय नवीन मुलूख दरसाल राज्यांत सामील होत असे, हें वर लिहिल्यावरून लक्षांत येईलच. नारो आपाजी तुळशीबागवाले हे पुणें प्रांताचे सुभे; नगरकर हे नगर प्रांताचे सुभे; भवानी शिवराम व पुढें हरी चिंतामण दिक्षीत हे अहमदाबादेस गुजराथचे सुभे; रामाजी माहादेव बिवलकर हे ठाण्याचे सुभे; विसाजीपंत लेले हे वसईचे सुभे; परशुराम भाऊ पटवर्धन हे कर्नाटकचे सुभे आणि नारोशंकर राजे बाहादर हे खानदेशचे सुभे, होते. असे महान योद्धे व राज कारणी पुरुष जेथें निपजले त्या सभाग्य देशाची स्थिती काय वर्णावी ! शंभरवर्षांत हा देश केवळ स्वर्गतुल्य बनून गेला होता ! आतां तो सर्व प्रकार जाऊन दसऱ्याचे दिवशी नुसतें शस्त्र आणि वारू यांचे पूजनाचें मात्र काय तें कर्तव्य कोठें कोठें उरलें आहे हें पाहून अत्यंत वाईट वाटतें !

सन १७५९ इसवी सालीं निजामाचे अहमदनगर येथील पठाण किल्लेदारानें पेशव्यांस अनकूल होऊन तेथील किल्ला त्यांचे हवाली केला. हें वर्तमान सलाबतजंग व निजाम अल्ली यांस कळतांच त्यांस अत्यंत संताप येऊन त्यांनीं तो किल्ला पेशव्याचे हातून हिसकावून घेण्यास्तव धारूरास पुष्कळ फौज रवाना केली आणि आपण मागाहून सात हजार निवडक फौजे निशीं धारूराकडे कूच केला.

हें वर्तमान पेशवे यांस समजतांच नाना साहेब व भाऊ साहेब यांनीं चाळीस हजार स्वार व पांच हजार कवाईती पायदळ बरोबर घेऊन पुण्याहून कूच केला आणि झपाट्यानें चालून त्या उभयतां नवाबास उदगीर येथें गांठिलें. तेव्हां त्या नवाबानीं मोठ्या शौर्यानें लढाई करून पेशव्याची बहुतेक कवाईती फौज मारून टाकिली; परंतु पेशव्यास मागून एकाएकीं कुमक आल्यानें नबाबाचा अगदीं मोड झाला. मग उभयतां नबाबांनीं पेशव्यांबरोबर बोलणें लावून तह केला. ह्या तहामुळें पेशव्यानीं पूर्वीं घेतलेला अहमदनगरचा किल्ला व शहर आणि त्या खालचा मुलूख असें त्यांच्या ताब्यांत राहून शिवाय उभयतां नबाब बंधू पासून त्यांस दौलताबाद, शिवनेरी, ( जुन्नर ) अशेरी, व बिजापूर येथील किल्ले व शिवाय ६२ लाख रुपयांचे वार्षिक उत्पन्नाचा मुलूख प्राप्त ... ... ...न १७६० सालीं झाला.

---

## प्रकरण ५ वें.

### पानिपतची लढाई.

उदगीर येथें तह होऊन पेशवे नानासाहेब व भाऊसाहेब पुण्यास येत असतां, त्यांचे लष्कराचा तळ मांजरा नदीचे कांठीं होता, तों त्यांस विपरीत वर्तमान कळलें, तें असें कीं "काबूलचा अबदाली बादशाहा यानें हिंदुस्थानावर स्वारी करून लाहोर व मुलतान येथील मराठ्याची ठाणीं मारिलीं; आणि हिंदुस्थानचे मध्य भागांत येऊन होळकर व इतर मराठे सरदार यांचा अगदीं मोड करून टाकिला; दत्ताजी सिंदे व जोतीबा सिंदे हेही त्यांचे छाप्यांत मारले गेले; आणि त्याचें लष्कर गंगा यमुनेचे अंतर वेदींत

विन हरकत पोहोंचलें." उदगीर येथें सहज जय झाल्यामुळें सदाशिवरावभाऊ यांस मोठा गर्व होऊन आपण अजिंक्य योद्धे असें त्यांस वाटूं लागलें होतें आणि अबदाली बादशाहास जिंकण्यास काय तजविज करावी या बद्दल विचार झाला त्या वेळेस ते म्हणाले कीं मी व विश्वासराव पेशवे यांस उत्तर हिंदुस्थानचे स्वारीवर नेमलें असतां आम्ही अहमदशाहास जिंकून अटक नदीपार घालवून देऊं." हें त्याचें बोलणें नानासाहेब पेशवे यांनीं कबूल करून त्या मोहिमेवर जाण्याची तयारी करण्याविषयीं त्यांस हुकूम दिला. त्याप्रमाणें हुजुरातींतील सर्व स्वारांच्या पागा, इब्राहिमखान गारदी याचे हाताखालची दाहा हजार कवाइती फौज, तीनशें तोफा, आणि मालिक विश्वासराव पेशवे यासह सदाशिवराव भाऊ यानीं पुण्याहून कूच केला. त्या वेळेस त्यांजबरोबर बळवंतराव मेहेंदळे, षमशेर बाहादर, नारो शंकर राजे बाहादर, विठ्ठल शिवदेव विंचूरकर, त्रिंबकराव पुरंदरे, शिवाय किती एक मराठे सरदार आपापल्या हाताखालच्या स्वारानिशीं होते. हें लष्कर माळव्यांत गेल्यावर त्याचा तळ शिरोंज येथें पडला. तेथें यशवंतराव पवार, दमाजी गाईकवाड, मल्हारराव होळकर, जनकोजी शिंदे, गोविंदपंत बुंदेले, अंताजी माणकेश्वरकामरगांवकर वगैरे कित्येक सरदार येऊन त्यांस मिळाले.

पेशव्याचें लष्कर तेथून निघून ग्वाल्हेरीस पोहोंचल्यावर भाऊसाहेब यांनीं अहीरवाडा व खेतवाडा हे प्रांत काबीज केले. त्या वेळेस नरवरवाले राजाकडून कांहीं मगरूरीचें वर्तन झालेलें त्यांचे दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें तें संस्थान अजी खालसा करण्याचें भाऊसाहेब यांचे मनांत आलें; परंतु विठ्ठल शिवदेव विंचूरकर यानीं सक्त रदबदली करून त्या संस्थानाचा बचाव केला. तो उपकार समजून नरवरवाले राजानें विठ्ठल शिवदेव यांस सहसाव तालुका आणि बढे गांव असें इनाम दिलें. त्या दोन्ही उत्पन्नाचा एकंदर आकार सालीना रुपये वीस हजार होता. त्या-

प्रमाणें विठ्ठल शिवदेव यांनीं सोपूरवाला राजा याचाहि बचाव केला. सबब त्या राजानें आपले संस्थानांपैकीं एक तालुका त्यांस इनाम दिला. हीं एकंदर उत्पन्नें पुढें सन १८१८ सालीं इंग्रजसरकारानें विठ्ठल शिवदेव यांचे वंशांतील चवथे पुरुषापासून हरण केलीं. सोपूरचें संस्थान मारवाडचे सरहद्दीवर पुष्कर तीर्था जवळ असून तें हल्लीं शिंदे यांचे राज्यांत सामील झालें आहे.

पेशव्यांचें लष्कर ग्वाल्हेरीहून निघून त्याचा तळ चंबल नदीचे कांठीं पडल्यावर मल्हारराव होळकर यांचे दोस्तीमुळें भरतपूरचा जाट राजा सुरजमल हा पुष्कळ फौजेनिशीं येऊन त्या लष्करांत मिळाला. नंतर या मोठ्या फौजेनिशीं भाऊसाहेबांनीं दिल्लीवर जाऊन त्यांत अंमल केला. तेथें पावसाळ्यांत चार महिनेपर्यंत मुक्काम झाल्यावर भाऊसाहेबांनीं अबदाली बादशाहाचें कुंजपुरा येथील ठाण्यावर हल्ला करून त्याची कत्तल केली. ही खबर अबदाली बादशाहास कळताच त्यानें लवकरच यमुना नदी उतरून दिल्लीकडे कूच केला. भाऊसाहेब यांनीं ही दिल्लीहून कूच केला. उभय दळें एकमेकांजवळ आल्यावर लढाई सुरू झाली. तींत अबदालीचा जय झाला. त्याजवर कितीएक लढाया झाल्या; परंतु मराठी फौजेसच मागें हटावें लागलें. याप्रमाणें हटतां हटतां ते पानिपत गांवाजवळ पोहोंचले. तेथें इब्राहिमखान गारदी याचे सूचनेवरून भाऊसाहेबांनीं मोर्चे बांधून त्यांचे आंत तळ केला. अहमदशाहानेंही तेथून चार कोसांवर तळ केला, त्यामुळें वारंवार चकमकी झडूं लागल्या, त्यांत कधीं पेशव्याचा व कधीं अबदालीचा या प्रमाणें जय झाले. शेवटीं तारीख ७ जानेवारी सन १७६१ इसवी रोजीं सकाळीं संपूर्ण मराठी फौज दुराणी फौजेवर चालून जाऊन मोठ्या निकराची लढाई सुरू झाली. तींत अडीच प्रहर दिवसापर्यंत मराठ्यांचा जय झाला; परंतु या सुमारास विश्वासराव पेशवे यांस अकस्मा

लागून ते पडले असतां, भाऊसाहेब यांस शेवटीं जय होण्याची आशा वाटेनाशी झाली. मग ते स्वतः दुराणी फौजेंत घुसून दिसे-नासे झाले. त्यामुळें मराठी फौज घाबरून चोहीकडे पळून गेली. तिचा पठाण लोकांनीं पाठलाग करून मोठी कत्तल उडविली.

यालढाईंत गोविंदपंत बुंदेले व बळवंतराव मेहेंदळे हे मरण पावले. जनकोजी शिंदे, इब्राहिम्खान गारदी व येशवंतराव पवार हे अतिशय जखमी होऊन पडल्यामुळें धरले जाऊन दुराणी लष्करांत मारले गेले. शिवाय बाजार बुणग्यासुद्धां आजमासे दोन लाख मनुष्यें प्राणास मुकलीं. षमसेरबाहादर व दमाजी गाईकवाड हे जखमी होऊन पडले होते; परंतु ईश्वर इच्छेनें रणांतून निघून गेले. पैकीं षम्सेरबाहादर हे भरतपुरास गेले, परंतु लागलेल्या जखमांच्या योगानें ते तेथें मरण पावले. दमाजी गायकवाड पुष्कळ क्लेश सोसून दक्षिणेंत आले. मल्हारराव हो-ळकर हा कांहीं फौजेनिशीं देशीं आले. नारोशंकर राजे बाहादर या लढाईचे वेळेस बंदोबस्ताकरितां दिल्लीस ठेविलेले होते. त्यांस ह्या पराजयाचें वर्तमान समजतांच तेथील पुष्कळ दौलत घेऊन ते दक्षिणेंस परत आलें.

भाऊ साहेब पेशवे हे मराठी लष्करानिशीं दिल्ली जवळ असतां, त्यांची स्थिति काय होती याची खबर नाना साहेब पेशवे यांस चार पांच महिन्यांत लागली नव्हती; त्यामुळें तिकडे कांहीं सुचि-न्ह नाहीं असें त्यांस वाटलें, सबब ते बरोबर कनिष्ट बंधू दादा साहेब, नागपूरचे जानोजी भोसले, आणि कितीएक मराठे सरदार व मानकरी मिळून सुमारें साठ हजार फौज घेऊन विश्वासराव व भाऊ साहेब यांस मदत करण्याचे उद्देशानें पुण्याहून निघाले. ते नर्मदा नदी उतरून चोळीमहेश्वर पर्यंत पोहचले, आणि त्यांचा मुक्काम तेथेंच असतां, नाना फडनवीस व दुसरे कितीएक मनुष्यें यांनीं येऊन त्यांस पानिपतच्या लढाईचा अनर्थकारक परिणाम सांग़ंन कळविला. तेणें करून नाना साहेब पेशवे हे अगाध

दुःखसागरांत बुडाले. परंतु दादा साहेब यांनीं तें वर्तमान ऐकतांच त्यांस अत्यंत आवेश चढून ते म्हणाले कीं " नाना साहेब! आतां नुकसान झालें तें कितीही शोक केला तरी माघारें यावयाचें नाहीं; मला आज्ञा द्यावी ह्मणजे मी जानोजी भोसले वगैरे मराठे सरदार व ही आपली दरोबस्त फौज बरोबर घेऊन अबदाल्ली दिल्लींत आहे तोंच त्यांस गांठून त्याचें शीर कापून आणितों. इतकें झालें ह्मणजे कांहीं तरी समाधान वाटेल." परंतु नाना साहेब म्हणाले कीं " दादा! तूं म्हणतोस तें खरें आहे व त्या प्रमाणें तूं करावयास चुकणार नाहींस, परंतु जे दोघे गेले ते माघारे आले नाहींत आणि तूं जो एकटाच मजजवळ आहेस, तोही गेलास आणि कदाचीत त्यांच्या प्रमाणेंच तुझी ही अवस्था झाली तर मला किती दुःख होईल हें माझ्यानें सांगवत नाहीं; या करितां तूं तिकडे न जातां मजबरोबर पुण्यास चल." असें म्हणून त्यांनीं दादासाहेबाच्या स्वारीचा बेत रहीत केला. वर लिहिल्या प्रमाणें दादा साहेब हे फौज घेऊन गेले असते तर कदाचित् ते अबदाल्लीचा सूड घेतल्या वाचून राहिले नसते, कारण, संपूर्ण मराठी राष्ट्राचें शांतवन होण्यास अबदाल्ली व त्याची फौज यांची कतल करण्या खेरीज दुसरा उपायच नव्हता; परंतु कोणी नामांकीत सरदार पुढें न झाल्यामुळें त्यांनीं उठावणी केली नाहीं. दादासाहेब जाते तर ते जवांमर्द असून शिवाय लढाया मारून घटलेले होते, या कारणास्तव सर्व मराठी राष्ट्रास स्फुरण येऊन त्यानें अबदाल्लीचा सूड उगविलाअसतां यांत संशय नाहीं. मराठी राष्ट्रांतील मजबूतीची खबर अबदाल्लीचे गुप्त अखबारनवीसांनीं कदाचित् त्यास कळविली असेल, म्हणूनच तो एक वेळां मिळालेल्या जयानें तृप्त होऊन पुढें न चाल करितां मोघल बादशाहास आपले तर्फेनें दिल्ली येथें तख्तनशीन करून संपूर्ण मोघलाची बादशाहात त्यास बहाल केल्यानंतर सत्वर काबुलास निघून गेला.

पानिपतचे लढाईंत कितीएक मोठमोठाले सरदार व हजारों

शूर शिपाई व अजमासे दीड लाख बाजारबुणगे मारले गेले; शिवाय ऐन तारुण्याचे भरांत आलेले, सुस्वरूप, सद्गुणी, मोठे जवांमर्द व पेशवे पदारूढ होण्यासयोग्य झालेले असे नानासाहेब यांचे वडील पुत्र युवराज विश्वासराव व राजकार्यधुरंधर असे त्यांचे सख्खे चुलत बंधु सदाशिवरावभाऊसाहेब हे नाश पावले; खेरीज त्यांची स्नुषा म्हणजे विश्वासराव यांची गुणवती, सुस्वरूप व तरूण अशी पत्नी हिची काय अवस्था झाली त्याचा मुळींच शोध लागला नाहीं; आणि उत्तर हिंदुस्थान प्रांतीं पेशव्यांची सत्ता व जरब नाहींशी होऊन मोठमोठाल्या राजे लोकांत त्यांची नाचक्की झाली, या व आणखी कितीएककारणामुळें नानासाहेब पेशवे यांच्या मनास अनिवार्य दुःख होऊन त्यांस वेड भरल्यासारखें झालें, आणि पुढें काय करावयाचें हें त्यांस न सुचुन माघारें जाण्याचेंही त्यांचे मनांत येईना; तथापि कनिष्ट बंधू दादासाहेब व जानोजी भोसले वगैरे कितीएक सरदार व मुत्सद्दी व इतर संभावीत व पोक्तवयस्क लोक यांनीं त्यांचा पुष्कळ प्रकारें समजुत केल्यावर, सर्वांचे मर्जीस्तव त्यांनीं पुण्याकडे कूच केला आणि ते लाहान मजला करीत करीत नाशिकास सुरक्षितपणें पोहोंचले.

वर लिहिलेल्या लढाईची साद्यंत हकीकत बहुत शोधक ग्रंथकारांनीं लिहिली आहे सबब त्या लढाइचा अधिक विस्तार येथें न लिहितां. हें चरित्र विठ्ठल शिवदेव यांचें आहे सबब त्या पुरुषाची तांत काय व्यवस्था झाली हे वाचकांचे माहिती करितां पुढें साद्यंत लिहितों.

विठ्ठल शिवदेव आपले फौजेसुद्धां त्या रणभूमीवर असतां त्यांस त्या प्रसंगीं जितका पराक्रम करितां आला तितका त्यांनीं केला; परंतु ईश्वरेच्छेनें शेवटीं जी गर्दी झाली तींत त्यांची बहुतक फौज मारली जाऊन त्यांस तीन जखमा लागल्या. पैकीं तरवारेची जखम कपाळावर, बर्चीची उजवे पायावर व तीराची डावे

मांडीवर बाणमार्गें लागल्या. या जखमामुळें ते व्याकूळ होऊन रणभुमीवर पडले होते. त्यांचा विश्वासू हुजऱ्या बाळाजी जगताप वाकीकर हा रणभूमीवर त्यांचा शोध करीत असतां, त्यास अकस्मात मोतीराम कनोजिया ब्राम्हण ( जो ग्वाल्हेरच्या हशमांत शौर्य करून योग्यतेस चढला होता तो ) भेटला. नंतर ते उभयतां आपले धन्याचे शोधार्थ फिरत असतां, दुसऱ्या दिवशीं विठ्ठलराव हे जखमा लागून पडलेले त्यांच्या दृष्टीस पडले. त्यांस पाहातांच ते उभयतां त्यांजवळ धांवून गेले. त्यांपैकीं एकाजवळ फुटाणे होते ते अगोदर त्यांनीं त्यांस खावयास देऊन सत्वर पाणी आणून पाजिलें; आणि पागोटें फाडून त्यांच्या जखमा बांधिल्या. नंतर रात्रीं सामसूम झाल्यावर हुजऱ्या बाळा जगताप यानें त्यांस पाठीशीं बांधून रणभूमी बाहेर नेलें; आणि आड रस्त्यानें चालून सुमारें पाच कोसांवर एक गांव होतें तेथें सर्वांनीं मुक्काम केला. मोतीराम ब्राम्हण याचे कंबरेस दीडशें तोळे सोनें होतें; व हुजऱ्याजवळही कांहीं सोनें नाणें होतें तें या प्रसंगीं फार उपयोगीं पडलें. दिल्लीचा मार्ग चुकवून आड मार्गानें चालत असतां पांचवे दिवशीं त्यांनीं मोठा रस्ता धरिला, तों पुष्कळ मराठे लोक परत जातांना त्यांच्या दृष्टीस पडले; तेणेंकरून त्यांस बहुत संतोष झाला. मग ते त्या मराठ्यांत मिसळून पुढें चालले, तों खुद्द विठ्ठल शिवदेव यांच्याही फौजेपैकीं कांहीं लोक त्यांस भेटले. नंतर वाटेंत एक मोठा गांव लागला, तेथें सर्वांनीं मुक्काम केला. भेटलेल्या मंडळींत एक शस्त्रवैद्य होता. त्यानें विठ्ठल शिवदेव यांच्या जखमा पाहून त्यावर जे औषधोपचार करावयाचे ते केले. नंतर त्या गांवांत आठ दिवस त्यांचा मुक्काम झाला. तेव्हां विठ्ठल शिवदेव यांस कांहीं हुषारी वाटली. मग त्या हुजऱ्यानें एक तट्टू खरेदी केला आणि त्याजवर त्यांस बसवून पुनः सर्व चालते झाले. मार्गांत लष्करांतील आणखीही लोक त्यांस भेटले. त्या सर्वांस विठ्ठलराव यांनीं अश्वासन देऊन आपल्याबरोबर ग्वाल्हेरीस नेलें.

तेथें त्यांचे तर्फेचा हुद्देदार गोविंद शामराव होताच, आणि तो प्रांतही त्यांचेंच कबजांत असल्यामुळें बरोबर आलेल्या सर्व लोकांचा त्यांस उत्तम प्रकारें बंदोबस्त ठेवितां आला. त्यांनीं ज्या ज्या मनुष्यास ज्या ज्या वस्तूची जरूर होती ती ती त्यास दिली; शिवाय वाट-खर्चासही पैसा देऊन दक्षिणेकडे सर्वांस रवाना केलें. विठ्ठल शिवदेव हे या मोहिमेवर गेले त्यावेळेस त्याजबरोबर त्यांचे कुटुं-बाचीं माणसें मुळींच नव्हतीं हें फार चांगलें झालें, कारण ज्या इतर सरदारांनीं व मुत्सद्यांनीं आपलीं माणसें बरोबर नेलीं होतीं त्यांवर पुढें वाईट प्रसंग कोसळून त्यांचे माणसांची जी दुर्दशा झाली ती ऐकिली म्हणजे अंगावर रोमांचच उभे राहतात!

पानिपतचे लढाईत पराजीत होऊन शेष राहिलेल्या लोकां पैकीं कांहीं लोकांचा समाचार विठ्ठल शिवदेव यांनीं ग्वालेर येथें शक्त्य-नुसार घेतला; पण याही पेक्षां जे शेकडो लोक अत्यंत संकटांत पडून भरतपुराकडे पळून गेले त्या लोकांस तेथील राजा सुरजमल यानें उत्तम प्रकारें साह्य केलें आणि मार्ग क्रमणा पुरती शक्ती आल्यावर त्यांस खर्चास देऊन दक्षिणेस रवाना केलें. या कारणानें त्या जाट राजाची फार मोठी कीर्ति झाली; ती चिर-काल राहील यांत संशय नाहीं.

याच प्रमाणें मल्हारराव होळकर यांचे पदरचे फडणवीस यांनीं पानिपतचे रणभूमींतील प्रेतें व अस्थि गाड्यांत भरून भागीरथींत टाकिल्या. या कामीं त्यांस जरी मोठा खर्च आला तरी तो कर-ण्यास त्यांनीं मागें पुढें पाहिलें नाहीं. याच पुण्य पुरुषानें श्रीत्र्यं-बकेश्वर क्षेत्रीं कुशावर्त तीर्थाचें कुंड, फरस वगैरे बहुत खर्चानें बांधिलें आहे. यामुळें तेथें जाणाऱ्या यात्रेकरू लोकांची फारच सोय झालेली आहे. या फडणवीसाचे वंशज अद्यापी इंदुरास फडनविशी दफ्तराच्या हक्काचा उपभोग घेताहेत.

ग्वाल्हेर मुक्कामीं विठ्ठल शिवदेव यांच्या जखमा अगदीं बऱ्या होऊन त्यांचे चित्तास समाधान वाटल्यावर ज्या नौकर लोकांनीं

पानिपत्चे रणभूमींत त्यांस शोधून काढून त्यांचा प्राण वाचविला होता त्या नौकरास त्यांनीं इनामें दिलीं; त्यांत बाळा जगताप नांवाच्या इमानी हुजऱ्यास विंचुरानजीक एके गांवीं दीडशे रुपये आकाराचे जमिनीची सनद करून दिली. ह्या इनामाचा उपभोग जगताप मजकूर याचे वंशज घेत असून त्यापैकीं एकजण हाल्लीं विंचूर संस्थानांत खिजमतगारीचे कामावर आहे.

विठ्ठल शिवदेव यांस घोड्यावर बसून सफर करण्याची ताकद आल्यावर ते तेथून निघून नर्मदा तिरीं आले, तों त्यांनीं असें वर्तमान ऐकिलें कीं, नाना साहेब पेशवे यांची स्वारी तेथपर्यंत आली होती; परंतु पानिपतचें अत्यंत दुःखकारक वर्तमान ऐकून पुण्यास परत गेली. त्यांचे पाठीमागून विठ्ठल शिवदेवही निघाले; आणि दर मुक्कामास पेशव्यांचे लष्कराचा शोध करीत करीत ते खानदेशांत आले. तेव्हां श्रीमंताची स्वारी गोदावरीच्या कांठीं आहे अशी त्यांस खातरीलायक बातमी समजली. त्यावरून विंचूरास मुलामाणसांच्या भेटीस न जातां परभारेच ते पेशव्यांचे स्वारींत दाखल झाले. श्रीमंत डेऱ्यांत होते तेथें जाऊन त्यांस त्यांनीं साष्टांग नमस्कार घातला; आणि हात जोडून म्हणाले कीं " दुर्दैवानें जो नाश झाला त्याविषयीं सर्व हकीकत श्रुत झालीच असेल. मी बहुत पापी म्हणून अनेक दुःखें व संकटें प्राप्त झालीं असतां ही वांचलों. ईश्वर इच्छेस उपाय नाहीं. हेतू धरिला त्या प्रमाणें स्वामीचरण दृष्टीस पडले. स्वामिनीं कृपाकरून मला दोन गांव इनाम दिलेच आहेत. शिवाय सरकारच्या आश्रयानें मीं कांहीं वतनेंही खरेदी केलीं आहेत. त्यांत माझ्या मुलामाणसांचा गुजारा होईलच. त्यांनीं नेकीनें सेवा केली असतां स्वामीही उपेक्षा करणार नाहींत असा मला पक्का भरंवसा आहे. जोंवर माझ्या शरीरांत बरेंच सामर्थ्य आहे तोंवर पृथ्वीवरील तीर्थयात्रा कराव्या आणि उत्तम तीर्थीं देह ठेवावा असा माझा दृढनिश्चय झाला आहे. याकरितां माझी शेवटची इतकीच प्रार्थना आहे कीं, स्वा-

मिनीं कृपाकरून मला आपला निश्चय शेवटास नेण्याविषयीं आज्ञा द्यावी. याशिवाय मला आतां कोणतीच इच्छा नाहीं. " असें बोलून त्यांनीं नेत्रांस आश्रु आणिलें. श्रीमंतही कष्टी झाले. नंतर विठ्ठलराव यांस जवळ बसवून घेऊन श्रीमंत त्यांस म्हणाले कीं " तुम्ही सूज्ञ असून असें कसें बोलतां ? शूराचे वंशांत आपण जन्मलों आहों. शत्रुचा सूड घेतल्यावांचून राहू तर आपले वडील आपणांस स्वर्गलोकीं हंसतील; याकरितां पुनः जमाव करूं. शत्रूस कधीं तरी हात दाखवूं; शिवाय दुसरें कांहीं कर्तव्य नाहीं. आम्ही पुण्यास पोहचूं तों पर्यंत तुम्हीं स्वारीबरोबर असावें. " ह्या आज्ञे प्रमाणें विठ्ठलराव यांनीं वर्तनक्रम सुरूं ठेविला. श्रीमंतांचा निकट वास असल्यानें भोजनाचे वेळेस व दिवसा रात्रीं पानिपतचे लढाईंत काय काय हकीकत झाली, कोण सरदार कसा वर्तला, कोणी काय शूरत्व केलें, युद्धांत कोण कच खाऊन पळाला, या गोष्टीश्रीमंतांनीं त्यास नेहेमी पुसाव्या व विठ्ठलरावांनींही त्यांची यथार्थ उत्तरें द्यावीं. असा क्रम मार्गांत हमेषा चालला होता. वाटेच्या मजलाही फार लाहान लाहान होत असत. एकेसमयीं श्रीमंतांनीं विठ्ठलराव यांस विचारिलें कीं, " मल्हारराव होळकरा विषयीं मंडळीच्या मुखें मी अनेक प्रकारच्या अनेक वार्ता ऐकतों, याकरितां खरी हकीकत असेल ती तुम्ही शपथपूर्वक सांगा. " त्यावरून विठ्ठलराव यांनीं श्रीमंताचे पायांवर हात ठेवून सांगितलें कीं " स्वामीस कोणी कांहींही सांगो, परंतु मल्हारराव यांची कोणतेही प्रकारें कसुर नसून युध्धांत त्यांनी कुचराई अथवा फितूर किंवा सरकार चरणीं कोणतेही प्रकारची प्रतारणा केली नाहीं. इतकें मात्र झालें कीं, त्यांनीं भाऊसाहेबास हिताची मसलत सुचवावी परंतु दुर्दैवेंकरून ती त्यांचे मनास मुळींच येऊनये—पुणें सोडल्यापासून भाऊसाहेबांच्या प्रकृतींत असा कांहीं विलक्षण फेर फार झाला होता कीं, कोणी त्यांस कि-

ताची कांहीं गोष्ट त्यांस सांगितली असतां ती त्यांचे मनास येऊं-नये. मींही त्यांस किती एक समयीं हिताच्या सुचना केल्या, तेव्हां मी होळकराचा पक्ष संभाळण्याकरितांच असे बोलतों असे कुतर्क त्यांच्या मनात येत. ईश्वर इच्छा जशी होती त्याप्रमाणें गोष्टी घडल्या. त्यास कोणाचाच उपाय नाहीं; पण एकंदरीनें मराठे सर-दारांपैकीं कोणाचीच चूक नाहीं असें मी खातरीनें सांगतों. ''

हा मजकूर विठ्ठलराव यांनीं विंचुरास आपले पुत्र शि-वाजी विठ्ठल व दिवाण चिमणाजी खंडेराव यांस सविस्तर लि-हून कळविला, आणि असें सुचविलें कीं, श्रीमंतांपाशीं झालेल्या भाषणाची सर्व हकीकत मल्हारराव होळकर यांस कळविण्यास्तव त्याजकडे मुद्दाम विश्वासू कारकून पाठवावा. त्याप्रमाणें त्या उभयतांनीं केलें.

श्रीमंताची स्वारी पुण्यास दाखल झाल्यावर विठ्ठलराव यास पूर्ववत सरदारीचें काम चालविण्याविषयीं श्रीमंताची आज्ञा झा-ली; आणि त्याप्रमाणें त्यांनीं क्रम सुरू केला.

नानासाहेब यांचे मनास अत्यंत दुःख झाल्याचा मजकूर वर लिहिलाच आहे. ते पुण्यास आल्यावर वाड्यांत न राहातां पर्वतीस* जाऊन राहिले. तेथें उत्तरोत्तर त्यांची प्रकृती क्षीण होत जाऊन शेवटीं त्याच वर्षी जून महिन्याचे आखेरीस त्यांस देवाज्ञा झाली.

---

*हें मंदीर पुण्याचे दक्षिणेस एक मैलाचे अंतरावर एक-कासान टेकडावर असून नानासाहेब पेशवे यांनींच बांधिलें; व हें ठि-काण मोठें रमणीय असून तेथील हवाही निर्दोषी आहे.

# प्रकरण ६ वें.

## माधवराव बल्लाळ पेशवे यांची कारकीर्द.

सन १७६१ सालीं सपटेंबर महिन्याचे अखेरीस रघुनाथराव दादासाहेब यानीं आपले पुतण्ये म्हणजे कैलासवासी नानासाहेब पेशवे यांचे पुत्र माधवराव यांस साताऱ्यास नेऊन सातारचे माहाराज यांजकडून त्यांस पेशवाईचीं वस्त्रें देवविलीं. त्या वेळेस माधवराव यांचें वय १७ वर्षांचें होतें.

रघुनाथराव पुण्यास परत आल्यावर ते पूर्वीप्रमाणें राज्यकारभार पाहूं लागले. इतक्यांत उत्तर हिंदुस्थानांतून असें वर्तमान आलें कीं, पानिपतचे लढाईचा विपरीत परिणाम झाल्यावर त्या प्रांतीं पेशव्याचा कोणी जबरदस्त व नामांकित असा सरदार न राहिल्यामुळें त्यांची जरब अगदीं उडून ग्वाल्हेरीस जाट राजे खटका करूं लागले आणि आहीरवाडा वगैरे जो मुलूख नुकताच काबीज झाला होता त्यांतून काळीचा वसूल बिलकूल येईनासा झाला. माहादजी शिंदे यांचा मुलूख उत्तर हिंदुस्थानांत होता सबब तिकडे जाऊन बंदोबस्त करण्याविषयीं रघुनाथराव यानीं त्यांस हुकूम केला; परंतु शिंदे तिकडे जाण्यास छाती करीनात व त्याचप्रमाणें इतर कोणीही धजेना, सबब शेवटीं त्यानीं विठ्ठल शिवदेव यांस हुजूर बोलावून अशी आज्ञा केली कीं, " माहादजी शिंदे अद्यापि अल्पवयस्क आहेत व तिकडील स्थिति त्यांस माहित नाहीं व तुम्ही पुरातन सरदार असून तुमच्या हातानें कितीएक व्यवस्था पूर्वी लागल्या आहेत, या करितां तुम्हीं त्या प्रांतीं जाऊन योग्य बंदोबस्त करावा. त्या बरहुकूम विठ्ठल शिवदेव ग्वाल्हेरीस निघून गेले. त्यांचे मागून त्यांचे मदतीस नारो शंकर राजे बाहादर यांस श्रीमंतानीं पाठवून दिलें. विठ्ठल शि-

वदेव यानीं पूर्वीप्रमाणें ग्वाल्हेर व आहीरवाडा वगैरे ठिकाणीं पेशव्यांचा अंमल कायम करून काळीचा वसूलही करून घेतला. नंतर श्रीमंतानीं माहादजी व केदारजी शिंदे यांसही त्या प्रांतीं पाठवून दिले. त्या वेळेस दादासाहेब यानीं तिकडील बंदोबस्त ठेवण्याविषयीं विठ्ठल शिवदेव यांस शिंदे याजबरोबर एक तपशिलवार पत्र* पाठविलें.

---

*॥ श्रीशंकर. ॥

राजश्री विठ्ठल शिवदेव स्वामी गोसावी यांशीं.

विनंती उपरि अलीगोहर यास जें पत्र पाठविलें त्याचा मसुदा तुम्हास पाहावयाकरितां पाठविला आहे. हा पाहून हें पत्र द्यावयाचें उपयोगी पडत असल्यास देणें. राजश्री नारो शंकर व तुम्ही एक विचारें राहून करावयाचें तें करणें. हाल्लीं सर्व अखत्यार मशारनिल्हेवरी व तुम्हावरी आहे. रोजकरी यास ऐवज ही नसला तरी नर्मदा पार येऊन माळव्याचा घाट चढून गेल्यावरी सरकारचे माहाल आहेत तेथील ऐवज बेधडक घेणें आणि झांशी, ग्वाल्हेर, सागर, कोटा वगैरे किल्ले कायम राहात तें करणें. किल्ले राखिले म्हणजे तुम्ही फार केली. प्रस्तुत नवा प्रांत साधावा ती गोष्ट होणें कळतच आहे. कदीम जागे राखिले म्हणजे त्यांतच बहुत आहे. राजश्री बाळाजी गोविंद यासही पत्र पाठविले असे, तरी तुम्ही उभयतां व हे मिळोन बंदोबस्त करणें. प्रस्तुत अबदाली चमेल उतरून येतो असा अर्थ नाहीं. सुजादौला आलिकडे आहेत. ते मात्र लबाडी करतील. ऐशीयास त्याच्यानें तुम्हांवर येववेल हें होणें नाहीं. तुम्ही नारो शंकर व राजश्री मल्हारबाची फौज तिकडे आहे. ते एकत्र झाल्यावरी मातबर जमाव होईल. त्याजवरी इभ्रत पडून बाकी राहिल्या मुलखाचा बंदोबस्त होईल, गुंता नाहीं. खासा स्वा-

(पुढें चालू.)

विठ्ठल शिवदेव हे उत्तर हिंदुस्थानांत असतां, त्यांचे मागें पुणें येथें सन १७६२ सालीं एक राज्यकारण उपस्थित झालें तें असें;— माधवराव पेशवे हे अल्पवयस्क असल्या कारणानें त्यांची मातुश्री गोपिकाबाई यांस असे वाटे कीं, त्यांस वागविण्याचा मान आपला आहे आणि राज्याची मालकी त्यांची असून रघुनाथराव दादासाहेब हे केवळ त्यांचे ताबेदार आहेत, म्हणून त्यांनीं हमेषा माधवरावाचे हुकुमाप्रमाणें वागून आपण त्यांची मातुश्री म्हणून आपल्यास बहुमान देत असावे. रघुनाथराव यांस असें वाटे कीं, आपण कैलासवासी नानासाहेब पेशवे यांचे सख्खे बंधु असून त्यांचे सर्व मसलतींत व स्वाऱ्यांत व राज्यकाराभारांतही भागीदार होतों. माधवराव पेशवे हे केवळ अल्पवयस्क व अज्ञान

---

(मागील पृष्ठावरून पुढें चालू)

रीच यंदा हिंदुस्थानांत यावी असा प्रकार होता; परंतु राहावे असा मनसबा येऊन प्राप्त झाला. राहिलों. चिक्कोडीपर्यंत करनाटकच्या बंदोबस्तास गेलों. तेथून चिरंजीव राजश्री राव यांची रवानगी फौज सुद्धां करनाटकांत करून आम्ही माघारी पुण्याकडे फिरून आलों. राजश्री मल्हारजी होळकर व गंगाधर यशवंत देशांत आले. राजश्री दमाजी गायकवाड यास यावयाचीं पत्रें पाठविलीं आहेत; अविलंबेच येतील. हे त्रिवर्ग व आम्ही मिळून जो मनसब पुढील कर्तव्याचा तो केला जाईल. निजामअल्ली खानाचे चित्तांत अद्यापि कुरूप आहे. ते विषयींची ही पैरवी होणें ती होईल. मुख्य गोष्ट तुम्ही व नारोशंकर एकविचारें राहून हिंदुस्थानचा बंदोबस्त करून किल्ले कायम राखणें. बहुत काय लिहिणें. रवाना चंद्र ७ साबान. * सारांश सांप्रत हिंदुस्थानचा सर्व अखत्यार तुम्हांवर आहे. कळेल तसा बंदोबस्त रक्षणें.

(पुढें चालू)

---

* हा पुढील मजकूर रघुनाथराव पेशवे यांचे स्वदस्तुरचा आहे.

आहेत व त्यांची मातुश्री गोपिकाबाई ही केवळ बायकोमाणूस असून तिजमध्यें स्त्रीजातीप्रमाणें दूरदृष्टी व पोंहोंच कमी आहे, याकरितां माधवराव लाहान आहेत तोंवर त्यांस वागविण्याचा मान आपला आहे. परंतु माधवरावाचे मर्जीचा कल मातुश्रीचे आज्ञेप्रमाणें वागण्याकडे विशेष होता यामुळें एके दिवशीं दरबारांत त्यांचे व रघुनाथराव यांचे कज्म्जास्त बोलणें होऊन उभयतांमध्यें बेबनाव झाला.

---

(मागील पृष्ठावरून समाप्त.)

बादजबरसात सरकारच्या फौजा व मल्हारबा येतीलच. निजामअली सुरळीत असला तर खासास्वारी येईल; परंतु निजामअलीचा भरंवसा नाहे. एकदा यांत शाहासुजातदौला हरएक मोघल ( सुद्धा ) याचे उरावर येतो तर हा केवळ मारला जाईल. आपणासही कांहीं नफा होईल; परंतु सांप्रतचा काळ विलक्षण आहे याजमुळें मनसबा साधणें संकट दिसतें. असो; होणें तें होतच आहे. आपण पुरुष प्रयत्नास चुकूंनये यास्तव चारी राजकारणें सुजातदौला व पातशाहा यांजकडे करणें. होता होईल तें खरें. पातशाहा व सुजातदौला हे अबदाल्लीस कंटाळले असले तरी जाट वगैरे लाहान मोठे हातीं घेऊन अबदाल्लीचें पारपत्य करावें असा मनसोबा होईसा आहे; परंतु शाहाणपणानें व तजवीजीनें केला पाहिजे. यास्तव नारो शंकर व तुम्ही एकविचारें होऊन हरएक पैरवी करणें. वरचेवर लिहीत जाणें. सर्व यखत्यार सांप्रत तुम्हां दोघांवर आहे. केदारजी शिंदे व महादजी शिंदे यांसही पाठविलें आहे. यांचेंहि स्वरूप राखून उपयोग पडेल तें करावें. सांप्रत शिंद्याचे जागीं तेंच आहेत. हे विनंती.



हें वर्तमान गोपिकाबाईस कळल्यावर त्यांनीं रघुनाथराव यास राज्यकारभारांतून काढून टाकण्याचा निश्चय केला आणि आपले मसलतींत त्रिंबकराव मामा पेठे, बाबूराव फडनवीस, बापूजी नाईक व पिराजीनाईक निंबाळकर व कितीएक लष्करी सरदार व मुत्सद्दी घेतले. आणि हुजुरातीची दरोबस्त फौज अनुकूल करून घेऊन दादासाहेब व त्यांचे पक्षाचे सरदार व मुत्सद्दी यांस कैद करण्याचा घाट घातला; आणि माधवराव पेशवे यांजकडून रघुनाथराव यांची नेमणूक रद्द करवून त्यांचे जागीं त्रिंबकराव मामा पेठे यांस मुख्य कारभारी नेमविलें. आणि गोपाळराव पटवर्धन यांस नायब दिवाण नेमवून त्यांचे हाताखालीं बाळाजी जनार्दन भानू (नाना फडनवीस) व हरीपंत फडके यांच्या योजना करविल्या.

ह्या गोष्टी घडल्या त्या वेळेस विठ्ठल शिवदेव उत्तर हिंदुस्थांत होते सबब रघुनाथराव यानीं त्यांस तावडतोब पुण्यास परत येण्याविषयीं निकडीचें पत्र पाठविलें. तें पत्र विठ्ठलराव यांस पोंहचतांच, त्यानीं आपले पुत्र शिवाजी विठ्ठल यांस ग्वाल्हेर येथें ठेविलें आणि आपण नारो शंकर राजेबाहादर यांस बरोबर घेऊन ऐनबरसातींत निघाले ते २७ दिवसांत पुण्यास येऊन दाखल झाले.

तेथें रघुनाथराव व त्यांचे तर्फेचे मुत्सद्दी व सरदार यांस कैद करण्याचा विचार अगदीं बेतावर आला होता. विठ्ठलराव पुण्यास आल्याचें वर्तमान गोपिकाबाई व त्यांचे पक्षाची मंडळी यांस लागतांच त्यांनीं त्यांसही कैद करण्याचा बेत केला. सुदैवेंकरून त्यांचे दोस्त मल्हारराव होळकर हे त्यावेळेस पुणें येथें होते. त्यांस वरील बेताची खबर लागतांच ती त्यानीं विठ्ठलराव यांस कळवून लागलेंच आपले जाहगिरीचे गांव वाफगांव येथें त्यांस पाठवून दिलें. विठ्ठलराव यांचे सुचनेवरून नारो शंकर राजेबाहादर हेही निघून मालेगांवास गेले. त्याचप्रमाणें रघुनाथरावही तावडतोब निघून विंचुरास गेले. त्यांचे मागून दिवाण

सखाराम बापू बोकील, नीळकंठ माहादेव पुरंदरे, जीवनराव केशव खासगीवाले, अंताजी माणकेश्वर यांचे पुत्र वगैरे मंडळी विंचुरास गेली. नंतर नारो शंकरही मालेगांवाहून तेथें आले. त्या वेळेस विठ्ठल शिवदेव यांचे कनिष्ठ पुत्र मल्हारराव व नरसिंगराव हे विंचूर येथेंच होते. त्यांनीं रघुनाथराव दादासाहेब यांस सामोरे जाऊन समारंभानें गांवांत आणिलें; आणि आपले वाड्यांत सर्वांचे राहण्याची सोय करून त्यांची योग्य रीतीनें बरदास्त ठेविली. रघुनाथराव दादासाहेब व सखारामबापू यांनीं विठ्ठल शिवदेव यांस विंचुरास तावडतोब येण्याविषयीं वाफगांवास निरनिराळीं पत्रें पाठविलीं. पैकीं रघुनाथराव दादासाहेब यांजकडून आलेलें पत्र खालीं दाखल केलें आहे:——

## श्रीशंकर.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री विठ्ठल शिवदेव स्वामी गोसावी यांसीं:—

पोष्य रघुनाथ बाजीराव. नमस्कार विनंती उपरि येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणें. विशेष; आम्ही दरमजल विंचूरास दाखल झालों. सखाराम भगवंत तेथें आले. कित्येक विचार केले आहेत तरी तुम्ही दर मजल येणें. वरकड सविस्तर मल्हारराव व नरसिंगराव लिहितील त्याजवरून कळेल. सखारामपंतांनींही पत्र लिहिलें आहे. त्यावरून कळेल. जाणीजे. चंद्र १३ सफर गुरुवार तिसरा प्रहर हे विनंति.

विठ्ठल शिवदेव विंचुरास आल्यावर राघोबादादा यानीं सर्व सरदार व मुत्सद्दी यांच्या सल्ल्यानें कमजारी करून सरकारची खासगत फौज वाढविली. त्या कामास पुष्कळ खर्च लागला. तो विठ्ठल शिवदेव यानीं कर्ज काढून पुरविला. नंतर राघोबादादानीं पुढें काय काय करावें व कसें वर्तावें यांविषयीं वर लिहिलेले नांवांचे सरदार व मुत्सद्दी यांनीं एकविचारें एक यादी

तयार केली आणि ती त्यांजकडे गुजराऊन तिचे प्रत्येक कलमावर त्यांचे कबुलायतीचे शेरे लिहून घेतले. ती अस्सल यादी खालीं दाखल केल्याप्रमाणें:—

यादी येणेंप्रमाणें स्वामीनीं करार करून द्यावयाची ऐकिली पाहिजे. सुरसंन् सलाससीतैन मया व आलफ् चंद्र १७ सफर.

१. श्रीमंत राजश्री भास्करराव आम्हास धनी द्यावें. दिवाणगिरी निळकंठ महादेव पुरंदरे यांस सांगावी. सखारामपंत यांणीं कारभार करावा. हालीं नारो शंकर व जीवनराव केशव हजर झाले. पुढें सरदार इकडे जे येतील त्याशीं मुलूक लावून द्यावे. त्यांच्या सनदा द्याव्या. हुजूरांत खाजगी याशीं माहाल नेमून द्यावें. किल्ले देशचे व गंगथडीचे सुटतील ते जिमे लावून द्यावे. येणेंप्रमाणें करार करावा.

१. दिवाणगिरीचा कारभार निळकंठ माहादेव यांजकडे;त्याचा कारभार सखाराम भगवंत यांजकडे. करार. वरकड लिहिल्याप्रमाणें कलमें करार. किल्ले सुटतील. ते निळकंठ माहादेव व सखाराम भगवंत यांचे विचारें जिमेस लावून घ्यावें. किल्ले त्र्यंबक व धोडप खाजगत चिरंजीवाकडे ठेवावे. येणेंप्रमाणें करार. चिरंजीव भास्करराव यांचे पायाशीं एकनिष्ठेनें वर्तणें व दौलत वाढेल तें करावें व ते थोर झालीयावर त्याचे आज्ञेत वर्तावें. तोंपर्यंत अखत्यार तुह्मांवर; व तुम्ही लिहिल्याप्रमाणें सदहु प्रमाणें कलम करार.

२. स्वामीनीं उमेद धरल्यावर पुण्याहून श्रीमंत बाई व रावसाहेब येतील. मोहो घालतील तो पडो न द्यावा ते आम्हांविषयीं आड घालतील जे याशीं हातीं द्यावे ही गोष्ट न ऐ-

२. उत्तम आहे त्यानीं आम्हांस सोडिलें असतां त्यांची भीड आम्हास काय आहे?

कावी ये विषयीं बेलभंडार शपथपूर्वक द्यावा.

३. आम्हां चौघांस फारकती द्यावी जे तुम्हाकडे सरकारचे लचांड कांहीं नाहीं. तुम्ही हरएक मनसब केला तरी तुम्हाकडे हरामखोरी नाहीं. तुमची कर्जवामें सरकारांत बुडाली आहेत. दौलत उभी राहिली तरी तुमचें तुम्ही घेणें अशीं पत्रें.

१ निलकंठ महादेव.
१ सखारामपंत.
० अंताजीपंताचें पुत्र.
१ नारोशंकर.
१ विठ्ठल शिवदेव.
१ जीवनराव केशव.
—
५

३. येणेंप्रमाणें साहा पत्रें कलम रुजूं पांचा जणास द्यावी पत्रें १.

४. मुरादखान यांजला बोलावून त्यांची आमची गांठ घालून ऐक्यता करून द्यावी करार १.

४. येणेंप्रमाणें कलम करार. मुरादखानाची व चौघा सरदाराची गांठ घालून दिली जाईल. करार.

५. राजश्री जानोजी भोंसले याजला पत्रें पाठवून बोलावून त्याची व आमची गांठ घालून ऐक्यता करून द्यावी. तुम्ही व आमचे सरदार एक होऊन राज्याचा बंदोबस्त करावा या

५. चिरंजीव भास्करराव व तुम्ही व सर्व आम्हाकडील सरदार मिळून राज्याचा बंदोबस्त करणें ह्मणोन पत्र घेणें व यादीप्रमाणें पत्रें दिलीं जातील. करार.

| | |
|---|---|
| प्रमाणें सागावें. आणि सरदार आले त्याशीं पत्रें व माहालकरी यांस पत्रें यादी तयार करून रवाना करावी. कलम. | |

येणें प्रमाणें पांच कलमें करार. नर्मदा तीरीं खाजगत खर्चाकडे करार. उत्तर तीर पंधरा कोस व दक्षिणतीर पंचवीस कोस दोन्ही डोंगरांतील मुलूख खाजगत खर्चाकडे ठेवावा. वरकड मुलूख सुटेल तो चिरंजीव भास्करराव याचे सनदे प्रमाणें वाटून घ्यावा. सर्व बंदोबस्त करून खाजगत खर्चाचे जाहागिरींत उपद्रव कांहीं लागूं देऊं नये. येणेंप्रमाणें करार. चित्रभानूनाम संवत्सरे, भाद्रपद वद्य २ रविवार, उत्तरा भाद्रपदा नक्षत्र. येणें प्रमाणें करार.

| | |
|---|---|
| तूर्त खर्चास रुपये २५००० पंचवीस हजार खाजगत खर्चास सर्वांनीं मिळून घ्यावें. पुढें आठ चार दिवस राहिले तरी दररोज हजार रुपये खर्चास देत जावें. | नवमी रविवारा अलिकडे पंचवीस रोख द्यावे. |

ह्या यादींत लिहिल्याप्रमाणें जातीचे तैनातीबद्दल व फौजेचे खर्चाबद्दल पूर्वी जो नक्त ऐवज मिळत होता त्याचे ऐवजीं त्या सरदारांनीं मुलुक घेण्याचा ठराव करून घेऊन त्याप्रमाणें दादासाहेब यांजपासून सनदाही करून घेतल्या. त्यावेळेस विठ्ठल शिवदेव यांस जातीची तैनात व फौजेचा खर्च याबद्दल सालीना आकार रुपये १६८५००० च्या मुलुखाच्या सनदा मिळाल्या.

नंतर एकत्र झालेले सरदार व मुत्सद्दी यांणीं आपापल्या फौजा वाढविल्या. आणि राघोबादादानीं आपले मदतीस येण्याविषयीं निजामाचा औरंगाबाद येथील सुभेदार मुरादखान याजबरोबर बोलणें लावून असा ठराव केला कीं, त्यांचे मदतीनें संपूर्ण पेशवाईत आपला अंमल अ-

धिकार स्थापन झाल्यावर आपण निजाम यास दौलताबाद, शिवनेरी, ( जुन्नर ) अहमदनगर, आणि अशेरी येथील किल्ले व त्या शिवाय सालीना एक्कावन लाख रुपयांचे उत्पन्नाचा मुलूख द्यावा. हा ठराव मुरादखानानें निजाम यांस कळविल्यावर, त्यानीं प्रथम त्या सरदारास वीस हजार फौजेनिशीं राघोबादादा यांचे मदतीस तावडतोब जाण्याविषयीं हुकूम केला, आणि आपणही हैदराबादेहून पन्नास हजार फौजेनिशीं निघून त्याच कार्यास्तव औरंगाबादेकडे कूच केला. त्या हुकूमाबरहुकूम मुरादखान हा लवकरच वीस हजार फौजेनिशीं विंचुरास येऊन पोहोंचला. नंतर राघोबादादांकडील एकत्र जमलेल्या फौजेनें पुण्याकडे कुच केला. पुण्याहूनही माधवराव पेशवे त्र्यंबकमामा पेठे, गोपाळराव पटवर्धन, प्रतिनिधी वगैरे सरदार व हुजरात बरोबर घेऊन निघाले ते घोडनदीजवळ हिंगणी गांवापर्यंत येऊन पोहोंचले. तेथे दोन्ही फौजांची गांठ पडतांच लढाईस सुरुवात झाली. परंतु राघोबादादाकडील फौजेची संख्या फारच मोठी असल्यामुळें पेशव्यांचे फौजेचें तिजपुढें कांहींच चालेनासें होऊन शेवटीं तिची दाणादाण झाली, आणि राघोबादादांकडील सरदारांनीं माधवराव पेशवे अंबारींत असतां तो हत्ती वळवून आपले छावणींत नेला. त्या प्रसंगीं माधवराव यानीं मोठ्या चातुर्यानें व दक्षतेनें वर्तन केलें. तें असें कीं त्या दुर्घट प्रसंगीं लीनता धरणें यांतच आपला तरणोपाय आहे असें त्यांस वाटल्यावरून ते आपले चुलते यांस हात जोडून म्हणाले कीं, “ काका ! आपल्या घरांत कलह असणें हें आपल्या नाशाचें कारण आहे. याकरितां मी आपले ताब्यांत राहातों. आपले मर्जीस येईल त्याप्रमाणें आपण राज्यकारभार चालवावा ” हें त्या तरुण पेशव्याचें समयोचित भाषण राघोबादादांस फार चांगलें वाटून त्यानीं त्यास आपले स्वाधीन ठेविलें. परंतु त्यास बहुमान देण्यांत बिलकुल कसर केली नाहीं. हें माधवरावाचें वर्तन गोपाळराव पटवर्धन व

प्रतिनिधी यांस नीट न वाटून त्यांनीं त्यांस विचारलें कीं " आतां आमची काय वाट ? " तेव्हां माधवराव यानीं त्यांस सांगितलें कीं " या प्रसंगीं आपला प्राण व हुरमत वांचविण्यास्तव तुह्मीं कोठें तरी निघून जावें; योग्य समयीं मी तुह्मांस विसरणार नाहीं. " त्यावरून ते उभयतां लागलेंच निघून हैदराबादेस गेले. त्यांची निजामानें मोठी खातर करून त्यांस आपले आश्रयाखालीं ठेवून घेतलें. निजामअल्ली पन्नासहजार फौजेनिशीं राघोबादादांचे मदतीस्तव येण्यास निघाले असें वर लिहिलें आहे. त्यांची व राघोबादादा यांची पांडेपेडगांव येथें भेट झाली. तेथें उभयतां चुलतेपुतण्ये यांचा समेट झाला असें निजामांस कळल्यावरून त्यानीं छद्मीपणानें राघोबादादास असें बोलून दाखविलें कीं " तुमचें ऐक्य झालेलें पाहून मला मोठा संतोष वाटतो. "

ही भेट झाल्यानंतर राघोबादादा माधवरावसाहेबांसह पुण्यास निघून गेले व निजामही हैदराबादेस गेले.

राघोबादादानीं राज्यकारभार हातीं घेतल्यावर आपल्या कारकीर्दीची पहिली तजवीज म्हणून निळकंठ माहादेव पुरंदरे यांस मुख्य दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं; सखाराम भगवंत बोकील यांस नायबदिवाण केलें; मोरो बाबूराव फडणवीस यांस दूर करून त्यांचे जागीं चिंतो विठ्ठल राईरकर यांस नेमिलें; विठ्ठल शिवदेव विंचूरकर यांस आमात्य पद दिलें; आणि प्रतिनिधीचें पद आपला पुत्र भास्करराव यास दिलें;परंतु भास्करराव बाल्यावस्थेंत होता म्हणून नारो शंकर राजेबाहदर यांस त्याचे मुतालीक नेमिलें.

गोपाळराव पटवर्धन निजामाकडे जाऊन मिळाले म्हणून राघोबादादा यानीं त्यांच्या मिरज येथील किल्यावर मोर्चे लाविले गोपाळरावाचे वडील गोविंद हरि पटवर्धन हे मिरजेस होते. त्यानीं

तो किल्ला न घेण्याविषयीं राघोबादादाची मोठी मिनतवारी केली. परंतु ती न मानून त्यानीं त्या किल्लयावर हल्ला केला. तेव्हां गोविंद हरी यानीं विठ्ठल शिवदेव विंचूरकर व नारो शंकर राजेबाहादर यांस भेटून त्यांचे मार्फत राघोबादादास अशी विनंति केली कीं, " आह्मांस मंगळवेढयास पोहोंचतें करावें आणि जरी किल्ला घेतला तरी त्याची खराबी करूं नये. " ही विनंति राघोबादादानीं मान्य केल्यावर विठ्ठल शिवदेव यानीं त्यांचे आज्ञेवरून गोविंद हरीस मंगळवेढयास पोहोंचतें केलें. नंतर राघोबादादानीं तो किल्ला घेऊन त्यांत व गांवांत लूट केली. माधवराव पेशवे यांस प्रतिबंधांत ठेवून राघोबादादा स्वतंत्रपणें राज्यकारभार करूं लागल्यापासून त्यानीं जें जें वर्तन केलें तें तें मोठ्या सरदारांपैकीं कोणासही आवडलें नाहीं. आणि हाल्लीं मिरजेस लूट केल्यामुळें तर सर्वांसच नाखुषी प्राप्त होऊन कितीएक सरदार हैदराबादेस निघून गेले. त्याचप्रमाणें प्रख्यात धनाजी जाधव याचा नातू रामचंद्रराव जाधव हाही निजामाकडे जाऊन मिळाला. या वर लिहिलेल्या दरोबस्त सरदारांस आपलेंसें करून घ्यावें म्हणून निजामाचे दिवाण विठ्ठल सुंदर यानीं त्यांस मोठमोठ्या नेमणुका करून देऊन त्यांची मोठी खातर केली. त्याचें कारण पुढें लिहितों.

पानिपतचे लढाईचा घातकारक परिणाम झाल्यानें मराठे लोकांचे अति मोठें नुकसान होऊन त्यांस मोठी खिन्नता प्राप्त झाली होती. ही संधी पेशव्याचें राज्य नष्ट करण्यास उत्तम आहे असें निजामाचे त्या वेळचे दिवाण विठ्ठल सुंदर* यांस वाटल्यावरून

---

* हे दक्षणी यजुर्वेदी ब्राम्हण असून मुळचे संगमनेर येथील राहाणारे होते. ते प्रतिनिधीचे मुतालिक यमाजी गमाजी यांचे आप्त होते. निजामाचे दरबारांत कित्येक वर्षेपर्यंत त्यानीं ने-

(पुढें चालू)

त्यानीं दक्षण महाराष्ट्र देशांतील पटवर्धन वगैरे सरदार यास फितविण्याचा उद्योग चालूं केला होता. इतक्यांत माधवराव पेशवे आपल्या चुलत्याच्या आधीन झाल्यामुळें त्यांचे पक्षाचे कितीएक सरदार आपोआप निजामाकडे जाऊन मिळाले. खेरीज मुरादखानाबरोबर राघोबादादानीं ठराव केल्याप्रमाणें पेशव्यांचे कामगारांकडून फक्त दौलताबादचा किल्ला मात्र निजामाचे ताब्यांत गेला. बाकीचे किल्ले व मुलूख देण्याविषयीं राघोबादादाचा हुकूम झाला असतांनाही त्यांच्या कामगारांनीं तो अमलांत आणिला नव्हता. ह्या गोष्टीमुळें पुण्यावर स्वारी करण्यास कारण होऊन दिवाण मौसुफ् यानीं ती करण्याविषयीं निजामास हुरूप आणिला. तेव्हां हैदराबाद येथें लढाईची तयारी होऊं लागली. ती झाल्यावर निजामाचे लष्कराचा पुण्याकडे कूच झाला. या मोहिमेवर खुद्द निजाम व त्यांचे दिवाण विठ्ठल सुंदर हे जातीनें आले असून त्यांच्या बोलावण्यावरून नागपूरचे जानोजी भोंसले हेही १५००० स्वारांनिशीं आले होते. शिवाय राघोबादादाशीं नाखूष होऊन गेलेले पटवर्धन वगैरे सरदारही आपापल्या फौजांनिशीं निजामा बरोबर आले होते.

निजाम आपल्यावर एवढ्या तयारीनें स्वारी करील असें राघोबादादा यांस मुळींच वाटलें नव्हतें; म्हणून त्यानीं त्याजबरोबर युद्ध करण्याची तयारी केली नव्हती. त्यांजजवळ जरी मल्हारराव होळकर व दमाजी गायकवाड वगैरे आपापल्या फौजांनिशीं

---

(मागील पृष्ठावरून समाप्त)

कीनें नौकरी केल्यावर निजामअली यानीं सन १७६२ चे जून महिन्यांत आपला भाऊ सलाबतजंग यास कैदेंत ठेविलें त्यावेळेस त्यांस (विठ्ठल सुंदर यांस) दिवाणाचे पदवीस चढविलें. पुढें सन १७६२ चे अखेरीस मुरादखानानें राघोबादादा बरोबर जो ठराव केला तेणेंकरून विठ्ठल सुंदर यांचे मनांत मुरादखानाविषयीं द्वेषभाव उत्पन्न होऊन त्यानीं पेशव्याबरोबर नवीन युद्ध उपस्थित करण्याचा विचार काढिला.

होते तरी त्यांची एकंदर फौज निजामाचे जबरदस्त फौजेपुढें टिकण्याजोगी नव्हती. म्हणून त्यानीं असा बेत केला कीं निजामाना सामना न करितां त्यांस इकडून तिकडे व तिकडून इकडे असें चक्कर देऊन आणि संधी साधेल त्या वेळेस त्यांच्या फौजेच्या लाहान टोळ्यावर हल्ले करून त्या माराव्या आणि त्यांच्या शहरांवर हल्ले करून व त्यांचे मुलकांत लुटपाट करून त्यांस बेदम करावें; म्हणजे ते कंटाळतील, आणि कांहीं तरी तह करून माघारे जातील. हा बेत सिद्धीस नेण्यास्तव राघोबादादा यानीं माधवराव पेशवे यांसहीत पुण्याहून कूच केला आणि प्रथम निजामासमूर युद्धास गेल्याचें मीष करून नंतर त्यास झुकांडी दिली आणि औरंगाबादेस जाऊन तें शहर लुटण्याचा इरादा केला. परंतु तें शहर कोटबंदी असल्यामुळें तो इरादा शेवटास गेला नाहीं. मग जानोजी भोंसले निजामाचे मदतीस आले होते, सबब त्यानीं (राघोबादादानीं) त्यांचे मुलुकांत शिरून त्यांचा मुलुक लुटतां लुटतां मलकापूर शहरापासून साठ हजार रुपये खंडणी घेतली. नंतर त्यानीं निजामाचे मुलुकांत शिरून त्यांत मोठी लूट केली, आणि शेवटीं हैदराबाद लुटण्याचे इराद्यानें त्याजवर चाल केली. परंतु त्या शहरास मजबूत व उंच असा कोट असल्यामुळें त्यांत त्यांस प्रवेश करितां आला नाहीं. तत्रापि त्या कोटा बाहेरच्या पेठेपासून त्यानीं एक लाख ऐंशी हजार रुपये खंडणी बद्दल घेतले.

निजामअल्ली प्रथम आपले फौजेनिशीं राघोबादादा यांचें पाठीस लागले; परंतु शेवटीं त्यांस त्यांचा पाठलाग करण्याचा त्रास आला, तेव्हां त्यांनीं प्रतिक्रिया करण्यास्तव पुणें शहर जाळून टाकण्याचा निश्चय करून त्याजवर चाल केली. हें वर्तमान ऐकून पुण्यांतील लोकांस मोठें संकट प्राप्त झालें. मग आपला बचाव करण्यास्तव किती एक गृहस्थ आपापलीं कुटुंबें व मौल्यवान् चीजवस्त बरोबर घेऊन आश्रयाकरितां आसपासच्या मजबूत

पाहाडी किल्ल्यांत जाऊन राहिले व कितीएक तर कोंकणांत निघून गेले. निजामअल्ली आपले लष्करसुद्धां पुण्यास येऊन पोंहचल्यावर त्यांनीं त्यांतील पुष्कळ वाडे जाळून टाकिले व कितीएक मोडून टाकिले; परंतु ज्या वाड्यांचे बचावाबद्दल त्यांस रोख ऐवज मिळाला त्या वाड्यास त्यांनीं उपसर्ग लाविला नाहीं; बाकी त्या शहराचा बराच भाग लुटून फस्त केला—पेशव्यांचे शनिवारचे वाड्याबद्दल नारो आपाजी तुळसीबागवाले यानीं पैसा भरिल्यामुळें त्याचा बचाव झाला. नंतर निजामअल्ली यानीं पुरंदर तालुक्यांत जाऊन पुष्कळ मुलुक उद्वस्त केला, आणि पर्जन्यकाळ समीप आला सबब बेदरास परत जाण्याचा विचार केला; परंतु त्यांजबरोबर जानोजी भोसला होता त्यानें त्यांस औरंगाबाद येथें राहाण्याची सल्ला दिल्यावरून त्यानीं त्या शहराकडे कूच केला.

राघोबादादा हैदराबादेहून पुण्याकडे परत येत असतां, रस्त्यांत त्यांचे गुप्त बातमीदारांनीं त्यांस पुणें लुटले गेल्याची खबर कळविली. ती ऐकून उभयतां चुलतेपुतण्ये यांस अत्यंत दुःख झालें. आणि माधवराव पेशवे यांस गहिंवर येऊन ते राघोबादादांस म्हणाले कीं, " काका! मोघल लोकांनीं पानिपत येथें आपल्या लोकांचा जो नाश व पराजय केला व ज्याचे कारणानें वडील नानासाहेब यांचा अकालीं देहांत झाला त्याचें स्मरण तुम्हांस नाहीं काय? त्याबद्दल मोघल लोकांचा सूड उगविण्याचा यत्न करणें सोडून देऊन आपण आपसांत तंटे करण्यांत निमग्न झालों आहों याचा विचार करा; स्वर्गीं वडील आपल्यास काय ह्मणतील इकडे दृष्टी द्या; अजून तरी आपसांतील वैमनस्य विसरून प्रथम आपले राज्यास जेणेंकरून मजबुती येईल ती गोष्ट करा. नंतर मोघलांचा सूड घेण्यास उद्युक्त व्हा." या बोलण्यानें आपण केलेल्या तंट्याबद्दल राघोबादादा यांस वाईट वाटून त्यांचे मनांत माधवराव यांजबरोबर समेट करण्याचा विचार घोळू

लागला आणि पटवर्धन वगैरे जे आपले पदरचे सरदार व मानकरी आपले द्वंद्वामुळें निराधार होऊन केवळ आपले प्राण व दुरमत वांचविण्यास्तवच निजामाकडे मिळाले होते त्यांस परत बोलाविण्याची गोष्ट माधवरावानीं काढतांच राघोबादादानीं त्या गोष्टीस तात्काळ मोकळ्या मनानें रुकार दिला. राघोबादादा म्हणाले कीं, "रावसाहेब! तू चिंता करूं नको. ईश्वरकृपेनें उद्भवलेल्या संकटाचें निवारण झालें म्हणजे इतर सर्व गोष्टींची व्यवस्था मी तुझ्या इच्छेप्रमाणें करीन." याप्रमाणें उभयतां चुलतेपुतण्ये यांजमध्यें समजुतीचें भाषण होऊन समेट होतांच माधवराव पेशवे यानीं पटवर्धन वगैरे जे आपले सरदार निजामाकडे गेले होते त्यांस परत येण्याविषयीं विश्वास येण्याजोग्या मनुष्यांबरोबर पत्रें पाठवून त्यांत अभयवचन व आश्वासन लिहून कळविलें. हीं पत्रें त्या सरदारांस पोंहतांच ते सर्व आपापल्या फौजांनिशीं पेशव्यांचे लष्करास परत आले. ते निजामांचे लष्करांतून जातांच त्यांचे लष्कर हलकें झालें. मग राघोबादादानीं माधवराव यांचे सल्लयानें जे इतर मराठे सरदार निजामांकडे होते त्यांस त्यांपासून फोडण्याचा उद्योग चालविला असतां, निजामांकडून जानोजी भोंसले याचा व्हावा तसा फायदा न झाल्यामुळें तो आपल्यास अनुकूल होईल असें त्यांस वाटलें. त्यावरून त्यानीं त्याशीं बत्तिस लाख रुपयांचा मुलुक देण्याचा गुप्त ठराव करून त्यास आपलेसें करून घेतलें.

निजामाचें लष्कर औरंगाबादेकडे चाललें असें वर लिहिलें आहे. तें गोदावरीचे किनाऱ्यावर पोंहोचतांच, निजामअली आपल्या कितीएक सरदारांनिशीं त्या नदीपलीकडे उतरून गेले. त्यांचें बाकीचें लष्कर त्यांचे दिवाण विठ्ठल सुंदर यांचे हाताखालीं त्या नदीचे दुसरे कांठीं राक्षसभुवन गांवाजवळ तळ देऊन पडलें होतें. निजामअली पार उतरून जातांच जानोजी भोंसले हा आपले फौजेस खर्चास वेळेवर ऐवज मिळत नाहीं असा बाहाणा करून त्या दिवाणापासून दूर उतरला. जानोजी अलग झाला ही जशी राघो

बादादास निजामांचे लष्करावर हल्ला करण्यास एक सूचनाच झाली. त्यावेळेस राघोबादादा मोठ्या अंतरावर होते.त्यांनीं आपल्या दरोबस्त फौजेनिशीं मोठाल्या मजला करीत सत्वर जाऊन विठ्ठल सुंदर यांचे फौजेवर हल्ला केला. तेव्हां लढाई सुरूं झाली. त्या लढाईस मराठे लोक राक्षसभुवनची लढाई असें म्हणतात. व कोणी कोणी तेरदळची लढाई असेंही म्हणतात. ती सतत दोन दिवस मोठ्या निकरानें झाली. दुसऱ्या दिवशीं असें झालें कीं, राघोबादादा व सखारामबापू हे उभयतां एक हत्तीचे अंबारींत बसलेले असून आपल्या फौजेस लढण्यास उत्तेजन देत असतां मोघल फौजेनें त्यांच्या फौजेस मागें हटविलें आणि त्यांच्या हत्तीस गराडा घालून तो ताब्यांत घेतला. त्याचप्रमाणें पेशव्यांचा जरीपटक्याचा हत्तीही मोघल फौजेनें घेरिला. परंतु तो हत्ती जरीपटक्याचें निशाण तोंडांत धरून आणि आपल्या घेरणारांस लाताडून तेथून झपाट्यानें निघाला तो मागें माधवराव पेशवे यांच्या तंबूजवळ येऊन पोंहोचला. तो हत्ती पाहून आपल्या फौजेची दाणादाण झाली असें माधवराव यांस वाटलें आणि ते जरी राघोबादादा यांच्या प्रतिबंधांत होते तरी राघोबादादाचा मोड झाल्यानें त्यांस आनंद होणारा नव्हता, कारण राघोबादादाचा जो मोड झाला तोच आपला मोड झाला असें त्यांस वाटलें. मग त्यानीं आपल्या वरील पाहाऱ्याचे सरदारास जवळ बोलाविलें आणि राघोबादादाचा मोड झालासा दिसतो असें त्यांस कळवून " आझूनही तुम्ही मला कैदेंतच ठेवणार कीं काय ? " असें त्यांस विचारिलें. त्या सरदारानें जबाब दिला कीं " आपण कैदेंत आहां असें कोण मानील ? आपण या प्रसंगीं सुचेल ती तजवीज करावी. तळावर असलेली सर्व फौज आपल्या आज्ञेची वाट पाहात आहे. " त्याजवर माधवराव म्हणाले कीं " बरें तर तयार व्हा " इतकें बोलून त्यानीं कंबर बांधिली. मग त्या सरदारानें हिकडून तिकडून सरासरी

पांच हजार स्वार जमा केले, आणि त्यानीं बसण्यास्तव मागितलेला घोडा हाजीर करितांच माधवराव त्याजवर बसले. इतक्यांत एका स्वारानें असें वर्तमान आणिलें कीं, राघोबादादास मोघल लोक कैद करून घेऊन चालले आहेत. मग काय विचारावें ? माधवरावांचे अंगांत अत्यंत वीरश्री उत्पन्न झाली. आणि त्यानीं त्या फक्त पांच हजार स्वारांनिशीं मोघलाचे फौजेंत दोन्ही बाजूंनीं रस्ता कापीत जाऊन रण तुंबळ केलें. हें पाहून त्यांची जी हुजुरात त्यापूर्वीं प्रसन्न अंतःकरणेंकरून लढली नसून पळण्याचे बेतांत होती तिला धैर्य येऊन तिनेंही पुन्हा झपाट्यानें हल्ला केला. तेव्हां त्या बाजूस मोघलांचा अगदीं मोड झाला. नंतर माधवरावानीं खुद्द विठ्ठल सुंदर यांस गांठून त्यांजवर हल्ला केला आणि त्यांस कत्तल करून त्या बाजूचे फौजेचा अगदीं मोड केला. याप्रमाणें दोन्ही बाजूंनीं मोघलांचा अगदीं मोड होऊन पळ निघाला. तत्रापि पळणारे मोघल लोक राघोबादादाचा हत्ती बरोबर घेऊन चालले होते. त्यांजवर माधवराव यानीं हल्ला करून तो हत्ती हिसकावून घेतला आणि त्यांचा पाठलाग करून त्यांची मोठी कत्तल उडविली. नंतर माधवराव राघोबादादाचा हत्ती घेऊन जयश्रीनें आपल्या तंबूस परत आले. ते व राघोबादादा हत्तीवरून खालीं उतरून तंबूंत बसल्यावर, राघोबादादा सखारामबापूकडे पाहून म्हणाले कीं " बापू ! आज मी कृतकृत्य झालों. रावसाहेब अल्पवयस्क असल्यामुळें कांहीं दिवसपर्यंत राज्य संभाळावें असें माझें मनांत होतें; परंतु तो तें संभाळील अशी माझी आज पूर्ण खातरी झाली आहे, कारण, तो येथें नसतां तर आज आपली काय वाट झाली असती बरें ? परंतु कसें झालें तरी आपलें तें आपलेंच. " इतकें बोलून ते माधवराव यांस म्हणाले कीं " मुला ! तू आतां आपलें राज्य संभाळण्यास योग्य झालास यांत

बिलकूल संशय नाहीं. याकरितां मी आतां तुझ्या प्रतिबंधांत राहातों आणि तूं तें आपले इच्छेप्रमाणें चालीव." त्याजवर माधवराव यानीं जबाब दिला कीं "काका! आपण रिकामे झाला असें समजूं नये. मला जरी आपण मुखत्यारी देत आहां, तरी मी आपल्या सल्लयाशिवाय कांहीं करणार नाहीं." असें बोलून सर्वांचे देखत माधवरावानीं राघोबादादाचे पायांवर मस्तक ठेविलें.

वर लिहिलेली लढाई सुरू झाली त्यावेळेस निजाम व त्यांचे दिवाण यांच्या दरम्यान गोदावरी नदी वाहत असल्यानें निजाम यांस त्या दिवाणास मदत करितां आली नाहीं, यामुळें त्याचा अगदीं मोड झाला. तो पाहून निजामानीं औरंगाबादेकडे कूच केला; परंतु पेशव्याकडील सरदार लागलेच ती नदी उतरून त्यांच्या पाठीस लागले. पाठलाग करणाऱ्या फौजेच्या आघाडीस विठ्ठल शिवदेव विंचूरकर हे आपल्या टोळीनिशीं होते. विठ्ठल सुंदर यांजबरोबर झालेल्या लढाईंत ज्या हत्तीवरील अंबारींत राघोबादादा बसले होते तो हत्ती मोघल लोकांनीं ताब्यांत घेऊन आपल्या लष्करांत चालविला असतां, त्या प्रसंगीं त्यांस सोडवून आणण्यास्तव आपल्या हातांनीं कांहींच पराक्रम झाला नाहीं हें आपल्या शिपाईगिरीस मोठें लांछन आहे. हाल्लीं ईश्वरकृपेनें त्या गोष्टीचा बदला घेण्याची वेळ आली आहे. अशा वेळेस आपण मोघल लोकांस हात दाखविला नाहीं तर आपण कांहींच केलें नाहीं असें त्यांस ( विठ्ठल शिवदेव यांस ) वाटून त्यांचे मनांत पराकाष्ठेची वीरश्री उत्पन्न झाली. मग त्यानीं झपाटयानें जाऊन निजामांचे स्वारीस औरंगाबाद शहराचे अलीकडचे बाजूस गांठिलें, आणि आपल्या एकदिलाच्या पांच हजार मानकरी स्वारांनिशीं निजामांचे हत्तीवर अत्यंत वेगानें हल्ला केला. तेव्हां मोठी चकाचकी उडाली. तींत पहिल्या सपाटयास विंचूरकर यांचे सुमारें दोन हजार मानकरी पडले; परंतु त्यानीं निजामांकडील मोघल स्वार पांच हजारांवर

कत्तल केले: आणि विठ्ठलराव यानीं स्वतः बाकीच्या मानकऱ्यांनिशीं निजामाचे हत्तीपर्यंत रस्ता कापीत जाऊन त्या हत्तीस गराडा घातला. तो पाहून निजामाकडील एक मोघल सरदारानें मोठ्या झपाट्यानें गराडा घालणारांवर पडून निजामाचा हत्ती सोडविण्याचा यत्न केला. तेव्हां लढाई मोठ्या त्वेषानें व दृढनिश्चयानें झाली. ती चालली असतां निजामांचे माहातानें त्यांच्या अंबारीचा हत्ती मोठ्या पितावीनें त्या लढाईतून पळवून नेला. तो पकडण्याकरितां मल्हारराव होळकर जे नुकतेच आपल्या स्वारांनिशीं पुढें वाहून आले होते, त्यानीं बहुत प्रयत्न केला. परंतु त्या कोटबंदी शहराच्या वेशीचा दरवाजा जवळ असल्यामुळें माहातानें तो हत्ती लागलाच आंत नेला. नंतर निजामांचे हुकुमानें मोघल लोकांनीं तो दरवाजा तत्काळ बंद केला. परंतु कोटाबाहेरील मोघल फौजेची मोठी कत्तल उडून त्यांपैकीं थोडे स्वार मात्र पळून गेले.

याप्रमाणें निजामअल्लीस औरंगाबाद शहराचा आश्रय मिळाला; परंतु पेशव्यांची संपूर्ण फौज मागून येतच होती. ती आल्यावर आपला टिकाव लागणार नाहीं असें त्यांनीं पाहून राघोबादादा यांजकडे तहाचें बोलणें बोलण्यास वकील पाठविला, आणि तह करण्याचें ठरल्यावर आपण स्वतः त्यांच्या भेटीस गेले. त्या भेटींत ते राघोबादादास म्हणाले कीं "ही लढाई दिवाण विठ्ठल सुंदर यानींच उपस्थित केली. मजकडे कांहीं नाहीं. मला तर त्याबद्दल फार वाईट वाटतें." असें बोलून त्यानीं राघोबादादाची मर्जी प्रसन्न करून घेतली. नंतर तह झाला. राघोबादादा यानीं पूर्वी जो एकावन लक्षाचा मुलुक त्यांस देउं केला होता त्यांपैकीं त्यानीं दाहा लक्षाचा मुलुक मात्र यावेळेस त्यांस दिला. पुढें एक दोन रोजांनीं राघोबादादानीं जानोजी भोंसले यांस भेटीस बोलाविलें आणि उघड दरबारांत निजामाकडे

भिळाल्याबद्दल त्यांस दोष देऊन नंतर त्यांस कराराप्रमाणें बत्तीस लाख रुपयांचे मुलुकाची सनद दिली. याप्रमाणें या लढाईचा शेवट लागल्यावर, निजामअल्ली हे हैदराबादेस परत गेले, व राघोबादादा माधवरावासह पुण्यास आले.

माधवरावसाहेब दौलतीचा सर्व अधिकार चालवूं लागल्यावर पटवर्धन यांचा मिरजेचा किल्ला पूर्वी राघोबादादांनीं घेतला होता तो त्यानीं पटवर्धन यांस परत दिला; सखारामबापू बोकील यांस त्यांचे हुद्यावर कायम केलें; प्रतिनिधीचें पद मूळच्या प्रतिनिधीस परत दिलें; चिंतो विठ्ठल यांजकडून फडनवीसाचा हुद्दा घेऊन तो बाळाजी जनार्दन भानू ( नाना फडणवीस ) यांस दिला. पेशजी राघोबादादाचा मुक्काम विंचूर येथें असतां त्यांनीं आपले पक्षाचे सरदार लोकांस फौजेचे गुजाऱ्याकरितां नक्त ऐवज देण्याचे मोबदला मुलुकाच्या निरनिराळ्या सनदा करून दिल्या असें वर लिहिलें आहे. त्या सनदांप्रमाणें मुलुक तोडून दिले असतां सरकारचा मुलुक पुष्कळ जाऊन सरकार खासगीस फार थोडा मुलुक राहील; शिवाय इतर सरदारांबरोबर पटवर्धन व रास्ते यांस निरनिराळ्या मुलुकांचे सरंजाम करून देणें जरूर आहे; असें माधवराव यांस वाटल्यावरून त्यानीं राघोबादादा व सखारामबापूसह मुत्सद्दी मंडळ यांजबरोबर त्या गोष्टीबद्दल वाटाघाट केली. शेवटीं सर्वांचे विचारें असें ठरलें कीं, विंचूर मुक्कामीं राघोबादादानीं करून दिलेल्या सनदांत जे सरंजाम लिहिले आहेत त्यांपैकीं एक चतुर्थांश सरकारांत परत घ्यावा. परंतु हा ठराव विठ्ठल शिवदेव हे कदाचित कबूल करणार नाहींत असें माधवराव यांस वाटल्यावरून त्यानीं त्यांची समजूत करण्याविषयीं राघोबादादा यांस विनंति केली. त्याप्रमाणें राघोबादादानीं विंचूरकराची समजूत केल्यावर माधवराव यानीं सर्व सनदवाल्या सरदारांच्या मुलुकांचे चतुर्थांश खालसा करून बाकी तिजाई मुलुकांच्या न-

वीन सनदा त्यांस करून दिल्या. त्याच वेळेस त्यांनीं पटवर्धन व रास्ते यांस ही फौजेच्या गुजाऱ्याकरितां मुलुक तोडून देऊन नवीन सनदा दिल्या. पटवर्धन यांचे सनदेंत विंचूरकराप्रमाणें स्वार व घोडे व इतर जंगी सामान त्यांनीं ( पटवर्धन यांनीं ) जवळ बाळगावें अशी शर्त लिहिलेली होती. ही व्यवस्था सन १७६२ इसवी सालचे आखेरीस झाली. त्यावेळेस विठ्ठल शिवदेव विंचूरकर यांस जो मुलुक मिळाला, त्यापैकीं खानदेशांत धुळें, सोनगरी वगैरे माहाल; गंगथडींत पाटोदें परगणा वगैरे; गुजराथेंत उरपाड माहाल; माळव्यांत सिहुर, आष्टें, दुराया, देवीपुरा आणि इछावर हे पांच माहाल; व ग्वालेरीनजीक भितरवार वगैरे पांच माहाल, असा होता.

संनसत्राशें चौसष्ट सालीं कर्नाटकांत हैदरअल्ली याजवर स्वारी करण्याचा बेत ठरून पुण्यास फौजेची तयारी चालली. त्यावेळेस मल्हारराव होळकर हे पेशवे यांच्या बोलावण्यावरून पंधरा हजार स्वारांनिशीं पुण्यास येऊन पोंहोचले. थोरले माधवराव हे स्वभावानें फार खुनशी असत. विठ्ठल शिवदेव हे दादासाहेब यांचे पक्षांतील असल्यामुळें त्याणीं विंचूर येथें दादासाहेबांची उभारणी करून त्यांचे तर्फेनें आपल्याबरोबर लढाईही केली होती; ही गोष्ट त्यांच्या ( माधवराव पेशवे यांच्या ) मनांत राहून कधीं तरी त्यांची मानखंडना करावी असा त्यांचा इरादा होता. एके दिवशीं असें झालें कीं, विंचूरकर यांचे कितीएक मानकरी मैदानांत घोडे फिरवीत असतां मौज पाहाण्यास्तव तेथें पेशवे यांचेही कांहीं मानकरी गेले. आणि कांहीं क्षुल्लक कारणावरून तंटा उपस्थित झाला. तेव्हां उभयपक्षांचे मदती कारितां उभयपक्षांचे दोस्त धांवून गेले आणि लाहानशा लढाईसारखाच प्रकार झाला. हें वर्तमान माधवराव पेशवे यांचे कानावर जातांच त्यांस संताप येऊन त्यांनीं एकदम हुकूम केला कीं, विठ्ठलराव यांस कैद करून त्यांचा गोट लुटावा. ही खबर विठ्ठल शिवदेव यांस कळतांच

प्रथम त्यानीं दादासाहेबांस चिठ्ठीनें सविस्तर मजकूर लिहून कळविला. त्याचें उत्तर त्यांस दादासाहेबांकडून स्वदस्तुरचें आलें तें असें:—

## श्रीशंकर.

राजश्री विठ्ठलराव उमदेतुल्मुल्क बाहादर स्वामी गोसावी यांस.

विनंति उपरी. चिठ्ठी पाठविली ती पावली. किरकोळ कज्यासाठीं उदासपणें लिहिलें, तरी असें तुम्हींही न करावें व चिरंजीवही करणार नाहींत. किरकोळ मजकुरासाठीं वाईट राखवावें हें काय? असे कज्यासाठीं दुतर्फेही सांड असावी. मी चिरंजीवासही सांगून पाठवितों. तुम्हींहि उदास न होणें हे विनंति.

तथापि रावसाहेबांचा स्वभाव आग्रही असल्यामुळें दादासाहेबांचे सूचनेप्रमाणें होईल असें विठ्ठलराव यांस वाटलें नाहीं. सबब त्यानीं दुसरे दिवशीं मागील चार घटिका रात्रीं स्नान करून आपले कुलस्वामीची पूजा केली; आणि घरची सर्व शेवटची निरवानिरव करून पांच हजार फौजेनिशीं कंबरबंदी केली; आणि आपले दिवाण चिमणाजी खंडेराव व फौजेवरील मुख्य अधिकारी आबूराव विठ्ठल वगैरे यांस बोलावून सांगितलें कीं "मित्रहो! बाजीरावसाहेब यांचे अव्वली पासून आजपर्यंत मी सरकारचाकरी एकनिष्ठेनें करून हुरमत मिळविली; परंतु हल्लींच्या मालिकांच्या मनांत दादासाहेब पेशवे यांचे संबंधानें मजविषयीं संतोष नाहीं असें दिसतें, कारण, माझी हुरमत खालीं करण्याची तजवीज त्यानीं सुरू केली आहे. अशा विकट प्रसंगीं अब्रूरक्षणाकरितां तरवार करून कत्तल होऊन जाणें हेंच बेहत्तर आहे. हा प्रसंग कदाचित आतां टळला तरी मालिकांचे मनांत मजविषयींचा किंतु दृढ झाल्यामुळें कधीं तरी

असा प्रसंग येणारच आहे. याजकरितां हा शेवटचा प्रसंग समजून कोणीही घोड्यावर न बसतां सर्वांनीं उभे राहून समय येईल तेव्हां शिपाईगिरींत कत्तल होण्यास तयार राहावें व मीही तसें करण्याचा निश्चय केला आहे." असें बोलून त्यांनीं तत्काळ घोड्यावरून उडी टाकिली आणि हातांत तरवार घेऊन ते पुढील प्रसंगाची वाट पाहात उभे राहिले. तें पाहून त्यांचे सर्व सरदार व मानकरी यांनींही तसेंच केलें. याप्रमाणें सर्व गोट आवळून उभे राहिले, म्हणजे पांच हजार लोक एक दिलाचे कट्टे लढणारे नग्न तरवारी चमकावीत येणाऱ्या प्रसंगाची मार्गप्रतिक्षा करीत राहिले. ही गोष्ट मल्हारराव होळकर यांस समजतांच त्यानीं लगबगीनें जाऊन माधवराव पेशवे यांस विनंती केली कीं, "हाल्लीं करनाटकांत स्वारी जावयाची आहे आणि त्यासाठीं फौजेची तयारी चालू असून आपण मध्येंच हें काय आरंभिलें आहे? विठ्ठल शिवदेव हे पुरातन नौकर मोठे मर्द माणूस, यांजविषयीं ही अशी विपरीत बुद्धि आपण कां धरिली ? त्यांचे पांच हजार लोक नाहींसे होण्यास आपल्या फौजेंतील दाहाहजार लोक बळी पडले पाहिजेत असें आपण पक्कें समजावें. पंधरा हजार लोकांची आहुती होईल तेव्हांच विठ्ठल शिवदेव स्वाधीन झाले तर होतील. त्यांतून अशा जवांमर्द पुरुषाचा आपणास कंटाळाच आला असेल तर त्यांस एखाद्या मोहिमेवर पाठवावें. ही उद्यां कर्नाटकची स्वारी होणार आहे. तींत त्यांस एखादे जोखिमेचें काम सांगावें, म्हणजे झालें." होळकरानीं सांगितलेली गोष्ट माधवरावांच्या मनांत तत्काळ बिंबली. मग माधवरावसाहेब होळकर यांस म्हणाले कीं, "तुम्हीं म्हणतां हें ग्रहण करण्यास योग्य आहे; परंतु विठ्ठल शिवदेव हे अगदीं बिचलून गेले आहेत. त्यांची समजूत आतां कशी होईल ?" त्याजवर होळकर म्हणाले कीं, "त्याबद्दल आपण बिलकूल फिकीर करूं नये. मी स्वतः त्यांजकडे जातों आणि त्यांची समजूत करून त्यांस हुजूर घेऊन

येतों." नंतर होळकरांनीं विठ्ठलराव यांजकडे जाऊन प्रथम त्यांजकडून आपले तरवारीस म्यान करविलें आणि "हा अविचार काय ?" असें बोलून त्यांचा हात धरिला आणि "श्रीमंताकडे चला जाऊं" असें बोलून त्यांस हुजूर नेलें. तेथें विठ्ठलराव यांनीं हात जोडून श्रीमंतांस विनंती केली. ते म्हणाले "राव साहेब ! मी शाहूमाहाराजापासून नानासाहेब पेशवे यांचे आखेरीपर्यंत जी नौकरी केली तींत हुरमतीशिवाय दुसरें कांहींच मिळविलें नाहीं. असें असून आतां स्वामींचे मनांत मजाविषयीं असंतोष उत्पन्न झाला असेल तर मला संतोषानें निरोप द्यावा. मी जाण्यास सिद्ध आहे. परंतु ज्या अर्थी मला आतां सरकारचरणांशिवाय दुसऱ्याची ताबेदारी कर्तव्य नाहीं त्या अर्थी मी कोठें जरी गेलों तरी आपले आयुष्याचे बाकीचे दिवस परलोकसाधनांत घालविण्या खेरीज मी दुसरें कांहींच करणार नाहीं, अशी आपण खात्री बाळगावी." ह्या विनंतीचा परिणाम असा झाला कीं, विठ्ठलराव यांचे स्वामीनिष्ठेविषयीं माधवराव पेशवे यांची पूर्ण खात्री झाली आणि पूर्वीं योजिलेल्या तजविजीबद्दल त्यांस पश्चात्ताप होऊन त्यांनीं विठ्ठलराव यांस जवळ बोलाविलें आणि त्यांची चांगली खातरजमा करून त्यांस होळकराबरोबर त्यांचे गोटास परत पाठऊन दिलें. गोटांत गेल्यावर पांचहजार लोकांनीं आपापल्या कंबरा सोडून ढालतरवारी खालीं ठेविल्या.

कर्नाटकप्रांतीं हैदरअल्ली फार उपद्रव करितो ही गोष्ट श्रीमंतांस पूर्वींच समजली होती, म्हणूनच खासास्वारी लढाईस जाण्यास तयार झाली. माधवराव पेशवे खुद्द, सखारामबापू कारभारी, विठ्ठल शिवदेव सेनापती, मल्हारराव होळकर व पटवर्धन आदिकरून सरदार कर्नाटकचे स्वारीस निघाले. कर्नाटकांत शिरल्याबरोबर पेशव्यांनीं प्रथम धारवाडचा किल्ला स्वाधीन करून घेतला. पेशव्यांचें लष्कर कर्नाटकांत आल्याची खबर ऐकतांच हैदरअल्लीनें आपल्या

फौजेची तयारी करून पेशव्याशीं लढाई करण्यास्तव अनवती गांवानजीक अगम्य जंगलांत छावणी केली. ही त्याची फौज बरीच मोठी होती; तींत वीस हजार कवें स्वार व चाळीस हजार पायदळ होते. त्यापैकीं कवाईत शिकलेले असे पलटणी वीस हजार शिपाई होते. शिवाय त्या छावणीचें स्थळ जंगलांत अडचणीचे ठिकाणीं असल्यामुळें बहुत करून अजिंक्य होतें. हीं सर्व खबर हेरांनीं माधवरावसाहेब यांस कळविल्यावर त्यांनीं सखारामबापू यांस एकांतांत विचारिलें कीं, " आतां पुढें काय विचार करावा ? सखारामबापुनीं असें उत्तर दिलें कीं, " हाल्लीं आपल्याजवळ थोडी फौज असून ती कवाइती फौजेचा सामना करण्याजोगी नाहीं. याकरितां आपण पुण्यास परत जाऊन कवाइती फौज वाढवावी आणि लढाईचे पोक्त सरंजामानिशीं परत येऊन नंतर हैदरअल्लीवर स्वारी करावी असें मला वाटतें. " ही सल्ला माधवराव पेशवे यांस नीट वाटली नाहीं, कारण हैदर चालून आला असतां माघारें जाणें हें त्यांच्या मतें अत्यंत लज्जास्पद होतें. नंतर विठ्ठल शिवदेव जे पुरातन व मोठे मर्द माणूस आणि पुष्कळ प्रसंग पाहिलेले असें त्यांनां वाटत होते त्यांस त्यांनीं त्या मसलतींत घेऊन तोच प्रश्न त्यांस केला. तेव्हां विठ्ठलराव यांनीं सांगितलें कीं, " शत्रू समीप आला असून मागें फिरणें हें शूर पुरुषास योग्य नव्हे; याकरितां आपण पुढें चाल करून मोठ्या हिम्मतीनें व हिकमतीनें निकराची लढाई करावी असें मला वाटतें. " ही सल्ला पोक्त व सयुक्तिक होती सबब माधवराव पेशवे यांस पसंद पडली.

दुसरे दिवशीं पेशवे संपूर्ण फौजेनिशीं कूच करून हैदरअल्लीचे छावणीजवळ जाऊन पोहोंचले. तेव्हां लढाई सुरू झाली. तींत पेशव्यास आपल्या काबूंत आणण्यास्तव हैदरानें बऱ्याच हिकमती चालवून पाहिल्या; परंतु तरुण पेशवा मोठ्या दक्षतेनें युद्ध चालवीत असल्यामुळें हैदराच्या त्या सर्व हिकमती व्यर्थ होऊन

शेवटीं त्यास आपली सुटका करण्यास्तव बेफायद्याचे ठिकाणीं लढाई करण्यास उभें राहाणें प्राप्त झालें. तत्रापि त्याच्या कवाईती तोफखान्याचे मारामुळें पेशव्याकडील बरेच स्वार पडले. तें पाहून विठ्ठल शिवदेव यांस अत्यंत त्वेष चढला. मग त्यानीं आपले दिवाण व सेनापती व फौजेंतील मोठमोठाले पराक्रम केलेले मानकरी व शिलेदार पाग्ये यांस बोलावून असें बोलून दाखविलें कीं, " आजपर्यंत मी बाजीरावसाहेब व चिमाजी आपा या प्रथम कारकीर्दीत आणि त्यांच्या मागून नानासाहेब, भाऊसाहेब, आणि दादासाहेब या दुसऱ्या कारकीर्दीत, आपले जिवाकडे न पाहतां मोठमोठाल्या दुर्घट प्रसंगीं स्वामी सेवेंत अंतर केलें नाहीं, यामुळें मजवर त्या पुरुषांचा अत्यंत लोभ राहिला. हाल्लीं माधवराव साहेब हे धनी असून त्यांची मजवर मोठी इतराजी झाली आहे, या करितां या समयीं जिवाची आशा न धरितां मोठा पराक्रम करून जय मिळवावा, नाहीं तर लढाईंत मरून जावें हेंच उचीत आहे. हें समजून माझे खरे सोबती असतील त्यांनीं निष्कपट मनानें मला साथ द्यावी. " हे आपल्या मालिकांचे निर्वाणीचे शद्ब ऐकून सर्व जमलेल्या योध्यांनीं एक विचारें जबाब दिला कीं, " तात्यासाहेब ! आम्हां विषयीं आपण मनांत बिलकूल संशय आणूं नये. आह्मीं ज्या पेक्षां सर्व प्रसंगां करितां मुळींच आपले साथी झालों आहों त्यापेक्षां आम्हीं सर्व कत्तल झाल्याशिवाय आपल्या बालाग्रास धक्का लागूं देणार नाहीं ही आपण खातरी बाळगावी. " असें बोलून सर्वांनीं " जय नरहरी " असा जैजैकाराचा शद्ब मोठ्यांनीं केला.

नंतर विठ्ठल शिवदेव यांनीं हैदरअल्लीचे तोफखान्यावर झपाट्यानें चाल केली. तेव्हां शत्रूच्या कवाइती तोफांच्या माऱ्यामुळें वाटेंत त्यांतून पुष्कळ वीर व मानकरी पडले. तत्रापि त्या गोष्टीची परवा न बाळगितां, विठ्ठल शिवदेव यानीं त्या तोफखान्यावर एकदम हल्ला केला; आणि त्यांस पेशव्यांकडून मागून

उत्तम प्रकारची मदत झाल्यामुळें त्यांनीं गोलंदाज यांस कत्तल करून सर्व तोफा ताब्यांत घेतल्या. हैदरअल्लीचा तोफखाना विंचूरकर यांचे हातीं लागतांच पेशव्यांचे स्वारांपुढें त्याचा टिकाव न लागून त्याचा लवकरच मोड झाला. विठ्ठल शिवदेव यांचें हें अनिवार्य धारिष्ट पाहून माधवराव साहेब अत्यंत चकीत झाले आणि त्यांजविषयीं मल्हारराव होळकरांनीं जें कांहीं त्यांस सांगितलें होतें त्याबद्दल त्यांची पूर्ण खातरी झाली. रात्रीं सर्व तळांवर फौजा जमल्या नंतर माधवराव पेशवे यांनीं स्वतः विठ्ठल शिवदेव यांच्या गोटांत जाऊन ''आज माझा जय मुख्यत्वें करून तुमच्याच पराक्रमामुळें झाला आहे व त्याबद्दल मी तुमचा मोठा आभारी झालों आहें''असें त्यांस कळवून, समागमें आलेले सरदार व मुत्सद्दी यां मध्यें त्यांची मोठी प्रशंसा केली. याजवर विठ्ठल शिवदेव यांनीं जबाब दिला कीं ''ह्या गोष्टी स्वामींच्या पुण्यप्रतापामुळेंच होत आहेत. आजच्या प्रसंगांत मी स्वामांचरणा संनीध धारातीर्थीं कत्तल झालों असतों तर या देहाचें सार्थक झालें असतें; कारण, तेणेंकरून आपल्या मनांत मजविषयीं आलेला किंतु सर्व दूर झाला असता.'' त्याजवर रावसाहेब पेशवे यांनीं विठ्ठलराव यांची पुष्कळ तऱ्हेनें खातरजमा केली आणि ज्या तोफा त्यांनीं (विठ्ठलराव यांनीं) त्या लढाईंत जिंकून घेतल्या होत्या त्या तोफां पैकीं दोन मोठ्या तोफा त्यांस बक्षीस दिल्या. त्या तोफा विठ्ठल शिवदेव यांनीं आणून आपल्या अणकईच्या किल्ल्यावर ठेविल्या. या प्रमाणें जो हैदरअल्ली मोठ्या घेर्मीनें पेशव्याबरोबर लढाईस आला होता त्याचा या मोहिमेंत अगदीं नक्षा उतरून तह करण्याविषयीं त्याजला माधवराव यांस विनंति करणें भाग पडलें. नंतर माधवराव यांनीं राघोबादादा यांस बोलावून तह करण्याचा सर्व अधिकार त्यांजकडे सोंपून दिला; कारण,त्या मोहिमेवर स्वतः जाण्याचा दादासाहेब यांचा मानस असतानां माधवरावसाहेब त्यांच्या इच्छेविरुद्ध गेले होते, यामुळें दादासाहेब नाखुष होऊन, तबियत नीट नाहीं अशा बाहाण्यानें

पुण्याहून निघून नाशिकाजवळ आनंदवल्ली येथें जाऊन राहिले होते. तथापि माधवरावानीं थोर मनानें त्या लढाईचा शेवट लावण्यास्तव त्यांस पाचारण केल्यामुळें त्यांची मर्जी प्रसन्न होऊन ते माधवराव यांचे लष्करांत सत्वर जाऊन पोहोचले. नंतर हैदर अल्लीच्या वकिलांनीं त्यांजपाशीं तहाचें बोलणें सुरू करून स्वारी खर्चाबद्दल म्हणून बत्तीस लाख रुपये पेशव्यांस देण्याचें कबूल केलें. परंतु राघोबादादांनीं त्याजकडून आणखी दोन कलमें कबूल करविलीं. तीं अशीं कीं हैदरअल्लीनें मुराराव घोरपड्याचा घेतलेला मुलुक परत द्यावा, आणि सावनूरच्या नबाबापासून खंडणी वगैरे कांहीं न घेतां त्यास स्वतंत्र राहूं द्यावें. ह्या शर्ती हैदरअल्लीनें कबूल केल्यावरून तह झाला. एवढा मोठा जय झाला असून राघोबादादांनीं त्या हलक्या शर्तींनीं तह केला तो माधवरावसाहेब यास आवडला नाहीं. परंतु त्यांनीं तो करण्याचा आधिकार राघोबादादाकडे सोंपिला होता सबब त्यांस त्या कामीं उदासीन राहणें प्राप्त झालें. ही गोष्ट सन १७६४ चे आखेरीस झाली. या जयामुळें माधवरावसाहेब यांची मोठी कीर्ति होऊन हैदराबादचे निजाम व कर्नाटकांतील सर्व राजे त्यांची जरब बाळगूं लागले.

---

## प्रकरण ७ वें.

### विठ्ठल शिवदेव यांचे चरित्राचा शेवट.

माधवराव पेशवे व राघोबादादा कर्नाटकची स्वारी करून पुण्यास परत आल्यावर एके दिवशीं माधवराव साहेब राघोबादादा यांस म्हणाले कीं "काका! येथें फौजा जमल्या आहेत. त्या रिकाम्या ठेवणें प्रशस्त नाहीं; त्यांस कांहीं तरी कामगिरीवर

पाठविलें पाहिजे. याकरितां मला असें वाटतें कीं पूर्वीं पानिपतचे लढाई नंतर उत्तर हिंदुस्थानांतील आपल्या मुलुकाचा बंदोबस्त करण्यास्तव विठ्ठल शिवदेव हे माहादजी सिंदे यांस बरोबर घेऊन ग्वालेरीस गेले होते; परंतु कांहीं कारणास्तव ते दक्षिणेस सत्वर परत आल्यामुळें, तिकडील पुष्कळ बंदोबस्त होणें तसाच राहिला आहे. याकरितां आपण ह्या सर्व फौजेनिशीं ग्वाल्हेरीस जाऊन राहिलेला सर्व बंदोबस्त करावा. मींच स्वतः तुम्हांबरोबर यावें, परंतु एक तर येथें कोणी खाशापैकीं राहिलें पाहिजे. दुसरें, तुम्हीं पुरातन माहितगार असल्याकारणानें तिकडील बंदोबस्त जसा तुमच्या हातानें होईल तसा माझ्या हातानें होणार नाहीं. याकरितां तुम्हींच तिकडे जावें. मल्हारजी होळकर माळव्यांत असून तेही तिकडील पुरे माहितगार आहेत व विठ्ठल शिवदेव हे तुम्हांबरोबर येतीलच." हें माधवराव साहेबांचें बोलणें दादासाहेबांनीं मान्य करून उत्तर हिंदुस्थानांत जाण्याची तयारी चालविली. इतक्यांत एक क्षुल्लक कारणावरून जानोजी भोंसले यांशीं बेबनाव होऊन नागपुरावर चढाई करणें प्राप्त झालें. तेव्हां दादासाहेबांनीं माधवराव पेशवे यांस सांगितलें कीं "उद्भवलेल्या मोहिमेवर तुम्ही जावें. तिचा निकाल झाला म्हणजे मी तीच फौज घेऊन पुढें जाइन." ही गोष्ट माधवराव यांस पसंद झाली आणि ते विठ्ठल शिवदेव वगैरे कितीएक सरदारांस बरोबर घेऊन नागपुरावर गेले. परंतु जानोजी भोंसल्यानें पेशव्याशीं सामना न करितां कितीएक वेळां लढाईचे प्रसंग टाळिले आणि लढाईनें आपलाच नाश होईल असें शेवटीं त्यास वाटल्यावरून त्यानें पेशव्याबरोबर तह केला. या तहानें पेशव्याचा फारसा फायदा झाला नाहीं.

या तहाचें वर्तमान दादासाहेब यांस समजतांच, ते पुण्याहून सड्या स्वारीनिशीं निघून माधवराव वऱ्हाडांतून परत येत असतां मार्गांत त्यांस भेटले. नंतर दादासाहेब हे विठ्ठल शिवदेव वगैरे

सरदार यांस बरोबर घेऊन उत्तर हिंदुस्थानाकडे गेले. आणि माधवराव पेशवे सड्या स्वारीनिशीं पुण्यास परत आले.

दादासाहेब यांची स्वारी माळव्यांत गेल्यावर माहादजी शिंदे व मल्हारराव होळकर आपापल्या फौजांनिशीं त्यांच्या लष्करांत येऊन मिळाले. नंतर दादासाहेब यांची स्वारी पुढें ग्वाल्हेरीकडे चालती झाली.

मार्गांत कांहीं एका कारणावरून त्यांची महादजी शिंदे यांवर अत्यंत इतराजी होऊन शिंदे यांस शासन होण्याचा रंग दिसूं लागला. या गोष्टीची खबर स्वारींतील अखबारनवीस यांनीं पुण्यास माधवराव पेशवे यांस तावडतोब कळविली. रावसाहेब हे सूज्ञ व दूरदृष्टि असल्यामुळें त्यांस वाटलें कीं "आजपर्यंत आपले कार्याकारितां शिंदे यांचे कुळाचे सर्व पुरुष रणांत बळी पडले. फक्त माहादजी एवढाच आतां उरला आहे. तोहि होतकरू असून स्वामिभक्त आहे. यास्तव माहादजी शिंदे याचा बचाव होईल अशी तजवीज हरतऱ्हेनें करावी." म्हणून त्यांनीं मल्हारराव होळकर व विठ्ठल शिवदेव यांस स्वदस्तुरची चिट्ठी पाठविली. शिंदे यांचे सुदैवानें ती चिट्ठी उभयतांस वेळेवर जाऊन पोहोंचली. नंतर उभयतांनीं दादासाहेब यांची बहुत प्रकारें समजूत घालून माहादजी शिंदे यांचा बचाव केला.

दादासाहेब यांची स्वारी ग्वाल्हेरीस पोहोंचली तों त्यांस असें कळून आलें कीं, गोहदचे जाट राण्यानें पेशवे सरकारचा पुष्कळ मुलुक दाबिला आहे, व युक्तियुक्तीनें पेशवे सरकारचा अंमल त्या प्रांतांतून अजीबाद उठवून देण्याचा विचार केला आहे. ह्या दगाबाजी बद्दल त्या राण्याचें योग्य पारिपत्य करावें ह्मणून रघुनाथ राव यांनीं गोहद किल्ल्यास तत्काळ वेढा घातला. तेव्हां लढाई सुरू झाली. तींत पेशव्यांकडील पुष्कळ लोक पडले. परंतु किल्ला सर झाला नाहीं. इतक्यांत त्यासंबंधीं विठ्ठल शिवदेव यांस माधवराव पेशवे यांजकडून पत्रें आलीं तीं अशीं:—

॥ श्री ॥

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री विठ्ठल शिवदेव उमदे तुल्मुल्क बहादूर स्वामी गोसांवी यांशीं:—

पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान. नमस्कार विनंती उपरि येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणें. विशेष. सांप्रत तुम्हांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरी ऐसें नसावें. गोहदेवर हल्ला केला परंतु हल्ला मुरडला गेला. फार जाया जखमी जाहले म्हणून परभारें वर्तमानें येतात, परंतु तुम्हीं कांहींच लिहिलें नाहीं, अपूर्व आहे. अतःपर याचे, व तिकडील मनसुबीयाचे व राजकारणें कोण कोठील आलीं याचे, पुढें मनसुबा करणें कोणता तो सविस्तर लिहिणें जाणिजे. चंद्र १५ रज्जब सूरसन सबासितैन मयाव अलफ. बहुत काय लिहिणें. तुम्हीं दोन चार पत्रें पाठविलीं तीं पावलीं. अलीकडे पत्र येत नाहीं, तरी सविस्तर वृत्त लिहिणें हे विनंती. पैवस्ती चंद्र २ रमजान. नजीक राईरातगड प्रांत नरवर.

---

( २ )

॥ श्री ॥

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री विठ्ठलराव शिवदेव उमदेतुलमुल्क बहादूर स्वामी गोसावी यांशीं:—

पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान. नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहित जाणें. विशेष. सांप्रत तुम्हांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. गोहदेस मोर्चे दिले होते तेथील गढाचा विचार कसा ठरला तें व हिंदुस्थानचें वर्तमान सविस्तर

लिहून पाठविणें. जाणिजे. चंद्र १४ सफर सुरसन सबासीतैन मयावअल्लफ. बापूजी रवानगी सत्वर करितां म्हणोन पूर्वी लिहिलें होतें, त्यास अद्याप बापू आले नाहींत, तरी सत्वर त्यांस हुजूर पाठविणें. वरकड त्या प्रांतींचे मनसब याचा प्रकार कसकसा आहे तो लिहिणें. हे विनंती. पैवस्ती चंद्र २५ रज्जब सन सबासीतैन. मुक्काम शिखरोंदा प्रांत शिकरवरी.

---

( ३ )

॥ श्री ॥

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री विठ्ठलराव शिवदेव स्वामी गोसावी यांसीः—

पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान. नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहित जाणें. विशेष. सांप्रत तुम्हांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं, तरी ऐसें नसावें. सर्वदां आपणाकडील व तिकडील मनसुबीयाचे कर्तव्यतेचें बारीक मोठें वर्तमान लिहीत जावें. प्रस्तुत मुक्काम कोठें आहे; गोहदेचा तह जाहलाच असेल; पातशाहा कोठें आहेत; सुजा उदवला व गाजुदीखान कोणते मनसुबीयांत आहेत; फिरंगी कोठें आहेत, जाट व रोहिले कोणे उपद्व्यापांत पुढें विचार काय करितात. तें बारीक मोठें वर्तमान लिहीत जाणें. जाणिजे. चंद्र २२ रब्बिलाखर सुरसन् सितैन मया व अलफ बहुत काय लिहिणें हे विनंती.

या संधीस मल्हारराव होळकर यांची प्रकृति बिघडली होती म्हणून ते हवा बदलण्यास्तव ग्वाल्हेरीनजीक आलमपूर माहालीं आपल्या अमलांत थोडे दिवसांची रजा घेऊन गेले; पण भांडेरी मुक्कामीं त्यांची प्रकृति अत्यंत बिघडून ते आलमपुरास पो-

होंचल्यावर लवकरच त्यांस देवाज्ञा झाली. ही गोष्ट सन १७६६ इसवी सालीं झाली. त्यासंबंधीं विठ्ठलराव यांस माधवराव पेशवे यांजकडून पत्र आलें तें असें:—

॥ श्री ॥

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री विठ्ठलराव शिवदेव उमदेतुलमुल्क बहादूर स्वामिगोसावी यांशीं:—

पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान. नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणें. विशेष. मल्हारजी होळकर यांस वैशाख शुद्ध ११ रोजीं देवाज्ञा झाली. याचें वर्तमान येथें आलें. श्रवण होऊन चित्तास परम खेद झाला. मातबर सरदार मोठे दाबाचे होते. ईश्वरइच्छेस उपाय नाहीं. त्यांचा भावी पदार्थ तसा होताच, परंतु तीर्थरूपांचें जाणें हिंदुस्थानास होऊन परस्पर भेटी होऊन, मल्हारबाचा काळ झाला. त्याचा सुकृतांशच. असो; तुम्ही हिंदुस्थानाचे अमीरांचे व सार्वभौमाचें मनसुबीयास माहीत. तिकडील मनसुबे तुमचे होते झाले व पुढेंही उमदे उमदे मनसुबे करून हिंदुस्थानाचा बंदोबस्त करावा ही तुमची उमेद आहेच, तदनुरूप तीर्थस्वरूपास विनंती करणें. जें उचित करणें तें करालच व ज्यांत लौकिकास्पद तेंच तीर्थरूपाचे आज्ञेप्रमाणें करून दाखवाल. विशेष काय लिहिणें. तुम्हाकडील पत्रें येत नाहीं हें काय? हिंदुस्थानचें वर्तमान वरचेवर लिहीत जाणें. रवाना चंद्र ९ मोहोरम्. बहुतकाय लिहिणें हे विनंति. पैवस्ती चंद्र १० सफर संनसबांसितैन.

---

मल्हारराव होळकर यांचे मरणानें दादासाहेब यांस व त्यांचे मित्र विठ्ठल शिवदेव यांस अत्यंत दुःख झालें; आणि त्यांची उमेद खचून जाऊन झपाट्यानें लढाई चालविणें त्यांजकडून झालें

नाहा. गोहदचा राणा याजकडून तहाचें बोलणें बोलण्यास वकील येतांच त्याजपासून त्यानीं तीन लाख रुपये खंडणी घेऊन लागलाच वेढा उठविला. नंतर त्यांनीं विठ्ठल शिवदेव यांजबरोबर मल्हारराव होळकराचा नातू मालोजी होळकर यास सरदारीचीं वस्त्रें पाठवून दिलीं. त्यावेळेस ग्वाल्हेरीचे किल्ल्यांत विठ्ठल शिवदेव यांचें शिबंदीचें ठाणें होतें. त्यांस पुष्कळ दिवस फौजेचें देणें देण्यास पैसा मिळाला नव्हता. सदर्हू मागील बाकी मिळण्यास्तव त्या लोकांनीं विठ्ठलराव यांस मोठा तगादा केला. हें वर्तमान दादासाहेब यांस समजल्यावर त्या लोकांचें देणें आदा व्हावें आणि विठ्ठल शिवदेव हे देण्यांतून मुक्त व्हावे ह्मणून त्यानीं त्यांस उचाडभरोली माहाल हा नवीन सरंजामास लावून दिला. आणि त्यांस त्या माहालाची सनद करून देऊन सर्व बखेडा मोडून टाकिला.

नंतर विठ्ठल शिवदेव यांस ग्वाल्हेरीस बंदोबस्त करण्यास ठेवून दादासाहेब यांची स्वारी दक्षिणेस परत आली. ह्या वेळेस माधवरावसाहेब पेशवे कर्नाटकांतील स्वारी यशानें शेवटास नेऊन पुण्यास परत आले होते. त्यांनीं दादासाहेब यांस पत्र लिहिलें कीं, “ गोदातीरीं कायगांव टोकें येथें आपण यावें, मीही तेथेंच आपल्या भेटीस येतों ” या लिहिण्यावरून आपणास कांहीं तरी दगा होणार आहे असा संशय दादासाहेब यांस येऊन ते टोक्यास न जातां परभारें चांदवड परगण्यांत कुरडगांव येथें येऊन त्यानीं गोदातीरीं मुक्काम केला. ( कुरडगांव विंचुरापासून साहा कोसांचे अंतरावर आहे. ) हें वर्तमान रावसाहेब पेशवे यांस समजलें, तेव्हां त्यांनीं सखारामबापू यांचे मार्फत दादासाहेब यांचें मनांतील संशय दूर करून कुरडगांव येथें त्यांची भेट घेतली. नंतर उभयतां पेशवे तेथेंच कांहीं दिवस राहिले. त्या वेळेस सखारामबापू वगैरे मुत्सद्दी मंडळीही तेथेंच होती.

विठ्ठल शिवदेव यानीं उत्तरहिंदुस्थानांत दादासाहेब यांचे आज्ञेप्रमाणें सर्व बंदोबस्त केल्यावर ते तेथून तावडतोब निघून श्रावण

शुद्ध १३ शके १६८९ रोजीं विंचुरास येऊन दाखल झाले. त्यांची प्रकृति मार्गांतच फार बिघडली होती; परंतु कसें तरी घर जवळ करावें ह्मणून ते मजल दरमजल विंचुरास येऊन पोहोंचले. तेथेंही त्यांस आपल्या प्रकृतीचा भरंवसा वाटेना. सबब त्यांनीं आपले वडील चिरंजीव शिवाजी विठ्ठल यांस जवळ बोलावून पुढें कसें वर्तावें याविषयीं त्यांस उत्तम प्रकारें उपदेश केला. तो असाः—"सदोदित मालिकाचे सेवेंत तत्पर राहून कोणतेही प्रकारें नमकहरामीचें कृत्य करूं नये; आणि लढाईचे प्रसंगीं आपले मालिकाचे कार्यार्थ आपला जीव खर्चीं घालण्यापर्यंत मागें पुढें पाहूं नये." हा उपदेश सांगणें झाल्यानंतर त्यांनीं आपली सर्व दौलत त्याचे स्वाधीन करून वर लिहिल्या प्रकारें तिची सरदारी संभाळावी असें त्यांस सांगितलें. नंतर त्यानीं आपल्या पदरचे सर्व मंडळीस बोलावुन आणून चिरंजीव शिवाजी विठ्ठल यांचे हात त्यांचे हातांत घालून त्यांस सांगितलें कीं, "आमचे पश्चात हेच मुख्य सरदारीचे मालिक आहेत; ह्यांचे आज्ञेंत तुह्मीं सर्वांनीं आणि आमचे कनिष्ट पुत्रांनीं वागावें."

"चिमणाजी खंडेराव दिवाण यानीं पेशव्यांकडील वकिलीचें काम संभाळून स्वारींत सर्व प्रकारची देखरेख करीत जावी."

"विठ्ठल त्रिंबक व नारो त्रिंबक सालकाढे यांनीं विंचूर मुक्कामीं राहून माहालचे बंदोबस्ताचें काम पाहात जावें."

"आबूराव विठ्ठल व बाबूराव विठ्ठल कोटमगांवकर यांनीं फौजेचा बंदोबस्त पूर्ववत् ठेवून कोणतेही समयीं अपयश न येईल असें वर्तावें."

"खंडूजी केंजळे यांनीं प्रपंचसंबधा व्यवस्था पाहावी आणि खरेदी घेतलेल्या वतनांच्या संबंधानें व्यवस्था ठेवून नवीन वतनें संपादन करावीं."

" सर्व मंडळींनीं शिवाजी विठ्ठल यांचे हुकमतींत राहून लक्ष्य-पूर्वक एकनिष्टेनें सरकारचाकरी करावी. "

याप्रमाणें सर्वांस सांगून आपला कुलस्वामी नरहरि याजपुढें पडून नामस्मरण करीत असतां त्यांस श्रावण वद्य प्रतिपदेस देवाज्ञा झाली. ही गोष्ट शके १६८९ म्हणजे सन १७६७ इसवी सालीं घडली.

विठ्ठल शिवदेव यांस पांच पुत्र होते. पैकीं, वडील कुटुंब वाईजवळील केंजळगांव येथील कुळकर्ण्याची कन्या रखमाबाई यांचे चार पुत्र; त्यांचीं नांवें:—शिवाजी विठ्ठल पहिले, नरसिंगराव विठ्ठल दुसरे, मल्हारराव विठ्ठल तिसरे, बाजीराव विठ्ठल चवथे. रखमाबाई निवर्तल्यावर काल्पी येथें जें दुसरें लग्न त्यांनीं केलें, त्या कुटुंबाचें नांव यमुनाबाई असें होतें. यांचे पुत्र खंडेराव विठ्ठल; एकूण पांच पुत्र.

वडील पुत्र शिवाजीपंत बापू हे विठ्ठलराव असतां त्यांच्या बहुतेक स्वाऱ्यांत त्यांजबरोबर असत; व त्यांचें जाणें येणें पेशवे यांजकडे स्वतंत्रपणेंही होतें. विठ्ठलराव जिवंत असतांच शिवाजीपंत बापू यांनीं निजामापासून अणकई, राजदेर व इतर किल्ले लढाई करून घेतले. या कारणानें पेशव्यांची मर्जी त्यांजवर खुष होऊन त्यांनीं त्यांस पालखीची नेमणूक व खेरीज जातीं करितां निराळी नेमणूक करून दिली होती. विठ्ठलराव स्वारीस जाऊन हे घरीं राहिले तर माहालासंबंधीं वगैरे कामें कारभारी हे त्यांस कळवून त्यांचे विचारें चालवीत असत. शिवाजीपंत बापू हे मातुश्रीचे उदरांत उत्पन्न झाल्यापासून विठ्ठल शिवदेव यांचा विशेष उत्कर्ष होत गेला, म्हणून त्यांची त्यांजवर फार प्रीति असे, व ते भाग्यवान् असें विठ्ठलराव समजत असत. शिवाजीपंत बापू हे स्वभावानें जरी धिमे व शांत होते, तरी युद्धकर्मांत मोठे शूर होते.

दुसरे पुत्र नरसिंगराव हेही शूर होते; परंतु स्वभावानें अ-

ति क्रूर व उतावळे असल्याकारणानें त्यांजवर विठ्ठलराव यांची प्रीति कमी होती. विठ्ठल शिवदेव हे स्वर्गवासी झाल्यावर पांच बंधूंमध्यें परस्पर वैमनस्य आल्याकारणानें पेशव्यांचे कारभारी सखाराम बापू यांनीं श्रीमंतांच्या आज्ञेवरून सर्व सरदारीचा अधिकार वडील बंधु शिवाजीपंत बापू यांस देऊन कनिष्ठ चार बंधूंस नेमणुकी ठरवून दिल्या. तथापिही नरसिंगराव विठ्ठल हे स्वभावानें क्रूर असल्यामुळें हरयत्न मोडे तंटे करूं लागले. सबब शिवाजीपंत बापू यानीं पेशव्यांचे आज्ञेवरून त्यांस कैद करून माळवाप्रांतीं आपले माहालांपैकीं आष्टे माहालांत त्यांस कुटुंबासुद्धां प्रतिबंधांत ठेविलें. पुढें कांहीं दिवसांनीं त्यांचा तेथेंच देहांत झाला आणि त्यांचें कुटुंब त्यांजबरोबर सती गेलें.

तिसरे पुत्र मल्हारराव हे सुज्ञ व बहुतेक दरबारी कामांत हुषार असून बहुत सुरूप होते. दादासाहेब पेशवे पूर्वीं ज्या वेळेस विंचुरास आले, त्या वेळेस त्यांनीं त्यांस सामोरे जाऊन खासगी वाड्यांत उतरून घेतले आणि मुत्सद्दी मंडळीसुद्धां सर्वांचा चांगला सत्कार करून त्या गोष्टीची खबर आपले वडील यांस वाफगांवास पोहोंचविली होती. नारोशंकर राजे बहादर यांस औरस पुत्र नसल्यामुळें त्यानीं मल्हारराव विठ्ठल यांस दत्तक घ्यावें असें मनांत आणून आपली इच्छा विठ्ठल शिवदेव यांस कळविली; परंतु त्यानीं ती गोष्ट कबूल केली नाहीं. मल्हारराव हे विठ्ठल शिवदेव यांचे मागून थोडकेच दिवसांनीं कैलासवासी झाले व त्यांची पत्नी पार्वतीबाई ही सन१८३७इसवीपर्यंत गोदातीरीं सायखेडें येथें राहून मरण पावली. या बाईनें तीर्थयात्रा व दानधर्म बहुत केला.

चवथे पुत्र बाजीराव विठ्ठल यांस दुर्दैवेंकरून अल्पवयांतच ऐषआराम व स्त्रीसंभोग करण्याची इच्छा उत्पन्न झाल्यामुळें नषा करण्याचा छंद लागून तो वाढत वाढत शेवटीं चरष ओढण्यापर्यंत जाऊन पोहोंचला. तेणेंकरून पुढें त्यांचा मगज बिघडून

त्यांस भ्रांति झाली; तशांत त्यांची स्त्री निवर्तली यामुळें तिचे मागून थोडकेच दिवसांनीं ते विंचुर मुक्कामीं परलोकवासी झाले.

पांचवे पुत्र खंडेराव विठ्ठल हे शाहाणे व चतुर होते. ते लिहिण्याचे, जाबजबाबी व हिशेबी कामांत फार प्रवीण असून शिवाय व्युत्पन्नही होते; परंतु शरीरानें अशक्त असल्यामुळें ते शिपाईगिरीचे कामांत लक्ष्य देत नसत. यामुळें त्यांचे हातून सांगण्यासारखें महत्कृत्य मुळींच झालें नाहीं. हे वडील बंधु शिवाजीपंतबापू यांचे आज्ञेंत वागून त्यांचे मर्जीस फार जपत असत, त्या कारणानें त्यांजवर वडील बंधूचा बहुत लोभ असे. कांहीं कालानें शिवाजीपंत बापू यांचा देहांत झाल्यावर पुढें त्यांसच सरदारीचीं वस्त्रें पेशवे यांजकडून मिळालीं; व त्यांचेच वंशज अद्याप विंचूर संस्थानचे मालिक आहेत.

विठ्ठल शिवदेव यांचे पदरीं कोण कोण माणसें होतीं, व दौलतीची व फौजेची व्यवस्था कशी चालत होती याचा खुलासा येथें लिहिणें अवश्य आहे, याकरितां तो पुढें लिहितों:---

१. चिमणाजी खंडेराव हे ऋग्वेदी अश्वलायन शाखेचे ब्राम्हण व खेड तालुक्यांतील भीमातीरचें पिंपळगांव येथील कुळकर्णी होते. हे मोठे शूर असून व्यवहारांत अत्यंत निष्णात होते. यांजकडे पेशव्यांकडील वकीली असून हरएक स्वारीचा सर्व बंदोबस्त ठेवण्याचें काम त्यांजकडेसच होतें. दरएक लढाईचे प्रसंगीं यांजकडून पुष्कळ शूरत्वाचीं कामें झालीं. विठ्ठल शिवदेव यानीं श्रीमंतास विनंति करून पाटोदें माहालीं नांदेसर नांवाचा आठशें रुपये आकाराचा एक गांव त्यांस इनाम देवविला; शिवाय आपले विंचूर व सायखेडें या दोन इनाम गांवांपैकीं प्रत्येकांत शंभर रुपये आकाराची इनाम जमीन व इतर गांवीं सनदी शेतें अशी त्यानीं त्यास स्वतः दिली. ह्या जमिनी व शेतें त्यांजकडे अद्यापपर्यंत चालत आहेत. चिमणाजी खंडेराव यानीं आपलें वतनाचें गांव पिंपळगांव येथें एक मोटा वाडा व भीमेचे कांठीं

घाट व शिवालय असें बांधिलें तें कायम आहे. विंचुरापासून कांहीं कोसांचे अंतरावर त्यानीं पालखेड गांवीं कुळकर्ण खरेदी घेतलेलें असून हाल्लीं त्यांचे वंशज उभय गांवीं म्हणजे पिंपळगांव व पालखेड येथें राहात आहेत व श्रीमंतानीं दिलेल्या इनामी गांवाचा व विठ्ठल शिवदेव यानीं दिलेल्या इनाम जमिनींचा व सनदी शेतांचा उपभोग घेऊन अद्यापि विंचूर संस्थानांत नौकरी करीत आहेत.

२. विठ्ठल त्रिंबक व नारो त्रिंबक सालकाढे हे ऋग्वेदी अश्वलायन शाखेचे ब्राम्हण होते.ते वाईप्रांतीं चंदन वंदन म्हणून गांव आहे तेथील राहाणारे असून त्यांजकडे सर्व दौलतीचा कारभार होता; शिवाय विठ्ठल शिवदेव यांचे कबजांतील किल्यांची देखरेखही त्यांजकडेसच होती. त्यांचे वंशांत पुष्कळ नामांकित राजकार्यधुरंधर पुरुष उत्पन्न झाले. विठ्ठल शिवदेव यांचे कारकीर्दीपासून आजपर्यंत विंचूर संस्थानचा कारभार त्यांचेच वंशजांकडे आहे. याच घराण्यांत बाळोबा बाबा हे उत्पन्न झाले. विंचूरचे दौलतीचा कारभार त्यांजकडेसच होता. शिवाय शेवटचे बाजीराव यांचे कारकीर्दींत पेशव्यांचे राज्यांतील बहुतेक मसलती यांचेच विचारानें चालत होत्या हें सर्व प्रसिद्ध आहेच. नर्मदा नदीचे कांठाजवळ शेवटचे बाजीराव पेशवे हे मालकम साहेब यांचे ताब्यांत गेले त्या वेळेस बाळोबा बाबा हे विंचूरकर यांची पागा घेऊन ब्रम्हवर्तापर्यंत गेले. ती पागा बाजीराव साहेब यांचें अंतकाळपर्यंत बाळोबा बाबा यांचे चिरंजिवाकडे चालत होती. बाजीराव साहेब जिवंत असतां बाळोबा बाबा हे त्यांची आज्ञा घेऊन काशीस गेले. त्यांस इंग्रज सरकाराकडून सालिना ३००० रुपयांचें पेनशन् मिळालें होतें, त्याजवर त्यांनीं कांहीं वर्षें पर्यंत काशी क्षेत्रीं निर्वाह केला; नंतर संन्यास ग्रहण करून ते समाधिस्थ झाले. त्यांचे चुलत बंधु यमाजीपंत अण्णा यांनीं बहुत वर्षेपर्यंत विंचूर संस्थानचे पोतनिशीचें काम केलें आणि शेवटीं दक्षिणेंत इंग्रजी अंमल होण्याचे

सुमारास त्यांनीं काशीवास करून पुष्कळ देवालयें व घांट बांधिले; शिवाय कितीएक धर्मकृत्यें करून मोठी कीर्ति मिळविली. त्यांचे चिरंजीव भाऊ पोतनीस यानीं अलीकडे जनकोजी शिंदे यांचे कारकीर्दीत ग्वाल्हेरचे कारभाऱ्याचे हाताखालीं काम केलें.

३ आबुराव विठ्ठल व बाबुराव विठ्ठल हे वाजस्नीय शाखेचे यजुर्वेदी ब्राम्हण होते. हे विंचुरानजीक टाकळी व कोटम गांव येथील कुळकर्णी असून शिपाईगिरीचे कामांत मोठे कुशल होते. विठ्ठल शिवदेव यांचे कारकीर्दीत लढाईचे प्रसंगीं यांचे घरण्यांतील पांच सहा पुरुष रणांत पडले. विठ्ठल शिवदेव यांचे कारकीर्दीपासून पेशवे व इंग्रज लोक यांचे आखेरचे लढाईपर्यंत विंचूरकर यांचे फौजेचे सेनापति यांचेच वंशज होत गेले. या वंशाचे पुरुषांस विठ्ठल शिवदेव यांचे वंशज यांनीं चिरंजीवाप्रमाणें मानिलें असून पत्रव्यवहारांतही त्यांस चिरंजिव असें लिहिण्याची अजून वहिवाट आहे. हाल्लीं त्या वंशजांस विंचूर संस्थानांतून रुपये १००० आकाराची जमीन पेन्शनादाखल कोटमगांव वगैरे गांवीं चालत असून ते त्या संस्थानांत नोकरी करीत आहेत.

४ खंडूजी कंजळे हा वांईजवळील कंजळ गांवाचा पाटील असून मराठा होता. तो मोठा प्रामाणिक असल्यामुळें त्याजवर विठ्ठल शिवदेव यांची बहुत कृपा होती. त्याजकडे विठ्ठल शिवदेव यांचे प्रपंचसंबंधीं सर्व काम असून खरेदी केलेल्या वतनांची देखरेख व संरक्षण करणें व नवीन वतनें संपादन करणें हेंही काम होतें. त्यांचे वंशजांस विंचूर संस्थानांतून सनदी शेत दिलेलें असून ते हल्लीं त्या संस्थानांत नोकरी करीत आहेत.

५ विठ्ठल शिवदेव यांचे पदरीं एकंदर ७०० मानकरी शिलेदार होते. त्या सर्वांस चवऱ्या व अबदागिरी व मशाली यांच्या नेमणुका असून घोड्यांचे खर्चासुद्धां त्यांचे पगारही मोठे होते. हे सर्व मानकरी लोक मोठ्या प्रसिद्ध मराठे कुळांतील होते, व ढालतलवार व भाला हीं त्यांचीं शस्त्र असत.

६ पागेंतील सर्व स्वारलोक झाले व ढालतरवारी बांधीत असून त्या कामांत ते प्रवीण असत.

७ पागेंतील बारगिरांचे घोडे पांचशें रुपयांपेक्षां कमी किंमतीचे असूं नयेत असा नेम होता. अशा प्रकारच्या बारगिरांच्या पृथक पागा असत. दरएक पागेंत डंका व निशाण असून तिजवर हुकूम चालविण्यास एक मोठा शूर सरदार असे. त्यास पागे असें म्हणत असत.

८ पायदळांत बहुतेक मेवाती जातीचे मुसलमान असत; ते ढालतरवार बांधून शिवाय बर्च्याही बांधीत असत. ह्याशिवाय हिंदुस्थानांतील रजपूत जातीचे पायदळ शिपाई होते. ते ढालतरवारीखेरीज कडाबिनी बांधीत असून तें त्यांचें मुख्य शस्त्र होतें.

९ विठ्ठल शिवदेव हे दररोज आपले मानकरी व बारगीर यांस बरोबर घेऊन मैदानांत जात असत. त्यावेळेस त्यांजकडून घोडे फिरविणें व बंदुकीनें निशाण मारविणें वगैरे शिपाईगिरीचीं कामें स्वतः करवीत असत. शिवाय शत्रूवर हल्ला कसा करावा व शत्रूपासून आपला बचाव कसा करावा वगैरे गोष्टी त्या काळचे रीतीप्रमाणें ते शिकवीत असत. पेशव्यांचे सरदारांतून कित्येकांत दररोज अशी शिक्षा देण्याची जी वहिवाट होती ती मुख्यत्वेंकरून विठ्ठल शिवदेव यांचीच घेतलेली होती.

अशा प्रकारें हमेषा त्यांजजवळ घोडेदळ व पायदळ मिळून पांच हजार फौज होती. याखेरीज इतलाक फौज (म्हणजे कारणपरत्वें भरती केलेली अधिक फौज) दाहा हजारांपासून पंचवीस हजारांपर्यंत वाढविली जात असे.

जामदारखाना, कोठी, पीलखाना, शुतरखाना* व थट्टी वगैरे हरएक कारखान्यावर देखरेख करण्यास ब्राम्हण होते. खेरीज माहालांत व घरीं काम करण्यास पुष्कळ कारकून असत. याशिवाय उपाध्ये, आश्रित, शास्त्री, ज्योतिषी, पुराणीक, वैद्य अशी ब्राम्हणमंडळी पुष्कळ होती. त्यापैकीं कितीएकांचे वंशज हाल्लीं विंचूरसंस्थानांत नौ-

---

* उष्टरखाना

ऱ्या करीत आहेत. विठ्ठल शिवदेव यांजकडे कायम फौजेचा व जातीचे लवाजम्याचा सरंजाम व त्याखेरीज कमाविशीनें चालत असलेला मुलुक, शिवाय वतनें वगैरे मिळून एकंदर सुमारें पन्नास लक्षांचा मुलुक होता. त्याची वहिवाट कच्ची ठेवून कारभारी देखरेख पहात असत.

त्या वेळचे मुत्सद्दी मंडळीपैकीं सखारामबापू व चिंतो विठ्ठल रायरीकर यांशीं विठ्ठल शिवदेव यांचा फार स्नेह होता. त्याचप्रमाणें सरदारमंडळींत मल्हारराव होळकर यांशींही त्यांचा अत्यंत मित्रभाव होता. याचें एक चमत्कारिक उदाहरण असें आहे कीं, कधीं कधीं उभयतां एकच मोहिमेवर आपले मालिक पेशवे यांजबरोबर जात असत. कधीं कधीं उभयतांस पेशवे निराळे मोहिमेवर पाठवीत असत; या कारणानें कधीं विठ्ठल शिवदेव दक्षिणेत असून मल्हारराव होळकर हे हिंदुस्थानांत स्वारीवर असत; व कधीं होळकर दक्षिणेंत असून विठ्ठलराव हे उत्तर हिंदुस्थानांत अगर कर्नाटकांत स्वारीवर असत. होळकर दक्षिणेंत असले ह्मणजे त्यांचा मुक्काम बहुतकरून चांदवडासच फार दिवस होत असे. त्या वेळेस विठ्ठल शिवदेव हे स्वारी करून परप्रांतांतून विंचुरास परत आले ह्मणजे होळकर हे मुद्दाम त्यांचे भेटीकरितां विंचुरास येत. विठ्ठलराव हे विंचुरचे पाटील असून होळकर हे चांदवड माहालचे देशमुख होते. आणि विंचूर गांव हें चांदवड माहालापैकीं असल्यामुळें विठ्ठल शिवदेव यानीं आपले विंचूर गांवचे देशमुख आले म्हणून होळकर यांस सामोरें जावें आणि पाटिलकीच्या नात्यानें त्यांची भेट घेऊन त्याचा सन्मान करावा व त्यांस नजर करावी; आणि त्यांस आपले वाडयांत आणून तेथें त्यांचा उत्तमप्रकारें सत्कार करावा. होळकर हे कधीं कधीं विठ्ठल शिवदेव याचे स्नेहसंबंधाचे आग्रहावरून आठ दिवसांवरही विंचुरास राहिलेले कळून येतें. त्याचप्रमाणें विठ्ठल शिवदेव हे चांदवडास गेले

असता ते विंचुरचे जाहगीरदार व आपण विंचूर गांवचे देशमुख समजून होळकर हे देशमुखीचे संबंधानें आपले मालिक आहेत असें मनांत आणून त्यांस सामोरें जात; व त्यांची परमादरानें भेट घेऊन त्यांस नजर करीत; नंतर आपले वाड्यांत नेऊन आग्रहपूर्वक कांहीं दिवस सत्कार करून ठेवून घेत. हा क्रम मल्हारराव होळकर यांचे अंतकाळापर्यंत चालला. होळकर कैलासवासी झाल्याचें वर्तमान विठ्ठल शिवदेव यांस ग्वाल्हेरीस समजल्या वेळेपासून त्यांस जसा कोणी आपले कुटुंबांतील प्रिय मनुष्यच गेला असें वाटून त्यावेळेपासून त्यांची उमेद खचली, आणि व्यवहारांत त्यांस सर्व प्रकारें उदासीनता प्राप्त झाली. तेणेंकरून दिवसेंदिवस ते क्षीण होऊन होळकर यांचे मागून थोडकेच महिन्यांनीं ते परलोकवासी झाले.

विठ्ठल शिवदेव हे फार उंच नसून ठेंगणेही नव्हते. त्यांचा बांधा मजबूत असून त्यांचें शरीर मेहनतीनें कमावलेलें व कसलेलें होतें. त्यांचा रंग काळा होता. त्यांचे शरीराचे मानापेक्षां त्यांचे हात अधिक लांब असत. त्यांचा स्वभाव क्रोधी तर होताच, परंतु विचारी असल्यामुळें ते मनमिळाऊ असत. कुटुंबांतील सर्व माणसें व आप्तमित्र इत्यादिकांबरोबर त्यांचें वर्तन मोठ्या प्रेमाचें असे. त्यांचा रंग काळा होता याविषयीं अशी एक गोष्ट आहे कीं, माहादजी शिंदे हे त्यांस कधीं विनोदानें म्हणत कीं, "तुमचा व आमचा वर्ण एकच आहे असें असून कर्म कां वेगळें झालें हें समजत नाहीं! म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चार जाति भिन्न असून त्यांस संस्कृतांत वर्ण अशी संज्ञा आहे व या वर्ण शब्दाचा अर्थ रंग असाही होतो. आतां माझा व तुमचा वर्ण म्हणजे रंग एकसारखा असून माझें कर्म शूद्रांचें कां झालें?" विठ्ठल शिवदेव यांस डामडौल अगदीं आवडत नसे. फौज सोडून बाहेर जाणें झालें तर पंचवीस घोडेस्वार मात्र त्यांजे बरोबर

असत. ते पालखींत अगर हत्तीवर अगर घोडीवर आमरणांत बसले नाहींत. वृद्धावस्थेंतही कसरत केल्याखेरीज त्यांचा दिवस लोटत नसे.

विठ्ठल शिवदेव यांस अ स्वामींचा अनुग्रह होता. या कारणानें भगवद्भक्तीकडे त्यांचें लक्ष बहुत असे. स्वतः त्यांनीं केलेलीं पदें व अभंग विंचुरास बहुत उपलब्ध आहेत. शिवाय त्यांचें एकपत्निव्रत मोठें पक्कें असून प्रातःस्नान सीतोदकाचें, हरिहराची पूजा, एकादशीस कांहीं न खाणें, हीं तीन व्रतें त्यानीं मोठ्या दृढनिश्चयानें आमरणांत शेवटास नेलीं.

आतां विठ्ठल शिवदेव यानीं धर्मसंबंधी सत्कृत्यें केलीं तीं लिहितों:— आपले गुरु आमृतस्वामी यांस मढें येथें एक मठ बांधून दिला; नंतर स्वामी समाधिस्थ झाल्यावर त्या मठांतील ज्या गुहेंत ते बसत होते त्यावर श्रीराम, लक्ष्मण व सीता यांच्या मूर्ति स्थापिल्या; त्या देवांची पूजा, नंदादीप व रामनवमीचा उत्साह चिरकाळ चालावयाच्या हेतूनें खुद्द आपले जाहागिरीपैकीं चांदगव्हाण नांवाचा अकराशें रुपयांचा गांव त्यानीं तिकडे लावून दिला. हा गांव श्रीगोदातीरीं कोपरगांवानजिक आहे. त्यांचे उत्पन्नाचा व्यय पावनबावाचें वंशज अजूनपर्यंत देवाकडे करीत आहेत.

आपले चालते काळांत शाहूमाहाराज यांचें मढें येथील राहणार बक्षी ह्मणजे ज्यांचे येथें विठ्ठल शिवदेव हे राहून प्रथम उदयास आले त्यांचा कृतोपकार स्मरून यानीं त्यांस आपलेजवळ ठेवून घेतलें आणि त्यांचा उत्तम प्रकारें बंदोबस्त ठेवून शिवाय त्यांस आपले सरंजामापैकीं किती एक माहाली नेमणुका करून दिल्या; त्या इंग्रजी अंमल होईतोंपर्यंत सतत चालल्या.

विठ्ठल शिवदेव यांचे आयुष्याचा बहुतेक काळ सरकारचाकरींतच गेला. कधीं कधीं घरीं राहाण्याचा प्रसंग आला त्या वेळीं त्यानीं कांहीं गांवपाटिलकीचीं व कुळकरणाचीं वतनें

खरेदी केलीं; पाटोदें माहालीं कितीएक गांवचा देशमुखीचा भाग खरेदी केला; त्याचप्रमाणें गुजराथ प्रांतीं कांही गांवचे देसायांचीं वतनें व गोदा व कृष्णा यांच्या तिरीं कांहीं गांवच्या पाटीलक्या खरेदी केल्या; त्या गांवांपैकीं कांहीं गांवीं आपल्या उभयतां वडील बंधुंसाठीं दोन विभाग व आपल्या स्वतःसाठीं एक विभाग मिळून तीन विभाग त्यांनीं बरोबर केले. त्या वतनांचा उपभोग त्या त्रिवर्ग बंधूचे वंशज अजून करीत आहेत.

पुराणप्रसिद्ध भीमा आणि निरा या महा नद्यांच्या संगमस्थळीं श्रीनृसिंहाचें स्थान आहे. त्या स्थानाचा सविस्तर महिमा वेद-व्यासप्रणीत पद्मपुराणांत सांगितला आहे. तो देव आपला कुल-स्वामी, यास्तव त्याचें मंदीर पूर्वी अगदीं लहान होतें व तें वरील दोन्ही नद्यांचे संगमाचे चिमटचांत चिरकाळ राहावें अशा संकल्पानें त्यांनीं फार खोल व मजबूत असा पाया घालून त्यावर भव्य आणि टोलेजंग मंदीर बांधिलें. त्या मंदिरांत ज्या मूर्तीचा महिमा पुराणांत लिहिला आहे अशा प्रल्हादकृत आणि ब्रम्हदेवकृत दोन मूर्ति त्यांनीं सिंहासनावर स्थापिल्या. आणि त्यास बहुमोल जवाहीर समर्पण केलें. तें मंदीर कधीं बांधिलें, याविषयींचा लेख ब्रम्हदेवकृत मूर्तीचे खालच्या सिंहासनावर आहे; तो असाः—

श्रीक्षेत्र निरानृसिंहपूर घाट गाभारा देवालय चरणारविंदीं विठ्ठल शिवदेव दाणी कसबे सासवड प्रांत पुणें शके १६७८ धातानामसंवत्सरे चैत्र शुद्ध १.

त्या नृसिंहस्थानाची पूजा, नैवेद्य, उत्साह वगैरे निरंतर चालावयाच्या इच्छेनें त्यांनीं गुजराथ प्रांतापैकीं सुरत जिल्ह्यांतील उरपाड माहालांतून नेमणूक सालिना रुपये ६,००० ची चालू केली. पुढें विठ्ठल शिवदेव यांचे नातू नरसिंह खंडेराव याणीं सदहू नेमणूक निरंतर चालेल अशी सनद करून दिली. नंतर कांहीं काळानें इंग्रजी अंमल झाला तेव्हां सनदेप्रमाणें चालविण्याविषयीं

एल्फिन्स्तन साहेब कमिशनर यांणीं विठ्ठल शिवदेव यांचे वंशांतील पुरुषांचे मार्फत देवाचा खर्च निरंतर चालावा अशी सनद करून दिली. त्याप्रमाणें त्यांचे वंशज रघुनाथराव विठ्ठल यांजकडून देवस्थानाचा खर्च व सेवा हल्लीं चालू आहे.

आबुराव शिवदेव व त्रिंबकराव शिवदेव या उभयतां वडील बंधूंस कर्ज होतें तें विठ्ठल शिवदेव यानीं फेडून उभयतां बंधूंकडून बहुत खर्चानें काशीयात्रा कराविली.

विठ्ठल शिवदेव यानीं पुष्कळ ब्राह्मणांस उत्तर व दक्षिण हिंदुस्थानांत वर्षासनें व नेमणुका करून दिल्या. त्यांपैकीं अद्यापि कांहीं चालत आहेत.

विठ्ठल शिवदेव यांचे ताब्यांत जो मुलुख होता, त्यांतील कितीएक माहालीं त्यानीं श्रीनृसिंहाचीं मंदिरें व शिवालयें बांधून त्यांचे पूजानैवेद्य यांचे खर्चास नेमणुका करून दिल्या. त्या नेमणुका हाल्लीं चालत आहेत.

श्री गोदातीरीं सायखेडें नांवाचा गांव विठ्ठल शिवदेव यांस इनाम मिळाल्यावर त्यानीं त्या गांवीं श्रीनृसिंहाचें एक उत्तम मंदीर बांधिलें.

याप्रमाणें आम्ही विठ्ठल शिवदेव यांचें वृत्त सादर केलें आहे; यांत ते कोठें व कोणते सालांत जन्मले, आणि त्यानीं शाहू माहाराजांची कृपा कशी संपादन केली, व त्यांचा आश्रय मिळाल्यावर अक्षय्य कीर्ति कशी संपादन केली हें लिहिलें आहे; शिवाय प्रत्येक सालीं या नाशिवंत जगांत त्यानीं कोणकोणते पराक्रम केले ते प्रथम लिहून नंतर पुढें परलोकसाधनाचीं कृत्यें त्यानीं कोणतीं केलीं तीं निवेदन केलीं आहेत.

विठ्ठल शिवदेव यांच्या ऐन उमेदींत म्हटलें तर बाजीराव साहेबांचे घोड्याबरोबर यांचा घोडा उभा असे अशी त्यांची स्थिति होती. बाजीराव साहेबांसारखा मेहनती व कट्टा शिपाई ब्राम्हणांत विरळा. पेशव्यांचे वंशांत असा शूर पुरुष दुसरा झालाच

नाहीं. सारांश विठ्ठल शिवदेव यांस बाजीरावसाहेबांचें वळण लागलें होतें. बाजीराव साहेबानीं वीस एकवीस वर्षें राज्यकारभार करून माळव्यांत आणि उत्तरहिंदुस्थानचे कांहीं भागांत आपला अंमल बसविला. त्यांच्या बहुतेक स्वाऱ्यांत विठ्ठल शिवदेव हे त्यांजबरोबर मसलत व पराक्रम करण्यास होतेच. बाजीराव साहेबांचें व त्यांच्या सरदारांचें शौर्य आणि कारस्थान पाहून शाहूमाहाराज फार खुष झाले; आणि आपलें नांव कायम ठेवून राज्य वाढविण्यास ते फारच उपयोगाचे आहेत असें त्यांस वाटल्यावरून त्यानीं आपला मुलुक काबीज करण्याचा सर्व अधिकार बाजीराव साहेबांचे स्वाधीन केला. शिवाजीमाहाराजानीं राज्यरूपी वृक्ष मोठ्या आस्थेनें लाविला. तो पुढें शाहुमाहाराजानीं बाजीरावसाहेब यांचे स्वाधीन केला. त्यानीं त्यास वेळेवर व मनमुराद पाणीं घातल्यामुळें पुढें त्याचा विस्तार इतका मोठा झाला कीं, त्याच्या शाखा सर्व हिंदुस्थानभर पसरून त्याचीं विपुल फळें भगव्या झेंड्याच्या सर्व सरदारांनीं पुढें स्वतंत्रपणें यथेच्छ सेवन केलीं व अद्यापिही कांहीं करीत आहेत.

---

# भाग दुसरा.

## शिवाजी विठ्ठल विंचूरकर यांचें चरित्र.

पहिले भागाचे समाप्तीस आह्मीं विठ्ठल शिवदेव यांच्या देहांता-संबंधी मजकूर लिहिला. आतां येथून पुढें त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव शिवाजी विठ्ठल यांचें चरित्र लिहिण्यास आह्मी आरंभ करितों.

विठ्ठल शिवदेव यांचे अंतकाळसमयीं त्यांचे पांच पुत्र, कुटुंबांतील सर्व माणसें, पदरचीं सर्व मंडळी व लष्करांतील सर्व सरदार यांस जें दुःख झालें त्याचें किती वर्णन करावें ? कारण सूर्यास्त झाल्यावर सर्वत्र जसा एकदम अंधःकार होतो त्यासारखा प्रकार तेथें होऊन गेला. असो; शास्त्रोक्त रीतीनें त्यांचें दहन झाल्यावर त्यांचे वडील पुत्र शिवाजी विठ्ठल यानीं तें दुःखकारक वर्तमान श्रीमंत रावसाहेब पेशवे यांस कळविण्यास्तव एक व दिवाण सखाराम बापू यांच्या नांवचें एक अशीं दोन पत्रें देऊन गोविंद लक्ष्मण नांवाचा वकील यास पंचवीस स्वारांनिशीं पुण्यास तावडतोब रवाना केलें. वकील हे तिसरे दिवशीं पुण्यास पोहोंचले. ते प्रथम सखारामबापूंकडे गेले. बापूंस पाहून त्यांस गहिंवर आला. सखारामबापूंनीं विचारिलें कीं, "काय झालें, दुःख कां करतां ?" तेव्हां वकील मजकूर यानीं त्यांस विठ्ठल शिवदेव-यांचे देहांताचें वर्तमान सविस्तर कळविलें. तें ऐकून सखाराम बापूंस फार खेद झाला, आणि ते बोलले कीं, "विष्णूस जसे चार हात तसे आमचे मालिकांस शिंदे, होळकर, विंचूकर आणि

मिरजकर हे चार हात होते; पैकीं मल्हारराव होळकर व विठ्ठल शिवदेव विंचूरकर हे गेल्यानें दोन हात आतां कमी झालें. ईश्वरेच्छेस उपाय नाहीं." असो; नंतर गोविंद लक्ष्मण यांस बरोबर घेऊन सखारामबापू श्रीमंत रावसाहेब यांजकडे गेले. विंचूरकर यांजकडील वकील श्रीमंतांचे दृष्टीस पडतांच त्यांनीं त्यांस विचारिलें कीं, "विठ्ठलराव हे हिंदुस्थानांतून येतांना वाटेंत त्यांची प्रकृति बिघडली होती; तत्रापि ते तसेच विंचुरास पोहोंचल्याची खबर आली. त्याजवर कांहींच कळून आलें नाहीं. आतां प्रकृति कशी आहे?" तेव्हां सखारामबापूनीं त्यांस सर्व वृत्त निवेदन केलें. तें ऐकून श्रीमंत फार कष्टी होऊन बोलिले कीं, "झालेले गोष्टीस उपाय नाहीं; तुम्ही दुःख करूं नका. विठ्ठलराव यांचे पांच पुत्र आहेत; त्यांपैकीं शिवाजीपंत हे आपल्या वडिलांप्रमाणेंच सरकारची चाकरी करून तुम्हां सर्व जुन्या मंडळीचा प्रतिपाळ करतील. विठ्ठल शिवदेव गेले म्हणून कांहीं कमी होणार नाहीं. त्यांचे चिरंजीव शिवाजीपंत यास सरदारीचीं वस्त्रें सत्वर देण्यांत येतील, कारण सरदारी चालविण्यास योग्य असें त्यांस विठ्ठलराव याणीं आपल्या हयातींतच करून ठेविलें आहे." नंतर त्यानीं सखारामबापू यांस आज्ञा केली कीं, "समाधानार्थ कोणी तरी मनुष्य विंचुरास पाठवावा." मग शिवाजी विठ्ठल यांजकडून आलेल्या पत्राचें उत्तर त्यांनीं गोविंद लक्ष्मण यांजपाशीं देऊन त्यांस परत जाण्यास आज्ञा दिली. तें पत्र असें:—

---

॥ श्री ॥

राजेश्रिया विराजित राजमान्य राजेश्री शिवाजी विठ्ठल स्वामी गोसावी यांस.

पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान. नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणें. विशेष. पत्र पाठविलें तें

पावलें. विठ्ठल शिवदेव निधन पावल्याचें वर्तमान लिहिलें तें श्रवण होऊन चित्त विक्षेपाप्रत पावलें. ईश्वरें मोठी अनुचित गोष्ट केली. मशारनिल्हे मातबर मनुष्य सरकार उपयोगीं कार्य कर्ते होते. ईश्वरी तंत्रास उपाय नाहीं. हा मृत्यु लोक, तुम्ही खेद न करणें. विवेक करून क्लेशाचें परिमार्जन करून सर्वांचें समाधान करणें. तुम्ही त्यांचे जागीं आहां. सर्व प्रकारें तुमचें चालविलें जाइल. चिंता न करणें. रवाना चंद्र २२ रब्बिलावल सुरसन सम्मान् सीतैन मया व अल्लफ. बहुत काय लिहिणें. * सारांश कीं, या गोष्टीस कोणाचा उपाय आहे असें नाहीं. बरें. ईश्वरी सत्ता प्रमाण. तुम्हाविषयीं येथें दुसरा विचार नाहीं. तुम्ही सत्वर भेटीस येणें. चंद्र मजकूर. हे विनंती.

---

मग वकील यांस घेऊन सखारामबापू आपले घरीं आले; आणि तेथें आपल्या स्वतःच्या पत्राचें उत्तर लिहून त्यांचे इवाली केलें. ते उत्तर येणेंप्रमाणें:—

॥ श्री ॥

राजेश्रिया विराजित राजमान्य राजेश्री बापू स्वामींचे सेवेशी.

पोष्य सखाराम भगवंत. कृतानेक नमस्कार विनंती उपरि येथील कुशल तागाईत चंद्र २२ रब्बिलावल पर्यंत जाणून स्वकीये कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेष. तुम्हीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट झालें. राजेश्री विठ्ठलपंततात्या हिंदुस्थानांतून देशास येतांना मार्गीं शीतज्वराची व्यथा झाली; यामुळें बहुत हैराण झाले; तसेंच विंचुरास मजल दरमजल आले; येथें आल्यावर चार दिवस होते; पांचवे दिवशीं काळ झाला म्हणून लिहिलें. ऐशास ईश्वरें बहुत अनुचित

---

*येथून पुढील मजकूर खुद्द माधवराव पेशवे यांचे खदस्तुरचा आहे.

केलें. हें वर्तमान ऐकतांच चित्तास बहुत श्रम झाले. असो; हा मृत्युलोक आहे; ईश्वरी संकेतास उपाय काय ? तुम्हीं धैर्य धरून सर्वांचें समाधान करून कोणेविषयीं चिंता न करणें. तुम्हांविषयीं श्रीमंतांस विनंती केली आहे. चित्तांत दुसरा अर्थ कांहीं न आणावा. श्रीमंतानीं पत्राचें उत्तर पाठविलें आहे; व भेटीचा हा योग सत्वरच त्या प्रांतीं आल्यावर होईल. वरकड कित्येक मजकूर राजश्री गोविंद लक्ष्मण यानीं सांगितले ते कळों आले. सारांश, तात्या गेले; सर्व प्रकारें बाजू गेली; सरकारचाही नाशच झाला; उपाय नाहीं. तुम्ही शिंनरचे आलीकडे येऊन श्रीमंतांस भेटणें. उभयतांच्या भेटी होताच तुम्ही अगोदर येऊन भेटणें. अनमान न करावा.बहुत काय लिहिणें लोभ असों द्यावा.हे विनंती.

---

शिवाय बापूनीं आज्ञेप्रमाणें शिवाजी विठ्ठल यांच्या समाधानार्थ वकीलांबरोबर सरकारचे उपाध्ये कर्वे व आप्त राजमाचीकर यांस देऊन त्यांची रवानगी करून दिली.उपाध्ये व आप्त विंचूरास पोहोंचल्यावर त्यानीं शिवाजीपंतबापू यांचें सांत्वन केलें आणि गोदातीरीं उत्तरकार्य समाप्त झाल्यावर त्यांस दुखवटाचीं वस्त्रें देऊन ते पुण्यास परत गेले.

पुढें रावसाहेब श्रीमंत यांची स्वारी गोदातीराकडे येण्यास निघाली, तेव्हां विंचूरकरांचे दिवाण चिमणाजी खंडेराव हे विंचुराहून निघून स्वारी संगमनेराजवळ होती तेथें जाऊन पोहोंचले; आणि त्यानीं श्रीमंतांची भेट घेऊन शिवाजीपंतबापू भेटीस येत आहेत असें त्यांस विनंतीनें कळविलें. श्रीमंतानीं त्यांचें पुष्कळ रीतीनें सांत्वन करून "शिवाजीपंतबापू हुजूर आले ह्मणजे त्यांस लागलीच वस्त्रें व मुलुकाच्या सनदा द्यावयाच्या आहेत, याकरितां त्या देण्याची तयारी करून ठेवावी." अशी सखारामबापू यांस आज्ञा केली. नंतर श्रीमंतांची स्वारी तेथून निघून नाशिकाजवळ आनंदवल्ली येथें गेली. त्या स्वारीबरोबर चिमणाजी खंडेराव

होतेच. हें वर्तमान शिवाजीपंतबापू यांस कळतांच त्यांनीं आपले चार बंधु, मानकरी व इतर पदरची मंडळी यांसह स्वारींत जाऊन श्रीमंतांची भेट घेतली. श्रीमंतानीं त्यांस अश्वासन देऊन पुष्कळ प्रकारें त्यांचे सांत्वन केलें; आणि त्याच वेळेस सरदारीचीं वस्त्रें व माहालांच्या नव्या सनदा देऊन आज्ञा केली कीं, " स्वारी लवकरच पुण्यास परत जात आहे. तुम्ही विंचूरास माघारें जावें आणि घरची सर्व व्यवस्था करून फार लवकर पुण्यास यावें. " दुसरे दिवशीं शिवाशी विठ्ठल श्रीमंतांचा निरोप घेऊन विंचुरास परत आले. त्यांचे पदरची मंडळी व गांवांतील सर्व लोक व फौजेंतील सरदार यांनीं तो दिवस आनंदाचा मानून उत्साह केला. पुढें थोडकेच दिवसांनीं शिवाजी विठ्ठल पुण्यास जाऊन आपले सरदारीचें कामकाज पाहूं लागले, आणि वडिलांचे वेळेस जें काम ज्याकडे होतें तें त्याकडेसच कायम ठेवून सर्व पदरचे मंडळीवर बहुत प्रेम करूं लागले. त्या योगानें विठ्ठलराव गेल्याचे कारणानें झालेलें दुःख विसरून सर्व लोक एकनिष्ठेनें सेवा करूं लागले.

पुढें सुमारें दोन वर्षांनीं म्हणजे सन १७६९ इसवी सालीं पेशवे यानीं आपलें पानिपतच्या लढाई मुळें उत्तरहिंदुस्थानांत नष्ट झालेलें वर्चस्व पुनः स्थापनकरण्यास्तव विनीवाले, शिवाजी विठ्ठल विंचूरकर, माहादजी शिंदे व तुकोजी होळकर यांस त्या प्रांतीं पाठवून दिलें. पूर्वीं उत्तर हिंदुस्थानांत अबदाली बादशाहा येऊन पानिपत येथें संपूर्ण मराठे राष्ट्रास घातकारक असा जो रणसंग्राम झाला होता त्याचें मुख्य बीज रोहिले जातीचा सरदार नजीबउद्दौला हाच होता, सबब वर लिहिलेल्या मराठे सरदारांनीं त्याचा मुलुक म्हणजे रोहिलखंड याजवर चढाई करून त्याची धूळधाणी केली, आणि रोहिलेलोकांस पादाक्रांत करून त्यांस जीवरक्षणार्थ कमाऊं पाहाडांत पळून जाणें भाग पाडिलें. नंतर

त्या सरदारांनीं दिल्लींत पेशव्यांचा अंमल केला, आणि मोघल बादशाहास इंग्रजांचे आश्रयांतून काढून आपले आश्रयाखालीं घेतलें. अशाच प्रकारचीं कित्येक राज्य कारणें व उलाढाल्या त्या प्रांतीं झाल्या; त्यांचा विस्तार स्थलसंकोचास्तव येथें लिहिणें जरूर दिसत नाहीं. इतकेंच लिहिणें बस्स आहे कीं, पुढें दोन अडीच वर्षांनीं रणशूर, मसलती, न्यायी, जर्बी असून लोक प्रीय, व राजकार्यधुरंधर असे जे माधवरावसाहेब पेशवे ते संपूर्ण मराठे राष्ट्राचे कम्नशीबामुळें अल्पवयांतच पुण्यानजीक थेऊर नांवाच्या गणेश क्षेत्रांत गणपतीसंनिध परलोकवासी झाल्यानंतर, बिनीवाले विसाजी कृष्ण हे पुण्यास परत आले; परंतु माहादजी शिंदे व शिवाजी विठ्ठल विंचूरकर यांस बंदोबस्ताकरितां तिकडेसच राहणें प्राप्त झालें.

हिकडे पुण्यांत असें झालें कीं, माधवरावसाहेबांचा देहांत झाल्यावर त्यांचे कनिष्ठबंधू नारायणराव यानीं सातान्यास जाऊन तेथील रामराजे यांजपासून मुख्य प्रधानाच्या अधिकाराचीं वस्त्रें घेतलीं; आणि थोडीं वर्षें राज्य चालविल्या नंतर ते सन १७७३ सालीं मारेकऱ्यांच्या हातांनीं मारले गेले. त्यावेळेस त्यांची पत्नी गंगाबाई ही कांहीं महिन्यांची गरोदर असून तिला पुढें पुत्र झाला; आणि कारभारीमंडळानें त्याचें नांव माधवराव असें ठेवून त्यांच्या नांवानें राज्यकारभार चालू केला. त्या कारभाऱ्यां पैकीं नानाफडनवीस यानीं उत्तरोत्तर सखारामबापू बोकील, मोरोबादादा फडनवीस, वगैरे मुत्सद्दी मंडळीवर आपले वर्चस्व स्थापून संपूर्ण राज्यकारभाराचीं सूत्रें आपले हातांत घेतलीं.

तिकडे उत्तरहिंदुस्थानांत सन १७८३ इसवी सालीं माहादजी शिंदे यानीं दिल्लीचे बादशाहाची फौज बरोबर घेऊन जयपूरचे राजावर स्वारी केली. तेव्हां जयपूरचे व जोधपूरचे राजे यांचा एकोपा होऊन त्यानीं शिंदे यांचे फौजेबरोबर ल-

ढाई केली; तींत बादशाही फौजेपैकीं महमदबेग व इस्मायलबेग या नांवांचे दोन मुसलमान सरदार आपापल्या हाताखालच्या फौजेनिशीं शिंद्यांचें लष्कर सोडून गेले आणि जयपूरचे फौजेंत मिळून उलटे शिंद्यांचे फौजेबरोबर लढूं लागले; त्यामुळें शिंद्यांचा पक्ष दुर्बळ झाला. तत्रापि त्यांजजवळ कवाइती फौज होती; तिजवरील फ्रेंच सरदार यांनीं लढाई न सोडितां गोळ्यांचा वर्षाव चालविलाच होता. त्यामुळें जयपूरचे सैन्यांतील बहुत लोक जखमी झाले व पडले. तें पाहून वर लिहिलेल्या दोन फितूरी सरदारांनीं शिंद्याच्या तोफा हिसकावून घ्याव्या या इराद्यानें मोठ्या निकरानें एकदम हल्ला केला. त्याचा परिणाम इतकाच झाला कीं, कवाइती फौजेस मागून पाठिंबा नसल्यामुळें ते सरदार गोल बांधून निघून गेले आणि बाकीच्या बेकवाइती फौजेवरच सर्व मारा पडला. अशा बिकट प्रसंगीं आपला बचाव कसा होईल याविषयीं माहादजी शिंदे यांस फिकीर प्राप्त झाली; आणि पुढें काय करावें या विवंचनेंत ते असतां, त्यांचे मनांत शिवाजी विठ्ठल यांची मदत मागावी असा विचार आला. परंतु त्या वेळेस पुण्याचे दरबारांत मुख्य दिवाण नाना फडणवीस होते; त्यांचे मनांत माहादजी शिंदे यांचा अधिकार मर्यादित राहावा, व जयपूर वगैरे रजपूत राजांवर दाब राहणें तो माहादजी शिंदे यांचे विद्यमानें न राहातां परभारें राहावा असें असून, त्याविषयीं त्यानीं शिवाजी विठ्ठल यांस आंतून सूचनाही केली होती. त्यामुळें शिवाजी विठ्ठल हरवक्त माहादजी शिंदे यांचे स्वारीशिकारींत सामील न होतां,अलग राहत असत. तशांत थोडके दिवसांपूर्वी त्यांजविषयीं शिवाजी विठ्ठल यांचें मन विटण्यास एक कारण झालें होतें. तें असें:—

शिंद्यांचे लष्करांत गोसावी लोकांचा बहुत भरणा असून त्या सर्व लोकांवर हिंम्मतबाहादर या खिताबाचा एक गोसावी सरदार होता. त्यावर मगरूरीचे कारणास्तव शिंद्यांची इतराजी होऊन

त्यांनीं त्यास कद करण्याचा हुकूम केला. हें वर्तमान हिंम्मत-बाहादर यास कळतांच तो ताबडतोब आपले गोटांतून निघाला आणि शिवाजी विठ्ठल यांचे गोटांत येऊन जरीपटक्याचे आश्रया-खालीं बसला. तें ऐकून शिंदे यानीं वकिलाबरोबर शिवाजी विठ्ठल यांस सांगून पाठविलें कीं, " हिंमतबाहादर यास आमचे स्वाधीन करावें." त्याचें उत्तर शिवाजी विठ्ठल यानीं असें सांगून पाठविलें कीं, " जरीपटका हें चिन्ह माझें खासगी नसून आपले सर्वांचे मालिक पेशवे बाहादर यांचे मरातबाचें आहे; त्याचा हिंम्मतबाहदरानें आश्रय केला असतां,त्यास पकडणे हे त्या झेंडयाचा अपमान केल्याप्रमाणें होईल, सबब ती गोष्ट माझे हातून होणार नाहीं; व तसें तुम्हींही न करावें अशी तुह्मांस माझी सल्ला आहे; कारण कदाचित् मीं त्यास धरण्याचा यत्न केलाच तर त्या झेंडयाचें रक्षण करणारे लोक तो मालिकास शरण आला आहे असें समजून त्यास माझे सुद्धां स्वाधीन करणार नाहींत. आणि या माझे सूचनेविरुद्ध तुम्हीं त्यास पकडण्याचा यत्न कराल तर ही गोष्ट आपले मालिकांपर्यंत पोंहेचेल, आणि शेवटीं काय परिणाम होईल हें माझ्यानें सांगवत नाहीं. याकरितां जें करणें असेल तें विचारकरून करावें. " हे ऐकून माहादजीबावांस राग आला. तेव्हां त्यांचा राणेखान् नांवाचा एक सरदार जवळ होता; त्यास असें वाटलें कीं, शिंदे रागाच्या सपाटयांत कदाचित् कांहीं अविचाराची गोष्ट करतील. त्यावरून त्यानें त्यांस विनंती केली कीं, "खुदावंद ! आपण या कामीं आग्रह धरणें हे ठीक नाहीं; कारण ही गोष्ट खचीतच लांबून आपले मालिक पेशवे यांजपर्यंत जाणार आहे; व आपण ज्या स्थितींत हाल्लीं आहों त्या स्थितींत आपसांत तंटा उत्पन्न करून आपला पक्ष दुर्बळ करणें हें रास्त नाहीं." शिंदे हेही विचारीच होते; त्यांस जरी राग आला होता, तरी त्यानीं तो पिऊन जाऊन पुढें वरील गोष्टीचे संबंधानें कांहींच तजवीज केली नाहीं. तत्रापि त्यावेळेपासून शिवाजी विठ्ठल व माहा-

रजीबावा यांचीं मनें कांहीं काळपर्यंत शुद्ध राहिलीं नाहींत. असो; हिंम्मतबाहादर यास वर लिहिल्याप्रमाणें आश्रय मिळाल्यानें तो शिवाजी विठ्ठल यांचे लष्करांतच राहिला.

सदर्हु कारणास्तव शिवाजी विठ्ठल हे वर लिहिलेल्या लढाईंत सामील न होता आपल्या हाताखालच्या फौजेनिशीं थोडक्याच अंतराबर लढाईचे तयारीनें काय परिणाम होतो त्याची वाट पाहात उभे राहिले होते.

परस्परांचीं मनें शुद्ध नव्हतीं या कारणास्तव शिवाजी विठ्ठल यांस मदतीसाठीं सूचना करावी किंवा नाहीं याविषयीं शिंदे हे मनांत विचार करीत होते. शेवटीं दुसरा इलाजच नसल्यामुळें त्यानीं त्यांस असें सांगून पाठविलें कीं, "या संकटसमयीं मनांतील सर्व गोष्टी एकीकडे ठेवून तुम्हीं मला मदत केली असतां फौजेचा नक्षा राहील; नाहीं तर आपले मालिकाचे कीर्तीस कलंक लागणार आहे."

शिवाजी विठ्ठल मदतीस येण्यापूर्वींच शिंद्यांचे फौजेचा मोड होऊन जयपूरचे राजाकडील केसरिया लोक* त्या फौजेचा पाठलाग करीत चालले होते. ते समयीं, ज्याप्रमाणें आपले वडिलानीं पूर्वीं लढाया मारून आपले मालिकाचा नक्षा केला होता, त्याचप्रमाणें आपणही लढाई मारून नक्षा करण्याची हीच वेळ आहे असें शिवाजी विठ्ठल यांस वाटून त्यानीं आपले फौजेनिशीं उठावणी केली; आणि जयपूरचे केशरीया लोकांवर हल्ला करून त्यांचा अगदीं मोड केला; व त्यांची कत्तल उडवून त्यांस पळवून लाविलें; आणि जे केशरिया लोक अगोदर मोठ्या फुशारकीनें

---

*जे रजपूत शिपाई लोक लढाईस निघण्याचेपूर्वीं आपले घरची सर्व निरवानिरव करून, नंतर आफिमेचा कुसुंबा पिऊन शत्रूस मारूं अगर मरूं अशा दृढ निश्चयानें केशरी पाषाग करून लढाईस जातात, त्यांस केशरीया हें नांव आहे.

शिंद्यांचे फौजेचा पाठलाग करीत चालले होते त्यांचाच पाठलाग आपण करून त्यांस जयपूर शहरापर्यंत मारीत नेलें. या लढाईंत शिवाजी विठ्ठल यांचे फौजेवरील सेनापती बाबूराव विठ्ठल कोटमगांवकर, दिवाण चिमणाजी खंडेराव व मेवाती लोकांचे जमातीचा मुख्य सरदार यांनीं मोठी बाहादुरी करून पूर्णपणें जय मिळविला. तेणेंकरून माहादजी शिंदे यांचे फौजेचा नाशापासून बचाव होऊन ते विंचूरकर यांचे मोठे आभारी झाले. त्या रात्रीस माहादजी शिंदे यानीं स्वतः शिवाजी विठ्ठल यांचे डेऱ्यांत जाऊन त्यांचे बहुत उपकार मानिले, आणि त्या वेळेस जें समजुतीचें भाषण झालें तेणेंकरून उभय सरदारांमध्यें पुर्वीं आलेलें वैमनस्य नाहींसें होऊन पुनः सख्य झालें. त्या वेळेपासून शिंदे हे शिवाजी विठ्ठल यांस काका असें म्हणूं लागले. सदहू उपकारापासून उतराई होण्यास्तव माहादजी शिंदे यानीं आपले मुलुकापैकीं फत्तेआबाद माहाल शिवाजी विठ्ठल यांस देऊन त्याबद्दल त्यांस सनद करून दिली. सदहू माहाल विंचूरकर यांजकडे कांहीं वर्षें शिंद्यानीं चालविला. आपल्या मनाची सफाई झाल्याचें एक चिन्ह म्हणून शिवाजी विठ्ठल यानींहि हिंम्मतबाहादर गोसावी यास बोलाविलें, आणि त्यास माहादजी शिंदे यांचे स्वाधीन करून त्याचे अपराध क्षमा करण्याविषयीं त्यांस सिफारिष केली. माहादजी शिंदे यानीं त्या सिफारिषीचा स्वीकार करून हिंम्मतबाहादर यांस आपलेबरोबर नेलें. नंतर शिवाजी विठ्ठल यानीं आपले फौजेंतील मेवांती लोकांचा जमादार यास वर लिहिलेल्या बाहादुरीबद्दल बक्षिस म्हणून आपले भीतरवार नांवाचे माहालापैकीं सालिना ३०० रुपये आकाराची जमीन दिली. तिचा उपभोग त्या जमादाराचे वंशज अद्यापि करीत असून त्यांपैकीं एक इसम विंचूर संस्थानांत नोकरी करीत असतो.

पुढें बुंदी व कोटा वगैरे ठिकाणचे रजपूत राजांवर शिंदे यानीं ज्या स्वाऱ्या केल्या, त्या सर्वांत शिवाजी विठ्ठल

हे त्यांजबरोबर फौजेनिशीं असून त्यांची त्यास लढाईंत मोठी मदत असे. आणि बुंदी व कोटा येथील राजांकडून ज्या खंडण्या शिंदे यांस देण्याचे ठराव झाले, त्या खंडण्यांपैकीं शिवाजी विठ्ठल यानीं आपला हिस्सा पृथक ठरवून घेतला; तो त्यांचे घराण्यास पेशवाईचे आखेरीपर्यंत मिळत होता. सदर्हूप्रमाणें त्यांनीं पृथक ठराव करून घेतल्यानें नानाफडणवीस यांस मोठा संतोष झाला.

पुढें थोडक्याच दिवसांनीं असें झालें कीं गुलामकादर नांवाच्या ज्या रोहिले सरदारानें आलमगीर बादशाहा यास कैद करून त्याचे फार हाल केल्यानंतर त्याचे डोळे काढून टाकिले होते,त्या सरदाराचें पारिपत्य करण्याकरितां शिंदे यानीं त्याजवर स्वारी केली. त्या स्वारींत, व तसेंच पुढच्याही लढायांत, शिवाजी विठ्ठल हे फारशी मेहनत न करितां अलग राहिले; कारण शिंदे यांचा प्रताप फारच वाढत चालल्यामुळें त्यांस नानाफडणवीस यांजकडून वरचेवर गुप्त सूचना येत असत कीं, "तुम्हीं शिंदे यांस लढाईचे कामीं विशेष मदत न करितां, त्यांच्या सर्व राजकारणांत व मोहिमांत आपण सामील आहों इतकें मात्र बाह्यात्कारीं लोकांस दिसेल असें वागावें." सदर्हू लढायांत माहादजी शिंदे यानीं गुलामकादर यास कैद करून त्यानें पूर्वी बादशाहाचे डोळे काढिले होते त्याचा सूड उगविण्याकारितां, त्याचे डोळे काढविले; आणि मोठे हाल करून शेवटीं त्यास मारून टाकिलें; व त्याचें साह्य करणाऱ्यांचाही अगदीं मोड करून त्यांस मुलकांतून हाकून दिलें.याप्रमाणें शिंदे यांची चोहोंकडे उत्तर हिंदुस्थानांत जरब बसली. नंतर शिंदे दिल्लीस परत येऊन त्यानीं आलमगीर बादशाहास पुनः समारंभानें तख्तावर बसविलें, आणि त्याचे हुकूमावरून, त्याचा पुत्र बेदरबखत, जो पूर्वी गुलाम कादर यास मिळून त्याचे वतीनें बादशाहाचे तख्तावर बसला होता, त्यास मारून टाकिलें. याप्रमाणें माहादजी शिंदे यानीं दिल्लीचे बादशाहाचे फारच उपयोगीं पडून त्यास संकटांतून मुक्त केलें, यामुळें तो मोठा आभारी होऊन शिंद्यांवर

त्याची कमाल मेहरबानगी झाली. तेव्हां शिंदे यांनीं प्रथम त्याजपाशीं हिंदुस्थानांत गोवध बंद होण्याची सनद मागितली. ती त्यांस लागलीच प्राप्त झाली. नंतर त्यानें शिंदे यांस व त्यांचे विनंतीवरून त्यांचे मालिक पेशवे यांस मोठे खिताब, हक्क व बक्षिसें दिलीं आणि त्याबद्दल सन १७९३ इसवी सालीं त्यांस निरनिराळ्या सनदा करून दिल्या. * त्याचप्रमाणें त्यानें शिवाजी विठ्ठल यांसही एक तरवार, एक खंजीर व पुष्कळ जवाहीर बक्षीस दिलें; आणि पूर्वी त्यांचे वडील विठ्ठल शिवदेव यांस राजे उमदे-उल्मुलक बाहादर असा खिताब देण्यांत आला होता तो त्यांचे वंशजांस कायम केला.

शिवाजी विठ्ठल उत्तर हिंदुस्थानांत वीस बावीस वर्षें होते. प्रथम त्यांचे स्वारीचा मुक्काम बहुधा ग्वाल्हेर येथें असे; परंतु सन १७७९ चे सुमारास शिंदे यांचे मनांत असें आलें कीं, आपणांस ज्या मुलुकांवर स्वाऱ्या करावयाच्या त्यामुलकांस ग्वाल्हेर हें ठिकाण नजीक असून तें छावणीस फार सोईचें आहे; तसेंच तेथें व त्याचे आसपासचे प्रदेशांत हवापाण्याचीही सोय चांगली आहे. याकरितां "तें शहर शिवाजी विठ्ठल विंचूरकर यांजकडून आमचे स्वाधीन करविलें असतां माझे फौजेची मोठी सोय होईल," असें माहादजी शिंदे यानीं पुण्याचे दरबारास लिहून पाठविलें. त्यावरून ग्वाल्हेर शहर व तो किल्ला आणि त्यांचे बंदोबस्ताचे खर्चासाठीं लावून दिलेला मुलुक येणेंप्रमाणें माहादजी शिंदे यांचे स्वाधीन करून देण्याविषयीं शिवाजी विठ्ठल यांस पुण्याहून दरबारचा हुकूम गेला. तेव्हां त्यानीं हुकुमाप्रमाणें व्यवस्था केली, आणि आपलें लष्कर तेथून काढून मथुरा येथें त्याची छावणी केली. ग्वाल्हेर हें ठिकाण शिवाजी विठ्ठल यांचे वडील विठ्ठल शिवदेव यानीं जाटापासून मोठ्या शौर्यानें सर केलेलें असून तेथें

* या संबंधाचे कागद या इतिहासाचें परिशिष्ट "क" यांत दाखल केले आहेत.

त्यांचें लष्कर राहाण्याचीही सोय चांगली होती; आणि तें माहादजी शिंदे यांस देवविल्यानें आपले हक्कांत कमीपणा आला असें शिवाजी विठ्ठल यांस वाटल्यावरून त्यानीं पुण्यास गेल्यावर त्या बाबतींत श्रीमंतांस विनंती करण्याचा निश्चय केला; परंतु त्याविषयीं पुढें काय झालें तें समजत नाहीं. शिवाजी विठ्ठल पुण्यास येण्यास निघाले त्यावेळेस शिंद्यानीं त्यांस सांगितलें कीं "तुमची फौज आमचे मदतीस बहुत वर्षें आहे. आतां तुह्मी देशीं जाणार याकरितां तुमची एक पागा आमचे हुजूर हमेषा असावी अशी आमची इच्छा आहे." त्यावरून शिवाजी विठ्ठल यानीं शंभर स्वारांची एक पागा शिंदे यांचे तैनातीस ठेविली. ती पागा प्रस्तुतचे राज्यकर्ते माहाराज जयाजीराव शिंदे यांचे कारकिर्दीचे आरंभापर्यंत शिंद्यांकडे होती. शिवाजी विठ्ठल यानीं ग्वाल्हेर येथें एक मोठा वाडा बांधिला होता; त्यांत विंचूरकरांचे हिंदुस्थानांतील माहालांचें कामकाज चालत होतें; व त्या संबंधानें शिंद्यांचे हुजूर एक वकीलही होता; तो तेथें राहून पागा व माहाल या दोहींचीं कामें पाहात असे. पुढें दक्षिणेंत इंग्रजी अंमल होऊन विंचूरकरांचे तिकडील सर्व माहाल इंग्रज सरकारांकडून खालसा होततोंपर्यंत त्यांचा वर लिहिल्याप्रमाणें एक वकील तेथें राहिला. तेथील शेवटचा वकील गणेश राजाराम या नांवाचा मनुष्य होता.

सन १७९३ इसवी सालीं माहादजी शिंदे पुण्यास आले तेव्हां शिवाजी विठ्ठलही त्यांजबरोबर पुण्यास आले. त्या वेळेस त्यांचें वय पासष्ठ वर्षांवर होतें. नंतर दिवसेंदिवस त्यांचें शरीर अशक्त होत जाऊन पुढें सुमारें दीड वर्षानें त्यांची प्रकृति फार बिघडली. तेव्हां त्यांचे कारभारी व पदरची इतर मंडळी यांनीं त्यांचे कनिष्ट बंधुचे पुत्र नरसिंह खंडेराव यांस दत्तक घेण्याविषयीं त्यांस आग्रह केला; आणि माधवराव नारायण पेशवे हे नाना फडणवीस वगैरे मुत्सद्दी मंडळीसह त्यांचे समाचारास गेले

असतां त्यांनींही तें दत्तविधान करावें असें सांगितलें. तथापि खंडेराव विठ्ठल यांवर शिवाजी विठ्ठल यांचा अत्यंत लोभ होता म्हणून खंडेराव यांस नरसिंहराव जो एकटाच पुत्र होता तो आपण दत्तक घेऊन त्यांचा स्वतःचा वंश खुंटविणें हें आपणास प्रशस्त नाहीं असें शिवाजी विठ्ठल यांस वाटल्यावरून त्यांनीं त्या बाबदींत श्रीमंतांस विनंती केली कीं, " खंडेराव विठ्ठल यांनीं सरकारची पुष्कळ नौकरी केली असून ते सरदारीस योग्य ही आहेत व त्यांस सरदारी मिळावी अशी माझी अंतःकरणपूर्वक इच्छा आहे; हें मालीकांनीं मनांत आणून माझे पश्चात् त्यांसच सरदारीचीं वस्त्रें द्यावीं. तेही वडिलांचे नांवाप्रमाणें सरकारचे सेवेंत तत्पर राहून ती इमानानें करितील. " ही विनंती पेशवे व नानाफडणवीस यानीं कबूल केली; आणि त्यांस सांगितलें कीं, " तुमचे इच्छे-प्रमाणें होण्यास सरकारची बिलकूल हरकत नाहीं; खंडेराव यांस सरदारीचीं वस्त्रें देण्यांत येतील. " याप्रमाणें शिवाजी विठ्ठल यांनीं आपले पश्चात् आपली सरदारी चालविण्याची व्यवस्था लाविल्यावर, पदरचे सर्व कामगारांस बोलावून त्यांस खंडेरावांचे आज्ञेप्रमाणें वागण्याविषयीं उपदेश केला. नंतर श्रावण शुद्ध २ सन १७९४ इसवी (शके १७१५) सालीं त्यांस देवाज्ञा झाली.

शिवाजी विठ्ठल यांस तीन स्त्रिया होत्या. पैकीं ज्येष्ठ स्त्रीस "माईसाहेब" असें म्हणत असत. विठ्ठल शिवदेव जिवंत असतांच त्या बाईचे पोटीं त्यांस दोन पुत्र झाले होते. त्यांपैकीं ज्येष्ठ पुत्राचें नांव अमृतराव असें होतें. परंतु दुर्दैवेंकरून ते ग्वाल्हेरीस असतांच कनिष्ठ पुत्र गणपतराव हे परलोकवासी होऊन त्यांची स्त्री त्यांजबरोबर सती गेली होती. शिवाजी विठ्ठल यानीं गणपतराव यांचे नांवानें ग्वाल्हेर येथें एक बागेंत गणपतीचें मंदीर बांधून त्या देवाचे पूजानैवेद्यासाठीं ग्वाल्हेरगिर्दींतून दररोज एक रुपयाप्रमाणें नेमणूक करून दिली, ती अद्यापि चालत आहे. शिवाय त्यानीं सुवर्णरेखा नदीचे कांठीं, जेथें गणपतराव यांजबरोबर त्यांची

पत्नी सती गेली होती तेथें एक मोठें वृंदावन बांधिलें, तें अद्याप-पर्यंत कायम आहे. शिवाजी विठ्ठल यांचे दुसरे चिरंजीव अमृतराव हे वयांत येऊन योग्यतेस चढले होते; परंतु क्षेत्र मथुरा येथें त्यांस देवाज्ञा होऊन त्यांचीही स्त्री त्यांजबरोबर सती गेली. त्या ठिकाणीं शिवाजी विठ्ठल यानीं एक भव्य शिवालय बांधिलें आहे; व यमुनातीरीं ज्या ठिकाणीं पूर्वीचे युगांत ध्रुवानें तपश्चर्या केली, त्या ठिकाणीं घाट बांधिला आहे. त्यास ध्रुवघाट असें म्हणतात.

शिवाजी विठ्ठल यांची वर लिहिलेली वडील स्त्री माईसाहेब त्यांजबरोबर हिंदुस्थानांतून दक्षिणेंत आली, त्या वेळेस ती पुत्र-वियोगामुळें अत्यंत दुःखी होती; सबब ती विंचुरास न येतां गो-दातीरीं सायखेडें येथें राहिली; आणि ती तेथें उत्तम प्रकारें दान-धर्म करीत असतां तिचा देहांत झाला.

शिवाजी विठ्ठल यांची दुसरी स्त्री उमाबाई हिला दोन कन्या झाल्यावर तीस देवाज्ञा झाली. त्या दोन कन्यांपैकीं एकीचें नांव बहिणाबाई; तीस शिवाजी विठ्ठल यानीं देवासकर पवाराचे कार-भारी सुपेकर यांचे घरीं दिली, व आपले पाटोदे माहालांतील जात सरं-जामाचे गांवांपैकीं धुळगांव जो निम्मे जहागीर होता तो सुपेकरांस इनाम देऊन बाकी निम्मे गांव सरकारखालसा होता तोही त्या इनामास जोडण्याविषयीं पेशवेसरकारांस विनंति केली. ती पेशव्यांनीं कबूल करून एकंदर संपूर्ण गांवाची सनद सुपेकर यांस दिली. सदर्हू गांवाचें वार्षिक उत्पन्न हल्लीं लोकलफंड सु-द्धां १४६७ रुपये आहे. सदर्हू इनामी गांवाचा उपभोग हल्लीं बहिणाबाईचा वंश करीत आहे. दुसरी कन्या साळूबाई ही नगर जि-ल्ह्यांतील शेवगांव तालुक्याचे देशपांडे यांचे येथें दिली होती. त्या बा-ईस एक कन्या झाल्यानंतर देवाज्ञा झाली. ती कन्या अहिल्याबाई साहेब होळकर यांचे खासगी कारभारी खंडो बाबूराव यांचे येथें

दिली होती. त्या बाईचे वंशज नगर जिल्ह्यांत प्रवरा नदीचे कांठीं आकोलें येथें असून त्यांस विंचूर संस्थानांतून नेमणूक व इनाम मिळालें, तें अद्यापि त्यांजकडे चालत आहे.

शिवाजी विठ्ठल यांचे कनिष्ठ पत्नीस ताईसाहेब असें म्हणत असत. त्या बाईस संतति झाली नाहीं. पुढें ती शिवाजी विठ्ठल यांजबरोबर सती गेली.

शिवाजी विठ्ठल यानीं आपल्या आयुष्यांत धर्मकृत्यें केलीं तीं येणें प्रमाणेंः—

त्यानीं प्रयाग येथें यमुनेचे पलीकडे सोमेश्वराचे देवालयानजीक वेणीमाधवाचें मंदीर बांधिलें. तें कोणत्या शकांत व कोणत्या महिन्यांत व कोणी बांधिलें याविषयीं त्याजवर लेख आहे. ह्या देवाचे पूजेबद्दल शिवाजी विठ्ठल यानीं आपले फत्तेआबाद माहालांतून एका कनोजिया ब्राम्हणाचे नांवानें सालिना रुपये १०० ची नेमणूक करून दिली. ती अद्यापि चालत आहे.

क्षेत्र मथुरा येथें वृंदावनांत कुंज आहे. तेथें शिवाजी विठ्ठल यानीं राधामाधवाचें एक मंदीर बांधून, त्याचे लगत एक वाडाही बांधिला आहे. त्या मंदिरांतील मूर्तीचे पूजेबद्दल त्यानीं आपले भीतरवार माहालांतून नेमणूक करून दिली. ती हाल्लीं चालत आहे. त्यानीं मथुरेनजीक एक बाग केला होता तो अद्यापि विंचूरकरांचे कबज्यांत आहे.

नरसिंहपूर येथें विठ्ठल शिवदेव यानीं श्रीनरसिंहाचे देवालयांतील गाभारा बांधिला होता. त्यालगत शिवाजी विठ्ठल यानीं एक मोठा दगडी सभामंडप व पश्चिमेकडील माहाद्वार व त्यावरील नगारखाना हीं कामें पुष्कळ खर्चानें बांधिलीं.

त्यानीं सायखेडें येथें गोदातीरीं एक शिवालय बांधिलें. तें अद्यापि कायम् आहे.

निफाड तालुक्यांत नांदुरानजीक गोदेचे दक्षिणतीरीं ठाणगांवचे हद्दींत त्यानीं गणपतीचें एक मोठें देवालय बांधिलें असून त्याचे पूजेअर्चेबद्दल एक इनाम जमीन दिली. ती अद्यापि चालत आहे

श्रीक्षेत्र काशी येथें त्यानीं भोंसल्यांचें घाटाचे पाठीमागें एक राममंदीर बांधिलें असून त्यास ग्वाल्हेरगिर्दीतून नेमणूक करून दिली. ती अद्यापि चालत आहे; व क्षेत्रमजकुरींच दुर्गाघाटावर एक वाडा बांधिला, तोही अद्यापपर्यंत कायम आहे.

त्यानीं त्रिस्थळी यात्रा मोठ्या खर्चानें केली. त्या वेळेस प्रयागवळ, काशीचे गंगापुत्र व गयेचे गयावळ हे यात्रेकरू लोकांस फार अडवून स्वारी खर्चाची बाब ह्मणून मनास मानेल तसा पैसा घेत होते; परंतु यात्रेकरू लोकांस तशा प्रकारें छळणें हें गैरवाजवी आहे असें शिवाजी विठ्ठल यानीं पाहून, स्वारीबाबेबद्दल प्रत्येक मनुष्यापासून पंधरा रुपयांहून जास्ती घेऊं नये असा नेम करून दिला; त्याप्रमाणें बहुत दिवस वहिवाट चालत होती.

मथुरेनजीक एक सिद्ध पुरुष होते, त्यांस लोक अजगरबावा असें ह्मणत असत. शिवाजी विठ्ठल व त्यांची स्त्री माईसाहेब या उभयतांनीं पुष्कळ दिवस त्यांची सेवा केली आणि पुढें त्यांस आपले छावणींत आणून तेथेंही त्याचप्रमाणें कांहीं वर्षेपर्यंत सेवा केली. पुढें शिवाजी विठ्ठल यांचे कनिष्ठ चिरंजीव अमृतराव हे दक्षिणेंत येऊं लागले त्या वेळेस त्यानीं त्या सिद्ध पुरुषास अंबारींत बसवून येथील नाशिक पंचवटीस आणिलें; आणि तेथें त्यांची उत्तम प्रकारें बरदास्त ठेवून कांहीं दिवस पर्यंत स्वतः त्यांची सेवा केली. त्यांचे सिद्धत्वाविषयीं नाशिक येथें लोकांत असें वर्णन आहे कीं, एके समयीं ते धुनीजवळ पडलेले असतां, धुनीवरील लांकडें पेटून त्यांचे पायाचा कांहीं भाग जळून गेला, तरी त्यानीं बिलकुल चळवळ केली नाहीं. त्या जळण्याची दुर्गंधी जेव्हां

बाहेर गेली तेव्हां ती कोठून येत्ये याचा तपास करीत करीत लोक मठांत शिरले; तों त्या सिद्ध पुरुषाचा पाय जळतांना त्यांचे दृष्टीस पडला. तेव्हां त्यानीं पेटलेला अग्नि एकीकडे केला, आणि त्या जळलेल्या पायास औषधोपचार करून तो बरा केला. पुढें कांहीं वर्षांनीं तो सिद्ध पुरुष समाधिस्थ झाल्यावर अमृतराव यानीं त्याची पुष्कळ खर्चानें समाधि बांधिली, आणि तिजवर देवालय बांधून त्यांत एक लिंग स्थापन केलें. त्या शिवालयाबाहेरील दरवाज्यावर एक शिलालेख स्थपन केलेला आहे, तो येणेंप्रमाणें:—

"श्री लक्ष्मीनृसिंहचरणीं तत्पर अमृतराव शिवदेव उमदे तुल्मुल्क बाहादर विंचूरकर शके १७१० "

शिवाजी विठ्ठल यानीं विंचूर येथें राहाते वाड्यासमूर दगडाचें एक मोठें शिवालय बांधून त्यांत ओंकारेश्वर नांवाचें शिवलिंग स्थापन केलें; तसेंच गांवाबाहेर नदीतीरीं दगडाचें एक शिवमंदीर बांधून त्यांत पातालेश्वर नांवाचें शिवलिंग स्थापन केलें. हीं देवालयें कायम आहेत. या खेरीज त्यानीं गांवा सन्निध राममंदीर व गांवांत मारुतीचें मंदीर अशीं देवालयें बांधिलीं तीं लांकडी आहेत. या देवांच्या पूजानैवेद्याचा खर्च विंचूर संस्थानांतून चालतो. त्यांस स्वतंत्र नेमणुका नाहींत.

खासगी जहागिरींत विंचुरापासून दीड कोसावर कोटमगांव म्हणून एक गांव आहे. तेथें बहुत प्राचीन असें मारुतीचें मोठें जागृत स्थान आहे. त्यास रोकडोबा असें म्हणतात. शिवाजी विठ्ठल यानीं त्या देवाचें मोठें लांकडी मंदीर बांधून त्याची पूजा व नैवेद्य यांचाही बंदोबस्त केला. तो अद्यापपर्यंत चालत आहे.

पाटोदें माहालांत खुद्द पाटोदें येथें रामेश्वर नांवाचें शिवस्थान आहे. त्याजवर मोठें मंदीर बांधिलेलें आहे. त्या देवाचे पूजानैवेद्याबद्दल त्यानीं जमीन दिली, ती अद्यापि चालत आहे.

शिवाजी विठ्ठल यांस आपस्माराची व्यथा होती. त्याबद्दल त्यांनीं पुष्कळ उपचार केले; परंतु कांहीं उपयोग होईना. शेवटीं त्यांस अजगरबावांनीं असें सांगितलें कीं, "एक लक्ष शालिग्राम ब्राम्हणांस दान करावे, म्हणजे ही व्यथा दूर होईल." त्याप्रमाणें शिवाजी विठ्ठल यांनीं लक्ष शालिग्राम दान केल्यावर त्यांचा तो दुर्धर रोग अगदीं गेला.

शिवाजी विठ्ठल यांनीं नानाप्रकारच्या शालिग्रामशिला, बाण, गंडकीशिलेच्या व धातूंच्या नानाप्रकारच्या देवांच्या मूर्ती, त्याचप्रमाणें नानाप्रकारचे संस्कृत ग्रंथ यांचा बहुत द्रव्य खर्च करून संग्रह केला होता; त्यापैकीं अगदीं थोडा भाग आतां विंचूर संस्थानांत कायम राहिला आहे.

गोदातीरीं मौजे सायखेडें येथें शिवाजी विठ्ठल यांनीं पुष्कळ घरें बांधून तीं ब्राम्हणांस दान केलीं; आणि त्या भागास ब्राम्हपुरी असें नांव दिलें. तसेंच आपले सरंजामापैकीं उरपाड माहालांतून त्या ब्राम्हणांचे निर्वाहार्थ वर्षासनें करून दिलीं. तीं पेशवाईअखेरपर्यंत निर्वेध चाललीं. पुढें इंग्रजी अंमल होऊन इंग्रजांनीं उरपाड माहाल खालसा केल्यावर त्यांनीं तीं सर्व वर्षासनें ताहयात केलीं. त्यामुळें तीं आतां बुडाल्यासारखींच झालीं आहेत. शिवाय, त्यांनीं उत्तर हिंदुस्थानांत कितीएक लोकांस आग्रहार व जमिनी दिल्या; त्या अद्यापपर्यंत चालत आहेत. येवलें येथें श्री बालाजीचें संस्थान बहुत प्राचीन आहे. त्या संस्थानांचे पुजारी बहुत योग्य होते. त्या बालाजी देवाची पूजा व नैवेद्य हीं व्यवस्थित रीतीनें चालावीं म्हणून शिवाजी विठ्ठल यांनीं आपले जाहागिरींतील पाटोदें माहालापैकीं मौजे न्याहारखेडें हें गांव त्या देवाच्या नांवानें करून दिलें. त्याचा आकार रुपये ६७ आहे. त्या खेडयाची वहिवाट हल्लीं देवाचे पुजारी करीत असून त्याचे उत्पन्नाचा व्यय त्या देवाकडे करीत आहेत.

शिवाजी विठ्ठल यानीं आपले जातसरंजामांतील येवलें गांवाच्या पेठेंत एक टंकसाळ स्थापून नाणें पाडणें सुरू केलें. त्या रुपयावर तुळसीच्या झाडाचें चिन्ह असून त्यास " नरसिंह शिक्का " असें लोक ह्मणत असत. ही टंकसाळ दक्षिणेंत इंग्रजी अंमल होईतोंपर्यंत चालली.

### शिवाजी विठ्ठल यांच्या स्वरूपाचें व स्वभावाचें वर्णन.

शिवाजी विठ्ठल यांचा रंग काळसर असून त्यांचे शरिराची काठी ठेंगणी होती. ते स्वभावानें शांत, उदार व दयाळु असे होते पण शूरत्वांत कमी नव्हते.

## खंडेराव विठ्ठल यांचें चरित्र.

मागील चरित्राचे अंतीं आम्हीं शिवाजी विठ्ठल विंचूरकर यांचे देहांतासंबंधी मजकूर लिहिला. आतां त्यांचे कनिष्ठ बंधु खंडेराव विठ्ठल यांचें चरित्र लिहिण्यास आम्ही आरंभ करितों.

शिवाजी विठ्ठल यांचे मरणानें त्यांचे आप्तवर्ग, इष्टमित्र आणि पदरची मंडळी यांस दुःख झालें हें सहजीक आहे; परंतु त्यांचे कनिष्ठ बंधु खंडेराव यांजवर त्यांचा अतिशय लोभ असून उभयतां बंधु एकमेकांचा मोठा मान ठेवीत असत, यामुळें खंडेराव यांस जें दुःख झालें तें अनिर्वाच्य होतें. त्यांचे समाधानार्थ व पेशवे यांजकडून उपाध्ये करवे व आप्त राजमाचीकर हे येऊन रीतिप्रमाणें सांत्वनाच्या सर्व गोष्टी झाल्या. त्याचप्रमाणें माहादजी शिंदे यांचे लष्करांतील नामांकित सरदार व मुत्सद्दी जे शिवाजी विठ्ठल यांचे उत्तर हिंदुस्थानांतील परम स्नेही होते, त्यांनींही येऊन त्यांचें समाधान केलें. नंतर खंडेराव यांनीं तुळापूर येथें भीमा आणि इंद्रायणी यांचे संगमावर शिवाजीपंत बापू यांचें उत्तरकार्य केलें. पुढें ते श्रीमंत माधवराव पेशवे यांचे भेटीस्तव पुण्यास गेल्यावर श्रीमंतानीं त्यांस लागलीच सरदारीचीं वस्त्रें देऊन तत्संबंधी मुलुकाच्या सनदाही करून दिल्या. नंतर थोडक्याच दिवसांनीं खंडेराव विठ्ठल हे श्रीमंतांच्या परवानगीनें आपल्या मुलुकाची व्यवस्था करण्यास्तव विंचुरास गेले. तेथें त्यानीं पदरच्या मंडळीचा दरबार करून त्यांत सर्वांबरोबर अश्वासनाचें संभाषण केलें; आणि ज्या कितीएक पदरचे मंडळींवर कारण परत्वें आपली इतराजी झाली होती, त्या सर्वांस क्षमा करून ते पूर्वीं ज्यां ज्यां कामांवर होते त्यां त्यां कामांवर त्यांस कायम केलें. अशा प्रकारें त्यानीं सर्व व्यवस्था करून पूर्ववत् सर्व कामकाज चालू केलें.

नंतर थोडक्याच दिवसांनीं पेशवेसरकार व मोंगलसरकार यांमध्यें बेबनाव झाला; आणि तो वाढत जाऊन शेवटीं त्याची मजल युद्धापर्यंत येऊन पोहोंचली. तेव्हां प्रत्येक मराठे सरदारानें आपले फौजेची तयारी व किल्यांचे बंदोबस्त करण्यास आरंभ केला. त्याप्रमाणें खंडेराव विठ्ठल यानींही पदरचे जुने वाकिफ कारभारी व सरदार यांचे सल्यानें आपले फौजेची तयारी व किल्यांची बंदोबस्ती चालविली. इतक्यांत पेशवे यांजकडूनही त्यांस फौजेची भरती करण्याविषयीं जरूरीचा हुकूम आला. तेव्हां त्यानीं आपले वडील विठ्ठल शिवदेव व बंधु शिवाजी विठ्ठल यांनीं ज्याप्रमाणें कीर्ति मिळविली होती त्याप्रमाणें आपणही ह्या उद्भवलेल्या लढाईंत कीर्ति संपादन करावी अशा उमेदीनें पूर्ण लक्ष लावून फौजेची कडेकोट तयारी केली. परंतु दुर्दैवेंकरून त्या प्रसंगीं त्यांची प्रकृति बिघडली. हें त्यांचें दुखणें दिवसेंदिवस वाढत जाऊन त्याजवर क्षयरोगाचीं चिन्हें दिसूं लागलीं. त्यांचे पदरीं वैद्य चांगले असून औषधोपचारही चालले होतेच; परंतु त्यांस आराम न होता तो रोग असाध्य असें पुष्कळ सुज्ञ लोकांस वाटूं लागलें. इतक्यांत युद्धाचा प्रसंग समीप येऊन पोहोंचला; पुरातन मंत्रीमंडळीपैकीं सखारामबापू, चिंतो विठ्ठल, बाबूराव फडनवीस वगैरे पूर्वीचे अधिकारांतून निघून पेशव्यांचे सर्व दौलतीचा कारभार नाना फडनवीस यांचे हातीं आला होता; कोणतेंही सरकारी काम त्यांचे हुकुमाशिवाय होत नसे; आणि नानांचा स्वभाव दीर्घद्वेषी असून त्यांस जात्याभिमानही विशेष होता; शिवाय दादासाहेब यांचे लोभांतील मंडळीविषयीं त्यांचें अंतःकरण शुद्ध नव्हतें; खंडेराव विठ्ठल हे जरी दादासाहेब यांचे हाताखालीं वागलेले नव्हते, तरी ते विठ्ठल शिवदेव यांचे पुत्र होते येवढ्याच कारणानें त्यांजवर नाना फडनवीस यांचा लोभ नव्हता. या सर्व कारणांस्तव या प्रसंगीं लढाईंत स्वतः सामील होऊन पराक्रम करून दाखविणें

हें खंडेराव विठ्ठल यांस अवश्य कर्तव्य होतें. सबब प्रकृति बिघडलेली असतांही ते आपले फौजेनिशीं पुण्यास हजीर होऊन पेशव्यांचे फौजेबरोबर रणभूमीवर गेले.

वर लिहिलेल्या युद्धाकरितां पेशव्यांचे हुकुमावरून दौलतराव शिंदे, तुकोजी होळकर, रघोजी भोंसले, गोविंदराव गाईकवाड ह्यांचा सरदार, खंडेराव विठ्ठल विंचूरकर, पटवर्धन, रास्ते, राजेबहादर, प्रतिनिधि, पंतसचीव, या शिवाय मराठे मानकरी, निंबाळकर, घाटगे, चव्हाण, डफळे, पवार, थोरात, पाटणकर वगैरे पुणें येथें आपापल्या लष्करांनिशीं येऊन पोहोंचले.

या प्रसंगीं पेशवे अल्प-वयस्क असल्या कारणानें एकंदर सैन्याचा मुख्य सेनापती कोणास करावें याचा विचार करण्यास्तव नाना फडनवीस यानीं मुत्सद्दी लोक जमा केले. त्या कचेरींत बोलणें चाललें असतां त्यांत दौलतराव शिंदे यांस मुख्य सेनापती करण्याचा उपक्रम निघाला; परंतु शिंद्यांचे लष्करांत जी शेणवई मंडळी प्रमुख होती त्यांविषयीं नानांचें अंतःकरण शुद्ध नव्हतें; ह्मणून दौलतराव हे अल्पवयस्क असून अनुभवलेले नाहींत याकरितां त्यांस तो अधिकार देणें रास्त नाहीं, असें त्यांचें ह्मणणें पडलें. तेव्हां हा अधिकार चालविण्यास तुकोजी होळकर नेमावे अशी कित्येक मुत्सद्यांची सल्ला पडली. परंतु होळकर यांस तो अधिकार दिला तर शिंद्यांचे पदरची शेणवई मंडळीही मोठी मानी असून तिजकडे शिंद्यांचे लष्करी अधिकार आहेत यामुळें चांगला परिणाम न होतां उलटी स्पर्धा मात्र वाढेल असें नानांनीं सांगितलें. त्याजवर रघुजी भोंसले हे चांगले अनुभवलेले व शूर असल्यामुळें त्यांस तो अधिकार द्यावा असें कित्येकांचें ह्मणणें पडलें; परंतु असें केल्यानें शिंदे व होळकर हे नाखूष होतील असें पुष्कळांनीं बोलून दाखविलें; सबब तो अधिकार प्रतिनिधीस द्यावा अशी हरीपंत फडके यानीं सूचना केली. परंतु त्या वेळचे प्रतिनिधी युद्धकर्मांत अनुभवलेले नव्हते, सबब पेशव्यांचें हुजूर

वागणाऱ्या सरदारांपैकींच कोणास तरी तो अधिकार द्यावा असा विचार निघाला. त्या वेळेस कांहीं जणांनीं विंचूरकर यांचें नांव घेतलें; परंतु तेही नुकतेच सरदारीवर कायम झालेले असून अ-जारी होते सबब आणखी कोणास तरी तो अधिकार दिला पाहिजे असें नाना फडनवीस यांस वाटून शेवटीं परशुरामभाऊ पटवर्धन हे मोठे जवांमर्द असून त्यानीं बहुत रणसंग्राम पाहिले आहेत या-करितां त्यांसच तो अधिकार द्यावा असा त्यानीं ठराव केला. त्यावरून सदहू जमलेल्या सरदारांपैकीं कित्येक सरदार कुर-कुर करूं लागले. हें वर्तमान नाना फडनवीस यांस कळल्यावर त्यानीं सर्वांच्या छावण्यांत जाऊन त्यांच्या समक्ष भेटी घेतल्या, आणि त्यांस योग्य कारणें दाखवून सर्वांचें समाधान केलें. त्याप्रमाणेंच त्यानीं खंडेराव विठ्ठल यांजकडे येऊन त्यांस असें सांगितलें कीं, "आपली प्रकृति दुरुस्त नस-ल्यामुळें लढाईंत जाण्यास आपणांस सामर्थ्य नाहीं, सबब मी मुख्य सरदारी परशुरामभाऊ यांजकडे सांगितली आहे. आपण रणांग-णांत बहुत तसदी न घेतां चिमणाजी खंडेराव व बाबूरावनाना कोटमगांवकर यांजकडे लढाईचा अधिकार सोंपून देऊन स्वतः दे-खरेख मात्र करीत जावी." पुढें थोडक्याच दिवसांनीं सरकार स्वारी सोलापूरपर्यंत जाऊन निजामाशीं लढाई सुरू झाली. या लढाईचा इतिहास बहुतकरून सर्वांस माहित आहेच. सबब त्याची सविस्तर हकीकत या चरित्रांत लिहिण्याची अवश्यकता दिसत नाहीं. तथापि इतिहासाचा क्रम खंडित न दिसण्याकरितां तिचा सारांश मात्र येथें देतों.

निजामाची फौज मोठी व कडवी असून तिजवरील सरदारही अनुभवलेले व शूर असे होते; यामुळें पेशव्यांचे आघाडीचे टो-ळीचा हल्ला त्यांनीं तेव्हांच परतविला. नंतर दुसरा हल्ला झाला त्यांतही मोगलांनीं शौर्येकरून पेशव्यांचे फौजेचें कांहीं चालूं दिलें नाहीं. तेव्हां नाना फडनवीस यांस मोठी फिकीर प्राप्त झाली; प-

रंतु शिंदे यांजकडील कवाइती फौजेवरील सरदार जिउबादादा यानें असें सांगितलें कीं, "आपण स्वस्थ असावें; मी आतां काय कारामत करितों ती पाहावी." असें बोलून तो सरदार आपले छावणींत परत गेला. तेथें त्याची लढण्याची तयारी होतीच. मग त्यानें मान्याचे जाग्यावर तोफा चढवून तेथून निजामांचे फौजेवर गोळा चालू केला. निजामांचे फौजेंतील कवाइती पलटणें रेमंड नांवाचे फ्रेंच सरदाराचे हाताखालीं होतीं. त्या फ्रेंच सरदारानें पेशव्यांकडील कवाइती फौजेचा गोळा ओळखून, ज्या बाजूस शिंद्यांच्या तोफा लागल्या होत्या त्या बाजूस जाऊन त्या तोफांवर आपले कवाइती तोफखान्याचा गोळा सुरू केला. परंतु शिंद्यांचे कवाइती फौजेवरील पीनर नांवाचा सरदार यास लढाई लांबविणें प्रशस्त न वाटून त्यानें असें मनांत आणिलें कीं, खुद्द निजामांस रणांतून पळ काढण्यास लाविलें ह्मणजे त्यांची फौज धर धरणार नाहीं. यास्तव ज्या ठिकाणीं तो हत्तीवर अंबारींत बसला होता, तेथें त्यानें पांच गोळे नेमानें मारिले. ते जरी निजामास लागले नाहींत, तरी तो हत्ती घाबरून माघारा पळून गेला. तें पाहून त्याचे सर्व फौजेस भीति उत्पन्न होऊन तीही पळून गेली. इतक्यांत मराठे स्वारांनीं हल्ला करून त्यांचे सैन्याची पुष्कळ कत्तल उडविली. निजामानीं खरडे गांवाचा आश्रय करून त्याच्या वेशी बंद केल्या; तों सायंकाळ होऊन अंधार पडला, सबब लढाई बंद झाली. दुसरे दिवशीं सकाळीं मराठे स्वारांनीं पुनः चाल केली, तों निजामांची फौज पळून गेली होती. त्या लोकांनीं तोफा व दारूगोळा वगैरे सामान टाकून दिलें होतें तें या स्वारांनीं ताब्यांत घेऊन पुढें चाल केली. इतक्यांत निजाम खरडे गांवच्या वेशी बंद करून आंत राहिले आहेत असें त्यांस कळलें. तेव्हां त्यांनीं त्या गांवास वेढा घालून त्यावर दोन दिवसपर्यंत तोफा चालविल्या. शेवटीं निजामानीं जेर होऊन पेशव्यांकडे तहाचें बोलणें बोलण्यास वकील पाठविला. तेव्हां पेशव्यानीं त्यांस तहाच्या शर्ती कळविल्या त्या येणेंप्रमाणें:—

१. तुमचे मुख्य वजीर मषीर उलमुल्क यानीं आमचे वकीलांबरोबर भर दरबारांत आमचे मुख्य दिवाण नाना फडनवीस यांविषयीं बेआदबीचें भाषण केलें आहे त्याचा बदला मिळण्यास्तव त्यांस प्रथम आमच्या हवालीं करावें.

२. पूर्वी सदाशिवरावभाऊसाहेब यानीं उदगीर येथील तहांत जो पासष्ट लक्षांचा मुलुक तुह्मांपासून घेतला होता तो तुह्मांस परत मिळाला आहे तो आमचा आह्मांस द्यावा.

३. तुमच्या मुलकाची मर्यादा परंड्यापासून उत्तरेस तापीपर्यंत आहे त्यांतील कांहीं मुलुक दौलताबादेचे किल्यासह आम्हांस द्यावा.

४. आमचे तीन कोट रुपये तुह्मांकडे बाकी येणें आहेत तें आम्हांस रोख द्यावे.

५. रघुजी भोंसले यांचे गंगथडी प्रांतांतील घासदाण्याबद्दल एकुणतीस लक्ष रुपये तुम्हांकडे बाकी राहिली आहे ती तुम्हीं त्यांस रोख द्यावी, आणि भोंसले यांनीं गंगथडींत पुनः घास दाणा न मागावा, याकरितां त्यांस दरसाल तीन लक्ष आठ हजार रुपये उत्पन्नाचा मुलूक द्यावा.

६ वऱ्हाडांत जो तुमचा मुलूक आहे त्याचा वसूल तुम्हीं पूर्वीच्याचालीप्रमाणें घेत जावा.

७. या लढाईसंबंधी आमचा सर्व खर्च तुम्हीं भरून द्यावा.

पहिली शर्त खेरीज करून बाकीच्या सर्व शर्ती कबूल करण्याचें निजामांस जड वाटलें नाहीं; परंतु मषीर उलमुल्क यांस पेशवे यांचे स्वाधीन करण्याची मात्र त्यांस पंचाईत पडली. त्या समयीं मषीर उलमुल्क हे निजामास ह्मणाले कीं, "खुदावंद! या तहांत पेशवे यानीं कांहीं अमर्याद मागितलें नाहीं. मला त्यांचे स्वाधीन करण्यास आपण बिलकुल मागें पुढें पाहूं नये. मी त्यास राजी आहें." असें बोलून आपल्यास नेण्याकरितां जी मराठे स्वारांची

टोळी आली होती तिजबरोबर ते चालते झाले. नंतर तहनामा पुरा झाला.

या लढाइंत पेशव्यांकडील फौजेचें विशेष नुकसान झालें नाहीं. परंतु निजामांकडील फौजेचें नुकसान बरेंच झालें असें म्हणण्यास चिंता नाहीं. कारण, त्या लढाईंत निजामांकडील जे मोठमोठाले सरदार पडले त्यांच्या कबरा खरडे गांवाच्या उत्तरेस कायम आहेत; त्यांची संख्या सुमारें दोन हजारावर होईल. या वरून शिपाई किती पडले असावे हें सहज अनुमान करितां येईल. ही लढाई तारीख ११ माहे मार्च सन १७९५ इसवी रोजीं झाली.

खडर्याचे लढाईंत खंडेराव विठ्ठल यांजकडून विशेष लिहिण्यासारखी गोष्ट झाली नाहीं. कारण ती लढाई बहुत दिवस न चालतां लवकरच समाप्त झाली. बहुतेक सरदारांस व फौजेसही त्या लढाईचे संबंधानें विशेष आयास पडले नाहींत. तथापि खंडेराव विठ्ठल हे पूर्वींच दुखणेकरी असल्यामुळें त्या लढाईंत जे त्यांस कांहीं थोडे श्रम झाले त्यापासून त्यांची प्रकृति जास्त बिघडली. ती लढाई संपल्यावर मराठी फौज पुण्यास परत जाऊं लागली, तेव्हां खंडेराव यांस प्रकृतीचा भरंवसा वाटेना; सबब त्यांनीं नाना फडनवीस यांस कळवून खडर्यापासून पंचवीस तीस कोसांवर नरसिंहपूर क्षेत्रीं आपले कुलस्वामीचे दर्शनाकरितां जाण्याविषयीं श्रीमंतांची आज्ञा घेतली; आणि ते लागलेच नरसिंहपुरास जाऊन दाखल झाले. तेथें कांहीं दिवस राहून औषधोपचार व ईश्वरसेवा बहुत केली. परंतु दिवसेंदिवस त्यांची प्रकृति जास्तच बिघडत चालली. तेव्हां त्यांनीं पुष्कळ पैसा खर्च करून दानधर्म व ब्राम्हणभोजनें वगैरे धर्मकृत्यें बहुत केलीं. शेवटीं एके दिवशीं प्रकृति अतिशय बिघडलीशी वाटली तेव्हां त्यांनीं चिमणाजी खंडेराव, बाबूरावनाना कोटमगांवकर, बाळोबाबाबा सालकाढे कारभारी, वगैरे पदरची मंडळी जमा करून आपले पुत्र नरसिंहराव आपलेजवळ बोलाविले आणि त्यांचे हात त्या कारभारी मंडळीचे हातांत देऊन, "आतां

माझे ठिकाणीं या मुलास तुम्हीच आहां " असें सांगून, वैशाख शुद्ध ६ रोजीं ते वैकुंठवासी झाले. नंतर त्यांचे पुत्र नरसिंह राव यानीं आपले वडिलांचें उत्तरकार्य भीमा आणि निरा या संगमतीर्थीं उत्तमप्रकारें केलें. खंडेराव विठ्ठल यांचे मरणानें त्यांचे पुत्रास व पदरचे मंडळीस फार दुःख झालें. त्यांस सरदारीचीं वस्त्रें मात्र मिळालीं होतीं; परंतु त्याचा उपभोग त्यानीं कांहींच केला नाहीं, कां कीं, त्या वेळेपासून दाहा महिन्यांचे आंतच त्यांचा अंतकाळ झाला. त्या दहा महिन्यांतूनही बहुत दिवस प्रकृतीचे बेआरामींतच गेले. त्यामुळें तर त्यांचे चिरंजीवास व पदरचे मंडळीस फारच दुःख वाटलें.

खंडेराव विठ्ठल यांची प्रथम स्त्री निवर्तल्यावर त्यानीं दुसरें लग्न केलें. त्या बाईचें नांव गंगाबाई. तीस एक पुत्र झाला; त्याचें नांव नरसिंहराव असें होतें.

खंडेराव विठ्ठल हे चिटणिशी व जमाखर्ची लिहिण्यांत फार हुषार असून मोठे मुत्सद्दी होते. शिवाय ते संस्कृत शिकलेले असून नवीन संस्कृत कविता करण्याचेंही त्यांस चांगलें अंग होतें.

त्यांस सरदारीचीं वस्त्रें मिळाल्यावर ते बहुत दिवस वांचले नाहींत, म्हणून त्यांचे हातून विशेष लिहिण्याजोगें एकादें धर्मकृत्य घडलें नाहीं. फक्त विंचुराजवळ एक कोसाचे अंतरावर एका टेंकडीवर देवीचें प्राचीन स्थान आहे, त्याजवर त्यानीं देवालय बांधिलें. या देवीस कोणजाई असें म्हणतात.

खंडेराव यांचा वर्ण गोरा असून ते सुस्वरूप होते. त्यांची अंगकाठी उंच होती, व त्यांचा स्वभाव रागीट आणि खुनशी असे, तथापि त्यांचे हातून कोणाचें कधींही नुकसान झालें नाहीं.

---

# नरसिंह खंडेराव यांचें चरित्र.

खंडेराव विठ्ठल यांचे चिरंजीव नरसिंह खंडेराव यांस सरदारीचीं वस्त्रें मिळण्याकरितां त्यांचे वडिलांचे कारभारी चिमणाजी खंडेराव व बाळोबा बाबा सालकाडे यांनीं पुण्यास जाऊन प्रथम नाना फडणीस यांची भेट घेतली आणि त्यांस खंडेराव विठ्ठल परलोकवासी झाल्याचा मजकूर श्रुत करून नरसिंह खंडेराव यानीं त्यांस दिलेलें पत्र त्यांचे स्वाधीन केलें. तेव्हां नाना म्हणाले कीं, "खडर्चाचे लढाईपूर्वी मीं त्यांची प्रकृति पाहिली होती; त्या वेळेसच मला तिचें मान बरें दिसलें नाहीं, आणि वैद्य मंडळीनींही ती असाध्य असल्याचेंच मला कळविलें होतें. ईश्वरसत्तेस उपाय नाहीं; असो; शाहू माहाराजांनीं विठ्ठल शिवदेव यांस बाजीरावसाहेब पेशवे यांचे पदरीं घातल्यासारखें त्यांनीं व त्यांचे पुत्रांनींही सरकारचाकरी योग्य रीतीनें करून वाहवा मिळविली यांत संशय नाहीं; तेव्हां आतां विंचुरकरांची दौलत व सरदारी यांविषयीं सरकारास योग्य विचार केलाच पाहिजे. नरसिंहपुरास जाण्याचे वेळेस खंडेराव हे माझा निरोप घेण्यास आले, तेव्हां नरसिंहरावही हे त्यांजबरोबर होते. त्यावेळेस त्यांची चलाखी व हुशारी पाहून मला बहुत संतोष वाटला. असो; आतां त्यांस श्रीमंतांचे दर्शनार्थ लवकर घेऊन यावें. सरकार त्यांस सरदारीचीं वस्त्रें सत्वर देतील." याप्रमाणें सांगून नानांनीं उभयतांस निरोप दिला. नंतर चिमणाजी खंडेराव हे सनदा तयार करण्याचे कामीं मदत लागल्यास ती करण्याकरितां पुण्यास राहिले आणि बाळोबा बाबा हे नरसिंगराव यांस पुण्यास आणण्याकरितां नरसिंहपुरास गेले. नरसिंहराव हे आपला कुलस्वामी नरहरी यास नमस्कार करून त्याजबरोबर पुण्यास निघून गेले. तेथें नानांची भेट झाल्यानंतर त्यांचे विद्यमानें नरसिंहराव यांणीं श्रीमंतांची भेट घेतली. नरसिंहराव यांस पाहून श्रीमंत बहुत खुष झाले; आणि त्याच

दिवशीं त्यांनीं पूर्वीप्रमाणें त्यांस सरदारीचीं वस्त्रें व मुलकांच्या सनदा दिल्या. या सनदा देते वेळेस नाना फडणीस म्हणाले, का " जरी तुमची उमर बारा वर्षांहून जास्त नाहीं, तरी तुमचे वडिलांची स्वामिनिष्टा व इमानदारी यांजवर नजर देऊन श्रीमंतांनीं हा अधिकार तुम्हांस दिला आहे. या करितां तुम्हीं पदरचे जुने मंडळीचे विचारें वागावें आणि सरदारीस योग्य असा विद्याभ्यास करून लवकरच सरकारची नोकरीस स्वतः बजावण्यास समर्थ व्हावें. तुम्ही दौलत संभाळण्यास योग्य व्हाल तोंपर्यंत बंदोबस्ताची सर्व जोखीम चिमणाजी खंडेराव व बाळोबा बाबा यांजवर ठेवली आहे. " असें बोलून नानांनीं त्यांस रजा दिली.

नरसिंहराव कारभारी मंडळीसह विंचूरास परत गेल्यावर त्यांनीं सर्व मानकरी व पदरची मंडळी जमा करून ज्यांचीं कामें त्यांनीं करण्याविषयीं हुकूम दिला. तेणेकरून सर्व व्यवस्था पूर्ववत् चालू झाली. पुढें लवकरच कारभारी यांनीं नरसिंहराव यांस शिपाईगिरीचे कामांत हुशार करण्यासाठीं, गोपाळराव पटाईत नामें गृहस्थास त्यांचे शिक्षक नेमिलें. हा मनुष्य घोड्यावर बसण्यांत, भाला व तलवार चालविण्यांत, व शिपाईगिरीचे इतर सर्व कामांत मोठा प्रवीण होता. शिवाय त्यांस लिहिणें वाचणें वगैरे कारकुनीचें काम शिकविण्यास देवबा भाऊ या नांवाचा एक चांगला इमानी कारकून यास नेमिलें; खेरीज संस्थानचे कारखान्यांत एक मुनषी होता, त्यास त्यांजला फारशी भाषा शिकविण्यास नेमिलें. तसेंच त्यांस वेद वगैरे ब्रह्मकर्मसंबंधीं सुशिक्षा देण्यास केशवभट मोघे ह्मणून संस्थानचे एक आश्रित ब्राह्मण यांची योजना केली; याप्रमाणें कारभारी यानीं नरसिंहराव यांस हुशार करण्याची सर्व व्यवस्था केली; आणि कोणते समयीं कोणते विद्येचा अभ्यास करावा त्याच्या वेळा नेमून देऊन त्यांजवर सर्व प्रकारें देखरेख करण्यास व हमेषा त्यांचे शरीर प्रकृतिची वगैरे व्यवस्था पाहाण्यास त्र्यंबक येथील राहा-

णार काशीपंत बाबा जोगळेकर यांस नेमिलें. हे गृहस्थ त्या वेळेस संस्थानांत नुकतेच नोकर राहिले होते; परंतु पुढें त्यांनीं इमानानें वर्तन केल्यावरून त्यांस, बाळोबा बाबा यांचे हाताखालीं संस्थानचे तर्फेनें पेशव्यांचे दरबारांतील वकील, असा अधिकार प्राप्त झाला. सांप्रत त्यांचे चिरंजीव नारायणराव जोगळेकर हे त्र्यंबक येथील देवाचे संस्थानावर कारभारी आहेत. ह्यांचे वडील काशीपंत बाबा यांस विंचूरचे संस्थानांतून जें उत्पन्न मिळत होतें, त्याचे ऐवजी हल्लींचे संस्थानचे मगदुराप्रमाणें इनाम व सनदी जमीन मिळून सुमारें ४०० रुपयांचें उत्पन्न चालत आहे. असो; वर सांगितल्याप्रमाणें नरसिंहराव यांचे विद्याभ्यासाची व्यवस्था केल्यानें त्यांचा अभ्यास उत्तम प्रकारें चालू लागला.

चिमणाजी खंडेराव दिवाण हे अशक्त झाल्यामुळें त्यांनीं नाना फडणवीस यांचे परवानगीनें बाळोबा बाबा ह्यांजकडे आपलें काम सोंपून दिलें. त्यावेळेस शिवाजी विठ्ठल यांची ज्येष्ठ स्त्री माईसाहेब सायखेड्यास होती. तीस भेटण्याकरितां नरसिंह खंडेराव हे मातुश्रीसह पुढें लौकरच सायखेड्यास गेले. चिमणाजी खंडेरावही त्यांजबरोबर जाऊन त्या वृद्ध बाईस भेटले. नरसिंह खंडेराव यांस माईसाहेबांनीं पाहिलें तेव्हां त्यांस मागील काळाचें स्मरण होऊन त्यांनीं नरसिंहराव यांस पोटाशीं धरिलें, आणि " आपले वंशांत पुष्कळ पुरुष झाले असून आतां त्यांचा अंकुर ह्मणून तूंच एकटा राहिला आहेस ईश्वर तुझें कल्याण करो, " असें बोलून त्या फार कष्टी झाल्या. अस्तु! मग त्यांनीं नरसिंहराव यांस कांहीं दिवस आपले जवळ ठेवून घेतलें. पुढें नरसिंहराव हे त्यांची रजा घेऊन विंचूरास गेले; परंतु त्यांची मातुश्री माईसाहेबांजवळच राहिली. त्यांस पुढें थोडे दिवसांनीं तेथें देवाज्ञा झाली. नरसिंगराव विंचूरास आल्यावर, उत्तर हिंदुस्थानचे माहालां संबंधीं कामकाज पाहाण्यास विंचुराहून एक हुषार मनुष्य नेमून पाठविणें जरूर पडलें. त्यावरून त्यांनीं मशिदीचें रांजणगांव ये-

थील गणेश राजाराम नांवाचे मनुष्यास तिकडे पाठवून त्याजकडे मुलुकाचा वसूल, शिंद्याचे तैनातीस ठेविलेल्या पागेची सरदारी, आणि शिंद्यांचे दरबारांतील वकीली इतके अधिकार सांगितले. या मनुष्यावर पुढें थोडक्याच दिवसांनीं दौलतराव शिंदे यांची मेहेरबानी होऊन त्यांनीं त्यास मोठ्या योग्यतेस चढविलें.

पुढें भाद्रपदमाशीं नरसिंहराव हे पुण्यास दसऱ्याकरितां फौजेनिशीं गेले. ह्यावर्षीं सर्व सरदारांनीं त्या सणाकरितां आपापल्या फौजेची उत्तम प्रकारची तयारी केली होती, कारण थोडकेच महिन्यांपूर्वीं पेशवे यांनीं खर्डें येथें मोघलाचा मोड करून जो मोठा जय मिळविला होता त्याबद्दल त्या सणाचे दिवशीं आनंद प्रदर्शित करण्याचा बेत ठरला होता. पेशवेसरकारचे फौजेचीही उत्तम प्रकारची तयारी झाली होतीच. दसऱ्याचे दिवशीं श्रीमंतांची स्वारी सीमोलंघनास निघाली त्यावेळेस तिचा थाट केवळ युद्धाचे अपूर्व तयारीचा होता. तो पाहून पुण्यांतील लोक अशी कल्पना करूं लागले कीं थोडकेच दिवसांत पेशवे काबूलावर स्वारी करून पानिपतचे पराजयाबद्दल आफघान लोकांचा सूड घेतील; परंतु ती कल्पना सर्वप्रकारें व्यर्थ झाली, कारण संपूर्ण मराठीराष्ट्राचे दुर्दैवामुळें पुढें लवकरच पुणें येथें अकल्पित व अत्यंत दुःखाची अशी एक गोष्ट घडली. तेणेंकरून ज्याप्रमाणें दीप मालवला म्हणजे एकदम चोंहीकडे अंधःकार होतो तद्वत सर्वांचे मनांतील उत्छाह व उमेदी एकदम नष्ट झाल्या! ती गोष्ट अशी कीं, श्रीमंत माधवरावसाहेब यांचें मन कांहीं दिवसांपासून कितीएक कारणांनीं अगदीं उदास झालें होतें; आणि त्या ऊदासीनतेचे भरांत त्यांनीं एके दिवशीं शनवारचे वाड्यांत गच्चीवरून खालीं चौकांत उडी टाकिली. तेणेंकरून त्यांचे हातांपायांस मोठ्या जखमा होऊन कारंजाची नळी त्यांचे मांडींत शिरली. पुढें दोन दिवसांनीं त्यांस त्यामुळेंच देवाज्ञा झाली.

या संधीस पुणें येथें व संपूर्ण महाराष्ट्र देशांत नाना प्रकारचीं राजकारणें झालीं; त्यांचा विस्तार या चरित्रांत लिहिणें अप्रासंगिक

आहे असें वाटतें. यास्तव तसें न करितां थोडक्यांत असें दर्शविलें कीं, पुष्कळ वालमेली होऊन शेवटीं शिंदे यांचे मदतीनें दादासाहेब पेशवे यांचे चिरंजीव बाजीराव हे पेशवाईचे गादीवर कायम झाले. ही गोष्ट तारीख ४ डिसेंबर सन १७९६ इस्वी रोजीं घडली.

नंबर नाना फडनवीस, दौलतराव शिंदे, परशुराम भाऊ पटवर्धन, बाजीराव साहेब पेशवे, शिंद्यांचे दिवाण बाळोबा तात्या, जिवबादादा व लखोबादादा वगैरे मुत्सद्दी मंडळीमध्यें अनेक प्रकारचीं राजकारणें व उलाढाली झाल्या. तेणेंकरून पेशव्यांचे राज्यास बळकटी न येतां, थोरले शिवाजी माहाराज यानीं मराठी राज्याचा मजबूत पाया घालून त्यावर जी मोठी भव्य इमारत रचली होती व जी थोरले बाजीराव, नाना साहेब व थोरले माधव राव पेशवे यांनीं शिखरास पोहोंचविली होती, त्या इमारतीस खणती लागून ती जमीनदोस्त होण्याचीं चिन्हें सूज्ञपुरुषांस दिसूं लागलीं.

वर लिहिलेल्या उलाढाल्यांत विंचूरकर यांचे कारभारी यांनीं आपले मालिक अज्ञानावस्थेंत आहेत असें पाहून कोणतेही राजकारणांत न शिरतां अगर कोणाचेही पक्षास न मिळतां एकनिष्टेनें वर्तन केलें; आणि ज्या ज्या वेळेस त्यांस पेशवे यांजकडून लष्करी कामगारीवर जाण्याविषयीं हुकूम झाले त्या त्या वेळेस त्या कामगाऱ्या इमानदारीनें बजावून कोणतेही सरकारी मुत्सद्याशीं किंवा सरदाराशीं न बिघडतां सर्वांचीं मनें खुष ठेविलीं. सारांश, ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं विंचूर संस्थानचे कारभारी यांनीं मोठ्या चातुर्यानें वर्तन केलें ही गोष्ट त्यांस मोठी भूषणास्पद होय.

याच प्रमाणें सन १७९७ इसवी सालीं तुकोजी होळकर यांचा देहांत झाल्यानंतर किती एक राज्यकारणें व तंटेबखेडे झाले; त्याशींही विंचूरकर घराण्याचा अगर त्याच्या पदरच्या कामगारांचा मुळींच

संबंध नव्हता, सबब या चरित्रांत त्याविषयीं कांहींच न लिहितां त्या अविचाराच्या तंटयाबखेडयामुळें मराठयांचें राज्य दुर्बल होण्यास जीं मुख्य कारणें झालीं त्यांची हकीकत मात्र पुढें थोड-क्यांत लिहितों.

तुकोजी होळकर यांस दोन औरस पुत्र होते. त्यांचीं नांवें काशीराव व मल्हारराव: याशिवाय दोन दासीपुत्र होते; त्यांचीं नांवें यशवंतराव व विठुजी अशीं होतीं. काशीराव हे मनानें व शरीरानें दुर्बल होते; परंतु मल्हारराव हे हरएक प्रकारें आपले घराण्याचें ऐश्वर्य संभाळण्यास योग्य झाले असतां, त्या उभयतां बंधुंमध्यें लवकरच तंटा उपस्थित झाला. त्यांत दासी-पुत्रांनीं मल्हाररावांचा पक्ष स्वीकारला. नंतर थोडकेच दिव-सांनीं मल्हारराव हे आपले वडील बंधूच्या लष्करांतून थोडया फौजेनिशी निघून पुण्यानजीक भांबुर्डे येथें जाऊन राहिले. त्यांस नानाफडनवीस यांची आंतून मदत होती. त्यांस कैद करण्या-स्तव काशीराव यांनीं सिंदे यांजपाशीं मदत मागितली. हें मा-गणें सिंद्यांस अपेक्षित होतेंच, सबब त्यांनीं त्यांस पकडण्यास्तव लागलीच फौज पाठविली. त्या फौजेनें मल्हारराव यांस पकड-ण्याचा यत्न केला. परंतु आपले बचावाकरितां त्यांनीं जिवा-वर उदार होऊन बिकट लढाई केली; तत्रापि ते शेवटीं मारले गेले; परंतु त्यांचे पुत्र खंडेराव हे सिंद्यांचे हातीं लागले असतां, त्यांनीं त्यांस कैदेंत ठेविलें. हें पाहून मल्हारराव यांचे दोघे कम-सल बंधू निरनिराळे ठिकाणास पळून गेले. पैकीं यशवंतराव नागपुरास व विठोजी कोल्हापुरास, असे गेले. काशीराव हे सरदारी चालविण्यास अयोग्य असल्यामुळें होळकरांचें घराणें कांहीं वर्षेंपर्यंत सिंद्यांचे दयेवर अवलंबून राहिले.

याकाळीं संपूर्ण महाराष्ट्र देशांत निर्नायकी झाली असून बंड-वाले स्वारांच्या टोळ्यांनीं चोहोंकडे लूटालूट चालविली होती. या बंडवाल्या टोळ्यांपैकीं एक टोळी बाळकृष्ण गंगाधर कानडे यांचे

हाताखालीं होती. तींत विठुजी होळकर सामील होते. त्या बं-
डखोर टोळीवर पेशव्याकडून गणपतराव पानशे हे गेले असून
त्यानीं बंडवाल्यांचा मोड़ही केला; आणि विठुजी होळकर यांस
कैद करून पुण्यास नेलें. तो गुन्हा मराठे लोकांचे रीतीप्रमाणें मर-
णाचे शिक्षेस पात्र नव्हता; तत्रापि बाळोजी कुंजर म्हणून शेवटचे
बाजीराव पेशवे यांचे कृपेंतील एक शिलेदार होता, त्याचे सूत्र-
नेवरून त्यानीं त्यांस हत्तीचे पायाशीं बांधून जिवें मारविण्याचा
ठराव केला.

विठुजी हे एक मोठ्या नामांकित लष्करी सरदाराचे वंशांती-
ल पुरुष होते, म्हणून त्यांस एक सामान्य मनुष्याप्रमाणें अघोर
मरणाची शिक्षा देणें वाजवी नाहीं असें नरसिंह खंडेराव विंचू-
रकर यांस वाटल्यावरून ते ती शिक्षा रहित करविण्यासाठीं श्री-
मंतापाशीं रदबदली करण्यास निघाले. तेव्हां त्यांचे कारभारी
बाळोबाबावा यानीं त्यांस आडवे येऊन, " श्रीमंतांची मर्जी एक
प्रकारची आहे या करितां आपण या खटपटींत पडूं नये, कारण
यापासून आपला मान राहील असें मला वाटत नाहीं " अशी
त्यांस सूचना केली; परंतु त्या सूचनेकडे लक्ष न देतां, ते पुढें
चालते झाले. तेव्हां कारभारी मौसूफ यांस त्यांजबरोबर अर्थातच
जाणें भाग पडलें. नरसिंगराव श्रीमंताजवळ पोहोंचल्यावर श्रीमंत
त्यांस ह्मणाले कीं, " नरसिंव्हराव! सरदार लोकांची भेटीस येण्या-
ची ही वेळ नव्हे. असें असतां, तुम्ही या वेळेस आला याचें कारण
काय ? तेव्हां नरसिंहरावांनीं विनंती केली कीं, " एक थोर सर-
दाराच्या एका वंशजास साधारण अपराध्याप्रमाणें अघोर मरणाची
शिक्षा देण्याचा हुजुरांत ठराव झाला आहे असें मी ऐकतों. सर
दार लोकांस अशा भारी शिक्षा देण्यांत येतील तर सरदार व
शिपाई लोक नाखुष होतील. या करितां विनंती इतकीच आहे
कीं, विठोजी होळकर यांस मरणाची शिक्षा न देतां पाहिजे तर
कैदेंत ठेवावें. " त्याजवर श्रीमंत म्हणाले कीं, " जें करणें तें

सरकार विचारानेंच करील. तुम्हांस याची फिकीर कशास पाहिजे ? " श्रीमंतांच्या ह्या बोलण्यानें नरसिंगराव यांस जरा रोष आला, सबब ते पुढें कांहींच न बोलतां तेथून निघून खालचे मजल्यावर आले. तेथें त्यांस बाळोजी कुंजर सहजी सहज भेटला असतां, त्यासही नरसिंहराव बोलले कीं " होळकरांचे वंशांतील एक पुरुषास उद्दईक अघोर मरणाची शिक्षा होणार असें मी ऐकतों. तुह्मी श्रीमंतांचे मसलतींत असून अशा अनुचित गोष्टी कशा होतात ? " तेव्हां कुंजर ह्मणाले कीं, " हीं कामें शिपाईगिरीचीं नसून राज्याचे बंदोबस्ताची आहेत; याकरितां आपण यांत दखल देऊं नये. " कुंजराच्या त्या बोलण्यानें नरसिंहराव यांस अधिकच त्वेष चढून त्यांचा चेहेराही बदलला; परंतु बाळोबाबावा त्यांजबरोबर होतेच. त्यानीं त्यांची समजूत करून त्यांस माघारें नेलें. बाळोबाबावा यानीं आपल्या बंधूस विंचूरास पत्र पाठविलें त्यांतील तिसरे कलमांत वरील हकीकत लिहिली होती. ती येणेंप्रमाणेः—

आपले धनी अन्यां* साहेब यांची प्रकृति एक प्रकारची फार उतावळी असून हल्लींचा काळ फार विलक्षण. काळास अनुसरून वागण्याविषयीं बहुत प्रकारें सांगतो, परंतु लेकुरपणा असल्यामुळें लक्षांत येत नाहीं. यामुळें रात्रंदिवस काळजी ठेवावी लागते. परवाचे दिवशीं विठुजी होळकर यांस देहांत शिक्षा देण्याचे ठरल्याचें ऐकून श्रीमंतास जाऊन असें न होण्याविषयीं विनंती करावयाची ह्मणून बोलून लागलीच निघाले. मी पुष्कळ बोललों कीं आपल्यास या गोष्टीची गरज नाहीं. असे प्रकारची विनंती केली तर श्रीमंताची कदाचित् मर्जी जाईल, परंतु न ऐकतां चालते झाले. तेव्हां मला बरोबर जाणें भाग झालें. श्रीमंत

---

* नरसिंहराव.

डोई* करीत बसले होते. तेथें जाऊन बोलले कीं " मोठे सरदा-रांचे मुलास स्वामींनीं शिक्षा योजली आहे हें करणें कोणास प-संत वाटत नाहीं. यापासून शिपाई लोक व सरदार नाखुष हो-तील. यावर खाविंदाची मर्जी." श्रीमंत बोलले कीं " नरसिंगराव! विचारानेंच जें होणें तें होईल. त्याविषयीं तुह्मी कां काळजी करितां?" हें उत्तर बरें न वाटल्यावरून लागलाच निरोप घेऊन निघाले. खालीं आल्यावर कुंजर भेटले. त्यांचा हात धरून एकी-कडे नेऊन बोलिले कीं, " तुह्मी तूर्त मसलतदार असून अशी वा-ईट गोष्ट करण्यास कशी मसलत देतां? होळकर जुने सरदार. त्यांचे वडिलानीं कशी सरकारची चाकरी केली याचा विचार न होतां त्यांचे पुत्रास देहांत शिक्षा, ही गोष्ट फार अनुचित." त्या-वर कुंजर बोलिले कीं " हें राजकीय काम आहे. लढाईसंबंधी सरदार लोकांचें काम आहे. यांतील कारणें आपल्यास माहीत नाहींत." असें बोलणें चाललें असतां लागलेच डोळे फि-रवून चेहरा बदलला. हें मी पाहून युक्तीनें घरीं आणिलें. अ-सा उतावीळ स्वभाव असल्यामुळें समयीं काय बोलतील व काय करतील याचा नेम नाहीं. याची मोठी भिती वाटते. दिवस एक प्रकारचे आले आहेत. यामुळें दुसरें कांहीं न सुचतां सर्व काळ त्यांजवर लक्ष ठेवावें लागतें.

दुसऱ्या दिवशीं पेशवे बाजीराव यानीं विठोजी होळकर यास सरकारवाड्यापुढें एका हत्तीच्या पायास बांधून तो हत्ती माहाताकडून भररस्त्यामधून पळविला. तेव्हां विठोजी अर्थातच प्राणास मुकला. ही गोष्ट तारीख १ माहे एप्रील सन १८०१ इसवी रोजीं झाली.

यशवंतराव होळकर वराडांत होते. तेथें त्यांस सदहू गो-ष्टीची खबर लागतांच ज्या ज्या मनुष्यांनीं आपल्या आ-

---

* हजामत.

वडल्या भावास ठार मारण्याविषयीं पेशव्यांस उत्तेजन दिलें होतें, त्या सर्वांचा व शिंद्यांचा सूड घेण्याचा त्यानीं कृतनिश्चय केला! हा निश्चय सिद्धिस नेण्यासाठीं त्यांनीं नागपूराहून माळव्यांत जाऊन तेथें आनंदराव पवार याजकडून कांहीं पैसा व घोडे मिळविले; आणि त्या थोडक्याच तयारीनिशीं त्यांनीं आपली उभारणी करून लुटीचा व इतर साहस कर्मांचा क्रम सुरू केला. नंतर लवकरच त्यांस एक पेंढारी लोकांची टोळी येऊन मिळाली. शिवाय अमीरखान नांवाचा एक साहसकर्मी व पराक्रमी पठाण स्वारांच्या एका टोळीनिशीं त्यांस येऊन मिळाला. याप्रमाणें यशवंतराव यांजपाशीं सुमारें दाहा-हजार स्वार झाल्यावर त्यांनीं नर्मदातीरीं जाऊन खंडण्या वसूल केल्या; आणि शिंद्यांचाही पुष्कळ मुलूक लुटला. त्यामुळें शिंद्यांस संताप येऊन त्यांनीं काशीराव याचे कवाइती फौजेची एक टोळी डुड्रेन नामक फ्रेंच सरदाराचे हाताखालीं होती ती त्यांवर पाठविली; परंतु तिचा त्यांनी अगदीं मोड करून टाकीला. यामुळें तर त्यांची मोठीच कीर्ति झाली! तिचा परिणाम असा झाला कीं, तो फ्रेंच सरदार आपलीं कवाइती पलटणें व तोफा घेऊन यशवंतराव यांजकडे मिळाला.

त्या वेळेस शिंदे पुण्यास होते. त्यांस ही खबर लागतांच आपल्यास अशा प्रसंगीं उत्तर हिंदुस्थानांत गेलेंच पाहिजे, अशी त्यांची खात्री झाल्यावरून त्यानीं, सर्जेराव घाटगे यांचे हाताखालीं पांच कवाइती पलटणें व अकरा हजार स्वार ठेऊन आपण सन १८०१ चे अखेरीस नर्मदेकडे जाण्याकरितां कूच केला. शिंदे मोठ्या फौजेनिशीं आपल्यावर चालून येत आहेत अशी यशवंतराव यांस खबर लागल्यावर त्यानीं चोहींकडून आपल्या फौजेच्या टोळ्या बोलावून घेऊन उज्जनीजवळ तळ दिला. त्या शहराचा बचाव करण्यासाठीं शिंदे यांनीं बऱ्हाणपुराहून लागोपाठ दोन फौजा पाठविल्या; परंतु यशवंतराव यांनीं त्या दोहींचाही तात्काळ मोड केला.

नंतर होळकरांनीं उज्जनी शहरांतून पुष्कळ खंडणी वसूल करून शिंद्यांचा तोफखाना नर्मदा नदी उतरून गेला होता त्याजवर हल्ला करण्याकरितां कूच केला; परंतु त्यांचें तेथें कांहीं चाललें नाहीं.

नंतर शिंदे नर्मदा नदी उतरून पार गेले. आणि त्यांनीं सरजेराव घाटगे यांस पुण्याहून आपले मदतीसाठीं बोलाविल्यावरून तेही सत्वर तिकडे निघून गेले. शिंदे यांनीं त्यांचे हाताखालीं स्वार व पायदळ मिळून हादा हजार फौज शिवाय चवदा कवाइती पलटणें असें देऊन त्यास इंदूर लुटण्यास पाठविलें. तेव्हां यशवंतराव आपले राजधानीचा बचाव करण्यास पुष्कळ फौज घेऊन आले, परंतु त्यांच्यानें इंदुराचा बचाव करवला नाहीं. तथापि त्यांस शिपाई लोक अधिकाधिकच मिळत गेले, व त्यांची स्थिति अशी बिघडलेली असतांही त्यांजकडे शिंद्यांचे फौजेपैकीं पुष्कळ लोक जाऊन मिळाले, तेणेंकरून त्यांस धैर्य आलें, आणि दक्षिणेंत पेशव्यांजवळ त्यांचे जे शत्रू होते त्यांचा सूड घेण्याचा त्यानीं निश्चय करून फत्तेसिंग माने यांस स्वाराचे एक जबरदस्त टोळीनिशीं पेशव्यांचे मुलकांत धामधूम करण्यास पुढें पाठविलें, आणि त्यांचे मदतीकरितां मागाहून अमीरखान पठाण यांस लवकरच रवाना केलें.

नंतर यशवंतराव आपले हाताखालचे फौजेनिशीं कुच करून बऱ्हाणपुरास पोहोंचले; आणि तेथें शिपाई लोकांस पगार वाटून त्यांनीं पुण्याकडे कूच केला. ते तापी नदी उतरून येतांच त्यांनीं आलीकडे न यावें म्हणून पेशव्यांनीं हरएक प्रकारें यत्न चालविला, तो असा कीं "तुमचें काय मागणें असेल तें कळवावें" असें त्यांस सांगून पाठवून "तुम्ही गोदावरीपलीकडे राहाल तर शिंद्यांचे व तुमचे जे तंटे आहेत ते आम्ही पंच होऊन तोडूं" असें वचन कळविलें. त्याचा जबाब यशवंतराव यांनीं पाठवि-

ला कीं, " माझा भाऊ विठुजी हा तर परलोकास गेलाच. तुम्हांस तो आतां मला परत देतां येणार नाहीं; परंतु माझा पुतण्या खंडेराव यास बंधमुक्त करून माझे घराण्याचे मुलूक माझे स्वाधीन करावे. असें झालें म्हणजे मी परत जाण्यास तयार आहें. " ह्या शर्ती बाजीराव साहेब यांनीं बाह्यात्कारी कबूल करून, खंडेरावाची मोकळीक करण्याविषयीं आम्हीं शिंद्यांस हुकूम पाठविला आहे असें यशवंतराव यांस निश्चय पूर्वक कळविलें. तत्रापि आंतून असें कपट केलें कीं, शिंद्यांस तसा हुकूम न पाठवितां खंडेराव होळकर यांस आशिरीचे किल्यांत कैदेंत ठेवावें म्हणून हुकूम पाठविला, आणि शिंद्यांचा सरदार भाऊ भास्कर यास यशवंतराव याजवर सत्वर हल्ला करावा असें लिहून पाठविलें.

फत्तेशिंग माने पंचवीस हजार फौजेनिशीं खानदेशांत आल्याचें वर्तमान पुण्यास पोहोंचल्यावर त्यांस पुढें न येऊं देण्याकरितां पेशव्यांनीं धोंडोपंत गडबोले या नांवाचे सरदाराचे हाताखालीं सरकारी स्वार व कवायती पायदळ पळटणें मिळून पंचवीस हजार फौज देऊन त्यांस मालेगांवाकडे रवाना केलें आणि मागाहून नरसिंह खंडेराव विंचुरकर यांस आपले दरोबस्त फौजेनिशीं धोंडोपंतांचे मदतीस जाण्याविषयीं हुकूम पाठविला.

नरसिंहराव यांस सरदारीचीं वस्त्रें मिळाल्यापासून त्यांनीं पांचसाहा वर्षेंपर्यंत मोठ्या उत्सुकतेनें शिपाईगिरीस योग्य अशा गोष्टी म्हणजे घोडे फेरणें, बोथाटी करणें, पट्टा खेळणें, बंदुकीनें निशाण मारणें व एकंदरीनें लढाईत ज्या हिकमती करावयाच्या असतात, त्यांचा पुर्ण अभ्यास करून, सरदारीचें कांहीं तरी महत्कृत्य करण्याची उमेद धरिली होती. शिवाय दररोज कुस्ती वगैरे कसरत करून शरीराची तयारी ही उत्तम प्रकारें केली होती, व त्या कारणानें तर त्यांचा मनोत्साह फारच वाढला होता. तशांत त्यांच्या तारुण्याची त्या वेळेस सुरुवात असून त्यांचे

आजे विठ्ठल शिवदेव व चुलते शिवाजी विठ्ठल यांचे शौर्याच्या हकीकती वृद्ध मनुष्यांच्या तोंडांनीं त्यांनीं ऐकल्या असल्यामुळें त्यांस विशेष स्फुरण चढून लढाईचा प्रसंग येण्याची ते वाट पाहात च होते. इतक्यांत त्यांस लढाईस जाण्याविषयीं श्रीमंतांचा हुकूम आला. तो ऐकून त्यांस बहुत संतोष झाला. नंतर त्यांनीं आपले फौजेची तयारी करून गडबोले यांस मदत करण्यासाठीं कूच केला.

वर लिहिल्याप्रमाणें पेशव्यांचे सरदार गडबोले हे फौजे निशीं खानदेशांत पोहोंचल्यावर फत्तेसिंग माने व अमीरखान पठाण यांच्या एकत्र फौजेची व त्यांची लवकरच गांठ पडून लढाई झाली. तिचा परिणाम असा झाला कीं, गोडबोले यांचा मोड होऊन पेशव्यांचे फौजेची दाणादाण झाली; यामुळें गडबोले लाचार होऊन पुण्याकडे चालते झाले.

ह्या पराजयाचें वर्तमान नरसिंह खंडेराव यांचा गोदातीरीं मुक्काम असतां त्यांस समजलें. तेव्हां त्यांनीं आपले मालिक पेशवे यांस असें विनंतिपत्र लिहिलें कीं, "गडबोले यांचा पराजय होऊन ते निघून गेले; आतां मला आज्ञा होणें असेल ती सत्वर लिहून यावी. मी विंचुरा नजीक असून तेथें जाणार आहें व हुकूम येईल त्या प्रमाणें वागण्यास सिद्ध आहें." या विनंतिपत्राचा जबाब त्यांस पेशव्यांकडून विंचुर येथें पोहोंचला. त्यांत असें लिहिलें होतें कीं, "यशवंतराव होळकर यानें मर्यादा सोडून पुण्यावर हल्ला करण्याचे इराद्यानें पुष्कळ फौजेनिशीं कूच केला असें वर्तमान येथें आल्यावरून त्यास माघारां हांकून लावण्यास्तव येथें सरकारी व सरदारांच्या फौजा जमा होत आहेत. याकरितां तुह्मीही आपली दरोबस्त कायमची फौज व जितकी भरती करितां येईल तितकी नवीन फौज त्वरेनें भरून, तावडतोब पुण्यास निघून यावें." हा जबाब नरसिंगराव यांनीं आपले फौजेवरील मुख्य अधिकारी कोटमगांवकर यांस लागलाच

कळवून " जितकी फौज मिळवितां येईल तितकी सत्वर भरती करून पुण्यास हाजिर व्हावें "असा हुकूम केला आणि आपण स्वतः कायमचे फौजेनिशीं पुण्यास जाण्याची तयारी केली.

इतक्यांत त्यांस अशी खबर आली कीं, अमीरखानाचा भाचा अहमदखान हा मुखेड म्हणून विंचुरापासून पांच साहा कोसांवर एक गांव आहे तेथें तळ देऊन राहिला आहे; व त्याचा विचार पुढें पुण्याकडे जाण्याचा आहे. अमीरखानाचा कूच करण्याचा नेहमींचा क्रम असा असे कीं, त्यानें आपला भाचा अहमदखान यास आपले तळापासून आठ कोसांवर आपले व फत्तेशिंग माने यांचे हाताखालचे फौजेनिशीं तळ देण्यास पुढें पाठवावें; आणि आपण स्वतः फत्तेशिंग माने यांस बरोबर घेऊन मागाहून कूच करावा. तो जवळ आला म्हणजे त्याच्या भाच्यानें पुढें कूच करावा. त्याप्रमाणें मुखेड गांवापासून सात आठ कोसांवर अमीरखानाचे फौजेचा तळ होता. अहमदखानाचा तळ मुखेडास असल्याची खबर नरसिंह खंडेराव यांस कळतांच शत्रू समीप आलेला असून आपण पुण्यास निघून गेलों असतां शत्रूस पाठ दाखविल्याप्रमाणें होईल, असें त्यांस वाटून त्यांनीं मुखेडावर जाण्याची तयारी केली. हें वर्तमान नरसिंहराव यांचे कारभारी मंडळास समजल्यावरून त्यांनीं त्यांस विनंती केली कीं, "आपणास सत्वर हाजिर होण्याविषयीं पुण्याहून हुकुम आला आहे. याकरितां इतर गोष्टींकडे लक्ष न पुरवितां तावडतोब पुण्यास जाणें अवश्य आहे." परंतु नरसिंहराव यानीं त्यांस निक्षून सांगितलें कीं, "लढाई करण्याचा हा प्रसंग मला प्रथमच आला आहे; त्यास मी पराङ्मुख होणार नाहीं; मग काय होणें असेल तें होवो." असा जबाब देऊन ते फौजेनिशीं निघुन मुखेडास पोहोंचले, तों हेरांनीं त्यांस अशी बातमी कळविली कीं, शत्रूचे फौजेंत तोफा मुळींच नसून फक्त दोन तीन हजार स्वार मात्र आहेत व ते लढाईचे तयारीनें उभे

आहेत. त्यावरून आतां आपण एकाच हल्ल्यांत शत्रूंचा मोड करून टाकूं असें त्यांस वाटून त्यांनीं आपले फौजेंतील सरदारांची एकवाक्यता केल्यावर लागलाच हल्ला केला. अहमदखानही स्वतः तो हल्ला परतविण्यास पुढें आला. तेव्हां रणतुंबळ होऊन नरसिंहराव यांचे सुमारें आठ नऊशें स्वार नाश पावल्यावर त्यांनीं स्वतः अहमदखानास गांठून कत्तल केलें; आणि त्याचे फौजेचे पंधराशें स्वार मारून बाकीची फौज पळवून लाविली. याप्रमाणें नरसिंह खंडेराव यांचा जय झाल्यावर ते तळावर माघारें आले. कारभारी त्यांस भेटल्यावर सर्वांनीं त्यांस विनंति केली कीं, "येथून तीन कोसांवर गोदावरीस उतार आहे, त्यांतून आपण सत्वर पलीकडे निघून जाऊं; कारण गंगेचें पाणी वाढत चाललें आहे; महापूर आला तर कोठेंही उतार राहाणार नाहीं; आणि फौजेसुद्धां पुण्यास जाण्यास मोठी अडचण येईल." ती विनंति मान्य करून नरसिंहराव आपले सर्व फौजेनिशीं गोदातीरीं गेले, तों पाणी चढतांना त्यांचें दृष्टीस पडलें; परंतु धैर्य न सोडितां, सर्वांस उत्तेजन येण्यास्तव त्यांनीं आपले घोड्याचा जेरबंद कापून तो पाण्यांत घातला. तें पाहून सर्व स्वारांनींही आपले घोड्याचे जेरबंद कापून ते पुढें घातले. ईश्वरकृपेनें संपूर्ण लष्कर गोदापार उतरून जाऊन सर्वांनीं गोदेचे दक्षिणतीरीं मुक्काम केला. त्यावरून विंचुरकरांस गंगेनें (गोदेनें) मार्ग दिला असें लोक अद्यापि बोलतात.

आपला भाचा अहमदखान मारला जाऊन आपले फौजेचा विध्वंस झाला अशी खबर अमीरखान यास पोहोंतांच, त्यास अत्यंत त्वेष चढून त्यानें शत्रूचा सूड घेण्याचा निश्चय केला, आणि तांबडतोब तयारी करून तो गोदेचे उत्तरकिनाऱ्यावर येऊन पोहोंचला; परंतु गोदेस मोठा पूर आल्यामुळें उतार नाहींसा होऊन त्याची पारजाण्याची उमेद खचली. तत्रापि त्याचा राग शांत न होतां नाउमेदीमुळें तो वृद्धिंगत झाला. सबब त्यानें विंचुरावर चाल केली; आणि तेथें पोहोंचतांच गांव लुटून खुद्द विंचुरकरांचे

वाड्यांत मुक्काम केला; आणि सावकाशीनें तो वाडा लुटून नंतर कूच करणार तों इतक्यांत होळकरांचा कोणी फणशे आडनावाचा आप्त सरदार त्यास मिळाला होता, त्यानें तो वाडा जाळण्याविषयीं त्यास चिथावून देऊन तें घोर कृत्य करण्यास्तव त्यांची परवानगी घेतली; आणि अमीरखान कूच करून गेल्यावर सदहू वाड्यांत कडबा व गवत भरून त्यास आग लावून दिली. तेंव्हां आठ दिवसांत सर्व वाडा जळून त्याची राख होऊन गेली!

नरसिंहराव मजल दरमजल कूच करून निकडीनें पुण्यास जाऊन पोहोंचले. त्यांचे मुखें मुखेड येथील लढाईचें वर्तमान बाजीरावसाहेब पेशवे यांनीं ऐकिल्यावर त्यांची मर्जी खुष झाली. त्या प्रसंगी पेशव्यांचे हुकुमावरून पुण्याजवळ सुमारें एक लाख फौज जमली होती. तींत मुखत्यें करून पेशवे याचे तोफखान्यावरील सरदार गणपतराव पानशे हे आपले हाताखालचे तोफांसह; दौलतराव शिंदे यांचे एक सरदार भाऊ भास्कर हे कवाइती पायदळ पलटणांचा एक कंपू व लहान मोठ्या एकंदर सुमारें १५० तोफांनिशीं; आणि पेशव्यांचे हुजुरातीच्या ५२ पागांचे भालेवाले स्वार, असे सर्व लढाईचे तयारीनें पुण्याचे पुर्वेकडील मैदानांत तळ देऊन पडले होते. त्या फौजेंत विंचुरकर यांचीही फौज मिळाली.

येशवंतराव होळकरही एक जय्यद फौजे निशीं निर्भयपणें जेजुरीस दाखल झाले. त्यानीं अमीरखान पठाण व फत्तेशिंग माने व आपले इतर सरदार या सर्वांचे हाताखालच्या टोळ्या एकत्र केल्यामुळें त्यांजकडील फौजेची संख्या ५० हजारांवर होऊन त्यांनीं एकदम् पुण्याकडे चाल केली. त्यानीं हडपसर खेड्याचे पूर्वेस मैदानांत तळ दिला. तेव्हां पेशवे यांजकडून वकीलमार्फत त्यांजबरोबर दोन दिवसपर्यंत पुष्कळ प्रकारचीं बोलणीं झालीं; परंतु समेट न होता शेवटीं युद्धावरच मजल येऊन ठेपली.

तें पाहून नरसिंहराव यांनीं आपले फौजेंतील मुख्य अधिकारी व मानकरी लोक यांस एकत्र करून त्यांशीं थोडक्यांत भाषण

केलें. ते ह्मणाले कीं, "मित्रहो! माझे आजे व वडील यांजबरोबर प्रसंगोपात तलवार गाजविण्यांत सामील झालेले असे तुम्हांमध्यें जे कितीएक लोक आहेत त्यांस त्या प्रत्येक घोर संग्रामाचें स्मरण असेलच; परंतु मालिका समोर आपले कर्तव्यशक्तीचा उपयोग करण्याचा मला हा प्रथमच प्रसंग असून यांतच माझे योग्यतेचा निर्णय होणारा आहे. याकरितां मी आपली पराकाष्टा करीन; व तुह्मीही जसे माझे आजे यांचे झेंडयाखालींच लढत आहां असें समजून तुह्मांस या प्रसंगानुरूप माझी पाठ राखिली पाहिजे. तुमचे मनांत जर मी आपल्या पूर्वजांच्या बाहादुरीची बराबरी करावी असें असेल, तर तुम्ही झटून मला कुमक करा, म्हणजे मी कृतकृत्य होईन." हें भाषण ऐकून सरदार, मानकरी व पागे यांनीं एक विचारानें जबाब दिला कीं, "आपल्या निश्चयाप्रमाणें करण्यांत आम्हांकडून बिलकूल अंतर व्हावयाचें नाहीं. ज्या ठिकाणीं आपला एक केश पडेल त्या ठिकाणीं प्रथम आम्हां सर्वांचे देह खर्ची पडतील." याप्रमाणें परस्पर भाषण झाल्यावर मंडळी निरोप घेऊन आपापले डेऱ्यास निघून गेली.

दुसरे दिवशीं पेशवे व होळकर यांच्या फौजा लढाईचे तयारीनें मैदानांत उभ्या राहिल्या. पेशव्यांकडील फौजेचे मध्यभागीं शिंदे यांचा तोफखाना असून त्याचे मागें कवाइती पलटणें व त्यांचे उजवे बाजूस कवाइती स्वार असे उभे होते. त्यांचे उजवे बाजूस गणपतराव पानशे आपले तोफखान्यासहित असून त्यांचे पलीकडे सरकारी हुजुरात, विंचूरकर, रास्ते, बापू गोखले व इतर सरदार हे आपापल्या फौजांनिशीं होते. यशवंतराव होळकर यांनींही आपली कवाइती फौज व तोफखाना मध्यें ठेऊन त्यांचे दोन्ही बाजूस स्वार उभे केले होते; व आपण आपले फौजेचे पिछाडीस अमीरखान वगैरे बरोबर मसलत करीत उभे होते.

प्रथम शिंद्यांकडील तोफखाना सुरू होऊन होळकरांचे आघाडीवर गोळ्यांचा वर्षाव चालला. त्यावरून होळकरांडील फ्रेंच सरदारानें आपल्या थोडक्याशा तोफांचा मारा त्या तोंडावर चालविला. नंतर कांहीं वेळानें विंचूरकर, रास्ते, व गोखले यांनीं डावे बाजूनें पुढें चाल केली. तेव्हां होळकरांचा एक सरदार त्यांजवर पुष्कळ स्वारांनिशीं चालून आला. त्या प्रसंगी तुमुल युद्ध होऊन होळकरांचे स्वारांस नरसिंहराव विंचूरकर, रास्ते व बापू गोखले यांच्या फौजांनीं मागें हटवून लाविलें. तें वर्तमान यशवंतराव यांस कळलें तेव्हां त्यानीं आपले मुख्य सरदारांस बोलावून भाषण केलें कीं, "आजचा प्रसंग आणीबाणीचा आहे. मी आज असा निश्चय केला आहे कीं, एक तर जय मिळवीन, नाहींपेक्षां मरून जाईन. यांत सामील होण्याची तुम्हांपैकीं कोणाची खुषी असेल तर मजबरोबर रुधिरगंगेंत स्नान करण्यास चलावें. ज्यांची खुषी नसेल त्यांनीं स्पष्ट सांगून आतांच अलग व्हावें, परंतु तोंडावर गोड बोलून शेवटीं मला कोणीही दगा देऊं नये, एवढेंच माझें सर्वांस सांगणें आहे." त्याजवर सर्व सरदारांनीं शपथपूर्वक सांगितलें कीं, "आम्ही पूर्वींच आपले सुखदुःखाचे भागीदार झालों आहों, तेव्हां आतां आम्हांकडून कोणतेही प्रकारें कसूर होणार नाहीं. आपल्याबरोबर आम्ही आपले जीव खर्ची घालण्यास अगदीं तयार आहों." याप्रमाणें भाषण झाल्यावर सर्वांस पुढें होण्याची सूचना करण्यासाठीं यशवंतराव यानीं भंडार उधळून 'जय खंडेराव' असा मोठ्यानें शब्द केला, आणि नग्न तरवार हातांत घेऊन आपला घोडा झपाट्यानें पुढें चालविला. त्याजबरोबर एकदम चाळीस पन्नास हजार स्वारांनीं चाल केली. तें पाहून शिंद्यांचे सरदारांनीं त्यांजवर झपाट्यानें गोळ्यांचा वर्षाव केला; परंतु यशवंराव यांनीं मागें पुढें न पाहतां एकदम तोफखान्यावर हल्ला केला.ते तोफखान्याजवळ जाऊन पोहोंचत तोंपर्यंत त्यांचे आठदाहा हजार स्वार शिंद्यांकडील तोफांचे भडिमारानें पडले.

तत्रापि बाकीच्या स्वारांचा हल्ला पोहोंचतांच तोफा बंद होऊन संगिनी व भाले यांचा सामना झाला; आणि रणतुंबळ होऊन शेवटीं होळकरांनीं सर्व तोफा हिसकावून घेतल्या, आणि पलटणींतील पायदळ व स्वार यांची मोठी कत्तल उडवून त्यांस पळवून लाविलें. इतक्यांत त्यांचे उजवे बाजूनें विंचुरकर वगैरे सरदारांनीं त्यांजवर हल्ला केला. त्यांत नरसिंगराव हे आघाडीस होते. त्यांनीं जो निकरानें हल्ला केला त्यांत पहिलेच तडाक्याबरोबर त्यांचे दोन हजार शिलेदार मानकरी पडले. तथापि लढाई न सोडितां त्या बाजूकडील लोकांनीं पुढें चाल केली. तेव्हां कोटमगांवकर बाबूराव नाना यांचे चिरंजीवांस असाध्य जखमा लागून त्यांचे हाताखालचे पंधराशें स्वार पडले, व खुद्द नरसिंहराव यांचे छातीवर हीं तरवारेची जखम लागली. या वेळेस ते यशवंतराव होळकर यांचे समीप पोहोंचले होते. पूर्वी पुणें येथें यशवंतराव व नरसिंहराव यांचा परस्पर स्नेह असून ते मैदानांत बोथाटी खेळण्यास बरोबर जात असत. यामुळें यशवंतराव यांची व त्यांची चांगलीच ओळख होती. यशवंतराव हे या ठिकाणीं नरसिंहरावांस पक्कें ओळखून मोठ्यानीं बोलले कीं, "नरसिंराव! तुम्ही माझे मित्र आहां, शत्रु नाहीं;माझा जो शत्रु शिंदा त्याचे फौजेवर माझा हल्ला आहे, तुम्ही आपलें कर्तव्यकर्म उत्तम प्रकारें केलें. आतां परत जावें" होळकरांकडील लोक नरसिंहराव यांजवर धांवून जाणार होते; परंतु होळकारानीं त्या सर्वांस तसें करण्याची मनाई करून नरसिंहराव यांस परत लावून दिलें.

नंतर यशवंतराव होळकारांनीं पेशव्याचे फौजेसुद्धां जमलेल्या इतर सर्व सरदारांच्या फौजांचा अगदीं मोड करून सर्वांस पळवून लाविलें, आणि पुण्याचे पुर्वेस जवळच छावणी केली. त्यांचे अनिवार शिपायांनीं पुणें शहर लुटण्याचा इरादा दर्शविला; परंतु त्यांनीं तसें करण्याची त्यांस अगदीं मनाई केली, आणि त्या शहरास बिलकूल उपद्रव नकरितां त्याचा चांगला बंदोबस्त ठेविला.

ही लढाई संपल्यावर दुसरे दिवशी इंग्रज सरकारचे पुणें येथील रेसिडेंट हे होळकर यांचे भेटीस गेले. होळकर हे आपले सरदारांसह चिखलाचे जमीनीवर टाकलेल्या जाडच्या चटयांवर बोलत बसलेले, त्यांचे डोक्यास तरवारेची एक व संगीनीची एक अशा दोन लाहानशा जखमा लागलेल्या असे त्यांचे दृष्टीस पडले. त्या जखमा बऱ्या होण्यास्तव त्यांस कांहींच उपचार केलेला नव्हता. तेणेकरून रेसिडेंट साहेबांस अचंबा वाटून त्यांनीं होळकर यांस विचारिले कीं, "तुम्ही आपल्या जखमा बऱ्या होण्यास्तव त्यांस औषधोपचार कां करीत नाहीं ?" होळकरांनीं जबाब दिला कीं, "हे केवळ ओरखडेच आहेत. असे पुष्कळ वेळा निघतात. हे आपोआप बरें होतील. यांस औषधोपचार करण्याची जरूर नाहीं." या बेपर्वाइचे जबाबाने रेसिडेंट साहेब चकित होऊन उगेच राहिले. *

नरसिंहराव रणभूमीतून निघून आपले तळावर आले तों श्रीमंतांकडून दोन सांडणी स्वार धांवत येऊन त्यांनीं त्यांस असें कळविलें कीं, "श्रीमंतांची स्वारी गुलटेंकडीवर उभी असून तेथें त्यांनीं आपल्यांस अति सत्वर बोलाविलें आहे." त्याबरहुकूम नरसिंहराव तीनशें स्वारांनिशीं लागलेच गुलटेंकडीवर गेले. तों श्रीमंतांची स्वारी पूर्वीच पुढें चालती झाली होती असें त्यांस कळून आलें. तेव्हां त्यांनीं भरधांव घोडे टाकीत श्रीमंतांचे स्वारीस गांठिलें. ते श्रीमंतांजवळ पोहोंचले तेव्हां त्यांजबरोबर कितीएक स्वारांचे जखमांतून रक्तस्राव चालला आहे; सर्वांचे हातांत नग्या तरवारी आहेत; खुद्द नरसिंहराव यांचे छातीवर जखम लागलेली असून तींतून रक्त गळत आहे, व त्यांची मुद्रा केवळ पिसाळलेल्या वाघासारखी झालेली आहे, असें श्रीमंतांनीं पाहून त्यांस मोठें आश्चर्य वाटलें; आणि नरसिंहराव यांचे शूरत्व व स्वामिभक्ति यांविषयीं त्यांची पूर्ण खातरी झाली.

---

* ग्रांटडफसाहेब कृत मराठ्याचा इतिहास.

नरसिंहराव यानीं हात जोडून श्रीमंतांस विनंति केली कीं, महाराज ! " सांप्रतचे हल्यांत माझे शूर व लढाया मारून घटलेले असे तीन हजार मित्र रणांगणी पडले ! शिवाय ज्याचे सोबतीनें मी लाहानपणासून विद्याभ्यास केला असून ज्यास मी आपले पुत्रासमान मानिलें होतें, व ज्याचें शूरत्व अत्यंत वर्णनीय होतें असा जो माझ्या सेनापतीचा पुत्र त्यास असाध्य जखमा लागून तोहि रणांत पडला; परंतु ह्या सर्व गोष्टींची मी आतां पर्वा न बाळगितां एवढीच विनंती करितो कीं, सरकारांनीं थोडा धीर धरावा. मी आणखी एकवार सैन्याची उठावणी करितों. त्यांत माझी तरवार यशवंतराव यांचे रक्तपान करील किंवा माझें शीर जाईल; परंतु हल्ला करण्यास आज्ञा मात्र मिळावी. " पेशव्यांनीं ती विनंती न ऐकतां आग्रहानें नरसिंराव यांस आपल्याबरोबर येण्याविषयीं आज्ञा केली. या वेळेपूर्वी नरसिंहराव यांचे रक्तबंबाळ झालेल्या शरीराविषयीं श्रीमंतांनीं कांहींच उद्गार काढिला नव्हता, परंतु आतां ते त्यांस म्हणाले कीं, " नरसिंहराव ! तुमचे छातीस जखम लागली आहे याचा विचार तुह्मी काय केला आहे ? तेव्हां मात्र आपल्यास जखम लागल्याचें नरसिंहरव यांस भान आलें. असो; त्यांस श्रीमंमतांबरोबर जाणें भाग पडलें. मग त्यांनीं एका सांडणीस्वाराबरोबर बाबूराव नाना, जे शेष राहिलेल्या फौजेसुद्धां तळावर होते, त्यांस सांगून पाठविलें कीं, " तुह्मी सर्व फौजेनिशी स्वारींत येऊन मिळावें. " नंतर त्यांनीं दुसरे सांडणीस्वाराबरोबर कारभारी बाळोबाबावा यांस असा निरोप पाठविला कीं, " मी पेशव्यांचे स्वारीबरोबर चालता झालों. तुम्ही कोठी वगैरे सर्व सामान घेऊन स्वारींत येऊन दाखल व्हावें. "

इंग्रजसरकारचे त्या वेळचे एक प्रतापी व नामांकित सेनापती जनरल वेलेस्ली ह्मणजे ज्यांनीं पुढें सन १८१५ इसवी सालीं फ्रान्स देशांत वाटरलू येथें फ्रेंच लोकांचा त्या वेळचा महान प्र-

तापी व. दिग्विजयी पादशाह ( महाराजाधिराज ) नेपोलियन् बोनापार्ट याजबरोबर विकट लढाई करून पूर्ण व कायम असा जय मिळविला व ज्यांस त्या बाहादुरीबद्दल त्यांचे सरकाराकडून " ड्युक ऑफ वेलिंग्टन् " असा मोठा किताब मिळाला, त्यांनीं पूर्वीं इतर साहेब लोकांबरोबर हिंदुस्थानांतील कारस्थानें व लढाया यांचें संबंधानें केलेल्या पत्रव्यवहाराचे कित्येक व्हाल्युम ( एकच विषयाचीं अनेक बुकें ) अलिकडे इंग्रजींत छापून प्रसिद्ध झाले आहेत: त्यांपैकीं पहिले व्हाल्युमाचीं पृष्टें ३३७ व ४१७ यांत सन १८०३ चे आगस्ट महिन्यांत झालेला पत्रव्यवहार दाखल असून त्या पत्रव्यवहारांत विंचूरकर यांजविषयीं मजकूर लिहिले आहेत ते येणेंप्रमाणें;—

PAGE 337.

"In fact, this Chief is the only one in the Empire who has been, from the commencement, faithful to the cause of the Peishwa. While fighting in this cause against Holkar, his troops were entirely cut to pieces, he and his son were wounded, and Oolpar alone remained of all what he possessed and this was ceded to the Company. I certainly think it desirable that this Chief should get back that district. I acknowledge that I think it would be preferable to suffer a little inconvenience at Surat and to attach to the British Government's connection such a servant as Vithal Shiodeo to gain credit in the Maratha Empire of rewarding his services and fidelity to his Master, to keeping the district only for the convenience of the City of Surat."

PAGE 417.

"Your are already in the possession of my opinion respecting Oolpar. Vithal Shiodeo must have that district, and that immediately.

सदहू दोन्ही मजकुरांचा मराठी तरजमा येणेंप्रमाणें;—

पृष्ट ३३७

वस्तुतः ( संपूर्ण ) मराठी राज्यांत पेशव्यांचे पक्षाशीं इमानदारीनें वागलेला असा काय तो हाच एकटा सरदार आहे. पेशव्यांचे तर्फेनें होळकरांबरोबर लढत असतां, त्याचे स्वारांचे अगदीं पुर्जे पुर्जे उडून त्यास व त्याचे पुत्रास जखमा लागल्या, आणि त्याचे कबजांत जो मुलूक होता त्यांपैकीं फक्त उरपाड मात्र शिल्लक राहिला; पण तोही ( पेशव्यांकडून ) कंपनीस देण्यांत आला. तो माहाल त्यास परत मिळणें हें मला खचीतच इच्छास्पद वाटतें. हे मी कबूल करितों कीं फक्त सूरत शहराचे सोयीकरितां तो माहाल राखून ठेवण्यापेक्षां, त्या शहरांत जरा गैरसोय सोसावी आणि त्यानें आपले मालिकाबरोबर इमानदारीनें वागून त्याची अनेक कार्यें सिद्धीस नेलीं त्याबद्दल त्यास बक्षीस देण्याची मराठी राज्यांत कीर्ति मिळविण्यास्तव विठ्ठल शिवदेव ( नरसिंह खंडेराव ) यासारिखे नौकराचा इंग्रजसरकाराशीं संबंध जोडणें हें अधीक पसंद होईल असें मला वाटतें.

पृष्ठ ४१७

" उरपाडाविषयीं माझें मत तुह्मांस पूर्वींच कळलें आहे. विठ्ठल शिवदेव यांस तो माहाल मिळणें अवश्य आहे; व तो आतांच मिळाला पाहिजे. "

मागें सांगितल्याप्रमाणें बाजीराव पेशवे हे आपली राजधानी पुणें शहर निराश्रित स्थितींत सोडून गेले ! हें केवळ संपुर्ण मराठी राज्याच्या ऱ्हासाचें पूर्वरूपच होय असें मानण्यास हरकत नाहीं; तथापि त्यांनीं ह्या गोष्टीचा बिलकुल विचार केला नाहीं. ते नरसिंहराव यांस सात हजार स्वारानिशीं बरोबर घेऊन निघाले. ते प्रथम सिंहगडास गेले. खासास्वारी बालेकिल्ल्यांत गेली. नरसिंहराव बरोबरचे फौजेसह खालीं किल्ल्याचे माचीवर मुक्काम

करून राहिले. त्यांचे कारभारी हे त्यांची बाकीची खासगी फौज व दरोबस्त असबाब घेऊन तेथें आले. दुसरे दिवशीं पेशव्यांचीही सुमारें पांच हजार फौज येऊन दाखल झाली. सिंहगडावर दोन दिवस मुक्काम झाला. त्या वेळेसही नरसिंहराव यांनीं तेथून न हालण्याविषयीं पुष्कळ तऱ्हेनें श्रीमंतांची समजूत केली. परंतु त्यांस धैर्य येईना. शेवटीं ते कोणाचेंही न ऐकतां तेथून निघून माहाड व रायगड वगैरे ठिकाणीं गेले; परंतु तेथेंही होळकराची फौज आल्याचें वर्तमान त्यांस लागतांच, ते समुद्रकिनाऱ्यावरील सुवर्णदुर्ग नांवाचे मजबूत किल्ल्यावर गेले. तेथून वसईस जाण्यापूर्वीं त्यानीं जरीपटका ह्मणजे राज्याचा मुख्य जरीचा झेंडा व मुतालीकी शिक्का ह्मणजे नायबीची मोहोर ही नरसिंहराव यांचे हवालीं करून त्यांस अशी आज्ञा केली कीं, “ तुम्हीं सरकारी सर्व फौज जमाकरून नीट मिरजेस जावें, आणि तेथें इंग्रजसरकारची फौज येईल तिला मिळून, होळकरानें दंगा केल्याबद्दल त्यास शिक्षा करण्याकरितां त्या फौजांबरोबर पुण्यास निघून जावें. ” त्याबरहूकम नरसिंहराव यांनीं पेशव्यांची पुण्यानजीक पांगलेली फौज एकत्र करून आपले फौजेनिशीं मिरजेकडे कूच केला; परंतु पाटण खोरें नांवाच्या एका खिंडींत साताऱ्चे राजाचा कोणी जवळचा आप्त चतुरसिंग भोंसले हा त्यांस आडवा आला. तेव्हां तो अडथळा दूर करण्यासाठीं त्यांस तेथें मुक्काम करणें भाग पडलें. मग त्यांनीं चतुरसिंगावर मारुळवहुल्याजवळ झपाट्यानें हल्ला करून त्याचा अगदीं मोड केला. नंतर पुनः कूच करून ते बिनहरकत मिरजेस पोहोंचले, आणि तेथें तळ देऊन इंग्रज सेनापति वेलस्ली साहेब हे कवाइती फौज घेऊन येणार होते त्यांची वाट पाहात राहिले. पुढें सन १८०३ इसवी सालीं बाजीरावसाहेब यांनीं इंग्रज सरकाराबरोबर तह केल्यावरून ते सेनापति इंग्रजी फौजेसुद्धां मिरजेस आले. तेव्हां नरसिंहराव यांनीं त्यांस भेटून आपला तेथें

राहण्याचा हेतू कळविला. मग उभयतां सेनापतींनीं आपापल्या फौजांनिशीं पुण्याकडे कूच केला. पण बाजीरावसाहेबांकडून यशवंतराव होळकरांची समजूत न झाल्यामुळें ते तें शहर लुटून, मिरजेहून दसई फौज येण्यापूर्वींच तेथून निघून गेले होते.

वसई येथें तह झाल्यावर बाजीराव पेशवे हे बरोबर १२०० गोरी फौज व १३०० काळी फौज घेऊन पुण्यास परत आले. तेथें वेलेस्ली साहेब, नरसिंहराव विंचुरकर, बापू गोखले, निपाणकर वगैरे सरदार त्यांस भेटले. बाजीराव यांनीं वेलेस्ली साहेब, निपाणकर आप्पा देसाई आणि बापू गोखलें यांस होळकराचा पाडलाग करण्याकरितां पाठवून नरसिंहराव यांस पुण्यास ठेवून घेतलें. याप्रमाणें श्रीमंत पुण्यास आल्यानें तेथें स्वस्थता होऊन पूर्वींप्रमाणें राज्यकारभार चालूं लागला; परतु त्या वेळेपासून मराठी राज्याचा प्रताप नष्ट होऊन त्याचे ऱ्हासास आरंभ झाला. सन १८०२ इसवी सालापासून मराठी राज्यांत पुष्काळ बंडें उद्भवलीं होतीं; पेंढाऱ्यांच्या टोळ्याही पुष्कळ उठल्या, व अनेक प्रकारचीं राजकारणें उपस्थित होऊन सर्वत्र बखेडे माजले. त्यामुळें महाराष्ट्र देशाचे उत्तर सीमेवरील प्रदेशांत व निजामांचे पश्चिम हद्दीवरील प्रांतांत बेबंदी होऊन मुलूक उद्ध्वस्त झाला. तेणेंकरून शेतांची लागवड बिलकूल झाली नाहीं. या कारणानें सन १८०४।५ इ. सालीं भयंकर दुष्काळ पडला. तेव्हां इंग्रज सरकारानें पेंढारी लोकांची धामधूम मोडून सर्व दंगेधोपे नाहींसे करण्याकरितां व उद्ध्वस्त झालेल्या मुलुकाची पेशव्यांचे वतीनें आबादी करण्याकरितां कर्नल वालेस साहेब यांची योजना केली; आणि त्यांचे मदतीस कोणी सरदार पाठविण्याविषयीं पुणें येथील रेसिडेंटानीं पेशव्यांस विनंती केली. त्यावरून बाजीराव साहेब यांनीं नरसिंह खंडेराव यांचे स्वाधीन जरीपटका व मुतालिकी शिक्के केले आणि हुजरातीपैकीं कांहीं फौज त्यांचे हाताखालीं देऊन, त्यांस वालेस साहेबांचे मदतीस पाठविलें. त्याचप्रमाणें निजाम यांजकडूनही महिपतराम,

सुभानखान व सखोरुद्र या नांवाचे सरदार कांहीं कवाइती पलटणींनिशीं एका इंग्रज कामगाराबरोबर आपले सरहद्दीवर आले. नंतर वालेस साहेब व नरसिंहराव यांनीं खानदेशांत व वऱ्हाडचे पश्चिम भागांत होळकरांकडील फौजबंद दंगेवाले व पेंढारी व भिल्ल यांचें पारिपत्य करून मुलकाची अबादी केली. तसेंच निजामांचे सरदारांनींही तिकडून आलेल्या इंग्रज सरदाराच्या साहाय्यानें सर्व प्रकारचे दंगे मोडून आपले हद्दींत स्वस्थता केली. त्या वेळेस नरसिंहराव यांचे फौजेचे खर्चाकरितां सर्व गंगथडी, बागलाण, खानदेश व वऱ्हाडचे पश्चिम भागापैकीं कांहीं प्रांत, येणेंप्रमाणें मुलूक लावून दिलेला होता. तेथें ते उत्तम प्रकारची व्यवस्था ठेवून वसूल घेत असत. याप्रमाणें सन १८०८ इसवीचे आरंभापर्यंत क्रम चालला.

वर लिहिल्याप्रमाणें नरसिंहराव हे दंग्याचा बंदोबस्त करून मुलुकांत स्वस्थता करण्यामध्यें गुंतल्यामुळें त्यांचे उत्तर हिंदुस्थानांतील मुलुकांची व्यवस्था नीट राहिली नाहीं; आणि अंबाजी इंगळे, ज्यानबत्तीस व दतियेवाले राजे यांनीं त्यांचा मुलूक त्यांचे कामगारांचे हातून हिसकावून घेऊन तीन चार वर्षेंपर्यंत त्याचा वसूल घेतला. तो मुलूक परत घेण्यासाठीं त्यांनीं उत्तर हिंदुस्थानांत जाण्यास पेशव्यांची परवानगी मागितली. ती मिळाल्यावर त्यांनीं त्या प्रांतीं जाण्याची तयारी केली. त्यावेळेस त्यांचे पदरची मंडळी व इतर इष्टमित्र यांस अशी उमेद वाटली कीं, ते उत्तर हिंदुस्थानांत गेल्यावर स्वतःचा मुलूक सोडवून घेतीलच; परंतु साधलें असतां शिंदे व इतर राजे रजवाडे यांस अनुकूळ करून घेऊन कांहीं तरी मोठें राजकारण उभें करतील; आणि त्या योगानें पेशव्याचें पंजाबांतील नष्ट झालेलें वर्चस्व कदाचित् पुनः स्थापितील; परंतु दुर्दैवेंकरून त्या उमेदी जागच्या जागींच राहिल्या. कारण नरसिंहरावांची प्रकृति एकाएकीं बिघडून त्यांस नवज्वराची भावना झाली. हें वर्तमान बाजीराव

साहेब यांस कळल्यावरून, ते स्वतः नरसिंहराव यांचे समाचारास गेले, व त्यांनीं वैद्यांकडून औषधोपचारही करविले; परंतु जरा देखील गुण पडेना, आणि त्यांची प्रकृति तर उत्तरोत्तर अधिकाधिक थकत चालली. हें पाहून कारभारी मंडळींनीं त्यांस दत्तक देण्याचा विचार काढिला; परंतु त्या समयीं नरसिंहराव यांचें वय केवळ चोवीस वर्षांचें असल्यामुळें त्यांस दत्तक घेण्याची सूचना करण्यास कोणाचेंही धैर्य होईना; तथापि ही गोष्ट कारभारी यानीं श्रीमंतांचे कानावर घातली. तेव्हां त्यांचे ह्मणणें पडलें कीं, "या समयीं नरसिंहराव यांस अशी गोष्ट कळविणें प्रशस्त नाहीं. ईश्वर तसा प्रसंग बहुधा आणणार नाहीं; पण कदाचित् आलाच तर पुढें त्याचा विचार पाहातां येईल." पुढें दोन दिवसांनीं नरसिंहराव यांची प्रकृति अतिशय बिघडून त्यांस सन १८०८ इ. चे एप्रिल महिन्यांत ह्मणजे शके १७२९ चैत्र शुद्ध ४ रोजीं पुणें येथें देवाज्ञा झाली. नंतर कारभारी मंडळीं यानीं आळंदी येथें इंद्रायणी नदीचे तीरीं त्यांच्या एका जवळच्या आप्ताकडून त्यांची उत्तरक्रिया यथासांग करविली. पुढें विंचूरकरांचे मोठेपणास योग्य अशा प्रकारें पेशवे व इतर इष्टमित्र यानीं त्यांच्या कुटुंबाचें समाधान केलें.

नरसिंहराव यांस दोन स्त्रिया होत्या. प्रथम स्त्री अहमदाबाद येथील सरसुभे भवानी शिवराम काळे यांची कन्या होती. ती निवर्तल्यावर सुरू या आडनांवाचे प्रसिद्ध गृहस्थाचे कन्येशीं त्यांचा विवाह झाला. नरसिंहराव यांचे मरणसमयीं त्या बाईस नुकताच ऋतुप्राप्त झाला होता. त्या बाईचें नांव रमाबाई होतें. सन १८०८ इ. चे आगष्ट महिन्यांत कारभारी बाळोबाबावा वगैरे ह्यांनीं श्रीमंतांच्या परवानगीनें ह्याच बाइच्या मांडीवर दत्तक देऊन विंचूरचें संस्थान त्या दत्तकाच्या नांवानें चालविलें. यासंबंधी सर्व हकीकत पुढें विठ्ठलराव नरसिंह यांच्या चरित्रांत आढळून येईल. सन १८१८ इसवी सालीं म्हणजे दक्षिणेंत इंग्रजी अंमल होण्यापूर्वी दोन वर्षें ह्या बाई

यमाजीपंत अण्णा सालकाढे, विंचुर संस्थानचे पोतनीस, यांस बरोबर घेऊन काशीयात्रेस निघाल्या. तेव्हां त्यांजबरोबर पागा वगैरे इतमाम होताच. शिवाय त्यांनीं धर्मार्थ स्वतःचे खर्चानें पुष्कळ यात्रा बरोबर नेली होती. प्रथम नर्मदातिरीं ओंकारेश्वर येथील व नंतर उज्जनी येथील महाकाळेश्वराची अशा यात्रा करून त्या बाई ग्वाल्हेरीस गेल्या. त्या वेळेस विंचूरकरांचे वकील गणेश राजाराम हे पागा वगैरे सरंजाम घेऊन बाईस चार मजला सामोरे आले. दौलतराव शिंदे यांजकडूनही एक मोठा कामगार त्यांस सामोरा आला. त्यानें मोठ्या सत्कारानें त्यांस ग्वाल्हेरीस नेल्यावर शिंद्यांनीं त्यांस सर्व यात्रेसुद्धां एक महिनाभर ठेवून घेतलें. तेथून त्यांनीं त्रिस्थली यात्रेस जाऊन मोठ्या खर्चानें सर्व मंडळीसह ती यात्रा केली. पुर्वी काशी येथें काळभैरवाचें मंदिर लहान होतें; तें त्यांनीं उस्तरून यमाजीपंत अंण्णाचे मार्फत नवीन बांधिलें. त्या मंदिराचे मागील बाजूचे भिंतीवर यमाजीपंत अंण्णानीं शिलालेख स्थापन केला आहे तो येणेंप्रमाणेः—

श्रीमान्‌डभैरवायनमः ॥ श्रीमत्काशी पुराधिशो भैरवः पापभक्षकः ॥ अन्वर्थनामा भगवान्पायाद्भक्तजनं स्वयं ॥ १ ॥ श्रीमद्दक्षिणदिग्राजशाहोः सातारवासिनः ॥ पेशवोपाभिद्यो मुख्य प्रधानस्तु प्रतापवान् ॥ २ ॥ वाजीरावः पुण्यपुराधीशस्तस्य चमुपतेः ॥ नृसिंहस्यरमाभर्तुर्विंचूरग्रामवासिनः ॥ ३ ॥ कोशाध्यक्षो लौहिताख्यगोत्रोनारायणात्मजः ॥ ऋकशाखी यमुनापुत्रौ यमाजी पंडितः कृती ॥ ४ ॥ कालभैरवनाथाय मंदिरं सुमनोहरं ॥ नवीनं कारयित्वात्र भक्त्या तस्मैसमर्पयत ॥ ५ ॥ संवत् १८७४ श्रावण शुद्ध ८ शके १७३९.

अर्थ—"जो काशी क्षेत्राधिपति असून पापभक्षक हें यथार्थ नाम ज्यास आहे, असा काळभैरव भक्तजनांचें स्वतः रक्षण करो. सातारा नांवाच्या शहरांत वास्तव्य करणारा आणि दक्षिण देशाधिपति असा शाहुराजाचा पेशवे उपनामाचा पराक्रमी मुख्य प्र-

श्रीमान बाजीराव पुण्याचे गादीवर असतां त्याचे सेनापति रमाबाईचे भ्रतार नरसिंहराव विंचुरकर यांचे पोतनीस नारायणराव यांपासून सौभाग्यवती यमुना बाईचे पोटीं जन्मलेले, ऋग्वेदी आणि ज्यांचें गोत्र लोहित, असे लोकमान्य जे यमाजीपंत त्यांनीं या क्षेत्रांत नूतन मंदिर तयार करवून संवत् १८७४ शके १७३९ श्रावण शुद्ध ८ रोजीं परमभक्तीनें श्री कालभैरवनाथ याकरणें समर्पण केलें.''

शिवाय त्यांनीं कालभैरवाचे मंदिराजवळच एक शिवमंदिर बांधिलें. या प्रमाणें सर्व यात्राविधि आटपल्या नंतर त्यांनीं देशीं परत येण्याची तयारी केली. तों पेशवे मालकम साहेबांचे स्वाधीन होऊन दक्षिणेंत इंग्रजी अम्मल झाल्याची वार्ता त्यांस कळली; तेव्हां त्या उदास होऊन पुनः तीर्थयात्रा करण्यास निघाल्या; आणि मथुरा, गंगोत्री, केदार व नारायण ह्या यात्रा करून गंगातीरानें प्रयागास आल्या. तेथें विठ्ठलराव नरसिंह यांजकडून त्यांस आणण्याकरितां कारकून वगैरे गेले. त्यांजबरोबर त्या विंचुरास आल्यावर विठ्ठलराव नरसिंह यांनीं त्यांचा उत्तम प्रकारें बंदोबस्त ठेविला; तत्रापि, आपण स्वतंत्र नेमणूक करून घेऊन तिजबद्दल निराळे गांव तोडून घ्यावे अशी त्यांस इच्छा प्राप्त झाली; परंतु ती सिद्धीस न गेल्यामुळें त्या वेळचे गव्हरनर एल्फिनस्तन् साहेब यांजकडून आपले इच्छेप्रमाणें बंदोबस्त करूनघ्यावा म्हणून त्या पुण्यास गेल्या. पण त्यांचा तो उद्देश शेवटास न जातां शके १७४३ माघ शुद्ध १५ म्हणजे सन १८२२ इसवी सालीं पुणें मुक्कामीं त्या बाईस देवाज्ञा झाली.

मरणकालीं नरसिंहराव याची उमर पुरी पंचवीस वर्षांचीही नव्हती. होळकरांशीं लढाई झाल्यापासून म्हणजे आपले वयाचे १८ वे वर्षापासून ते स्वतंत्रपणें अधिकार चालवूं लागले. पुढें पांच साहा वर्षें पर्यंत जे दंगे धोपे चालले त्यांचा बंदोबस्त करण्यांत, व एकंदरीनें पाहातां, त्यांचे ते वय फिकीरींतच

गेलें, यामुळें त्यांचे हातून विशेष लिहिण्यासारखें मोठें धर्मकृत्य झालें नाहीं; परंतु ते दरवर्षास कशीही अडचण असली तरी फुरसत करून आपला कुलस्वामी नरहरी याचे दर्शनास्तव नरसिंहपुरास जात असत. तेथें किमानपक्ष पंधरा दिवस तरी मुक्काम करून ते दररोज देवाची माहापूजा करीत; व मुक्ताहार ठेऊन ब्राम्हणभोजन घालीत. त्यांनीं नरहरीस उत्तम प्रकारचें जवाहीर दिलें, त्यांपैकीं अद्यापपर्यंत कांहीं कायम असून तें सणावाराचे दिवशीं देवाचे आंगावर घालण्यांत येतें.

नरसिंहराव हे फार गोरे असून सुस्वरूप होते. त्यांची आंगकाठी उंच व भव्य होती. हरएक प्रकारें त्यांची ऐंट शिपाईगिरीची असे. शरीर जाडें असून ऐंटदार होतें. ते नेहेमीं बाराशें जोर काढून दोन घोडयांचा फेरफटका केल्याशिवाय कधींही राहत नसत. त्यांची मुदगलांची जोडी अद्याप पर्यंत विंचुर येथें आहे. ती पेलणारा पुरुष सांप्रत क्वचितच आढळेल. त्यांचा आहारही तसाच मोठा होता. ते पांच शेर दूध पिऊन शिवाय दुवक्ता सर्वांबरोबर भोजन करीत असत. त्यांनीं आपलें शरीर परकीय मनुष्यास उघडें कधींही दाखविलें नाहीं. सर्वकाल आंग आच्छादित ठेवीत असत. ते परस्त्रीस केवळ मातेप्रमाणें मानीत. त्यांचा स्वभाव अत्यंत मानी असे. या दोन गोष्टींचीं दोन उदाहरणें खालीं लिहितों.

ते एके दिवशीं श्रीमंत बाजीराव साहेब यांजबरोबर एकांतांत कांहीं गोष्टी बोलत असतां, विनोदास्तव श्रीमंत कांहीं दुसरे कामाचे निमित्त करून सत्वरच परत येण्याचे उद्देशानें उठून गेले. नंतर प्रसिद्ध दिक्षितीण बाई तेथें आली; आणि तिनें नरसिंहरावांची थट्टा करून त्यांचे आंगरख्यास हात लाविला. तेव्हां नरसिंहराव यांचा चेहरा बदलला आणि त्यांनीं तरवारीस हात घालून ती अर्धी बाहेर काढिली! तेव्हां ती बाई भयाभीत होऊन तेथून सत्वर निघून गेली. हें वर्तमान श्रीमंतांस समजतांच त्यांनीं दुसरे दिवाणखान्यांत जाऊन

एक हुजऱ्याबरोबर नरसिंहराव यांस असा निरोप पाठविला कीं, "तुम्हीं आतां घरीं जावें." त्या प्रमाणें नरसिंहराव घरीं गेल्यावर त्यानीं श्रीमंतांस अशी विनंति सांगून पाठविली कीं, "अमर्याद रीतीनें सेवा करण्यास मी नाराजी आहें; माझे पूर्वजांनींही अमर्यादेनें वर्तून सरकारची सेवा केली नाहीं; व मी ही करणारा नव्हे. हें स्वामीस बरें न वाटेल तर मला रजा द्यावी. मी नौकरी सोडण्यास तयार अहें."

दुसरी गोष्ट अशी कीं, सदाशिव माणकेश्वर हे शेवटचे बाजीराव यांचे कृपेनें पुष्कळच वाढून पेशवाईचा सर्व कारभार पाहूं लागले. त्यांशीं नरसिंहराव हे बांकून राहत असून, आपलें कोणतेंही काम त्यांस न समजावितां हुजूर श्रीमंतांचे कानावर घालून त्याचा निकाल त्यांकडुन लावून घेत असत. त्यामुळें माणकेश्वर यांस वैषम्य वाटे. परंतु नरसिंहराव यांचे तेजापुढें त्यांचा इलाज चालेना. माणकेश्वर हे दरवर्षीस आपलें वतनाचें गांव टेंभुर्णी येथें जात असून, बरोबर कोण्या तरी सरदाराची पागा नेत असत. एके वर्षीं त्यांनीं श्रीमंतांस अशी विनंति केली कीं, "या सालीं विंचुरकरांकडील पागा बरोबर घेऊन जाण्याविषयीं आज्ञा असावी." श्रीमंतांनीं तसें करण्याविषयीं त्यांस रुकार दिला आणि नरसिंहराव यांस असा हुकूम पाठविला कीं, "तुम्हीं आपले फौजे पैकीं दोन पागा माणकेश्वरांबरोबर पाठवाव्या." या हुकुमाचें उत्तर नरसिंहराव यांनीं वकिलाबरोबर पाठविलें कीं, "माणकेश्वरांबरोबर आमची फौज कधींही जाणार नाहीं. दुसरा कोणी पुरातन सरदार अगर मुत्सद्दी यांजबरोबर ती पाठविण्याविषयीं मला हुकूम होईल तर मी ती पाठवीन इतकेंच नाहीं, तर, स्वतः सुद्धां जाईन. माणकेश्वर हे प्राचीन सरदार अगर मुत्सद्दी नसून केवळ दैवानेंच उदयास आले आहेत. त्यांचे हुकूमतीखालीं फौज देणें हें मला योग्य वाटत नाहीं. याबद्दल माफी असावी."

# विठ्ठलराव नरसिंह यांचें चरित्र.

## प्रकरण १ लें.

वर नरसिंह खंडेराव यांचे देहांताचा वृत्तांत लिहिण्यांत आला. आतां आह्मीं विठ्ठलराव नरसिंह यांचें चरित्र लिहिण्यास आरंभ करितों.

नरसिंहराव यांचें प्राणोत्क्रमण झालें त्या वेळेस त्यांस पुत्र संतति झालेली नव्हती; सबब त्यांचे मुख्य कारभारी बाळोबा बाबा, फौजेवरील मुख्य अधिकारी बापूराव नाना कोटमगांवकर व वकील काशीपंत बाबा जोगळेकर, शिवाय फौजेंतील पुरातन सरदार वगैरे पुष्कळ मंडळी यांनीं जमून आतां पुढें कशी व्यवस्था करावी, ह्याविषयीं विचार केला. त्यांत नरसिंहराव यांची स्त्री रमाबाई यांस दत्तक देऊन पूर्ववत् संस्थान चालवावें असें ठरलें; परंतु प्रथम तसें करण्यास श्रीमंत बाजीरावसाहेब यांची परवानगी मिळविणें अवश्य होतें. सबब बाळोबा बाबा व काशीपंत बाबा या उभयतांनीं श्रीमंतांची भेट घेऊन त्या बाबदींत त्यांस विनंति केली. तेव्हां श्रीमंतांची आज्ञा झाली कीं, "हा सर्व मजकूर तुम्हीं सदाशिवपंत भाऊ माणकेश्वर यांस कळवावा, म्हणजे या संबंधानें काय व्यवस्था करावयाची ती ते सांगतील." त्यावरून ते उभयतां माणकेश्वर यांजकडे गेले. पूर्वीपासून विंचुरकर यांचे दौलतीविषयीं माणकेश्वर यांस वैषम्य वाटत होतेंच. तशांत कालगतीनें विंचुरकर यांचे बरेंवाईट करण्याचा अधिकार त्यांजकडे आला. मग काय विचारावें? "अगोदरच उल्हास, त्यांत फाल्गुनमास" अशी लोकांची म्हण आहे, त्याप्रमाणें त्यांनी विंचूरकर घराण्याचें नुकसान करण्याचा निश्चय करून, बाळोबा बाबा यांस असें सांगितलें कीं, "सांप्रत सरकारांत खालसा मुलूक फार थोडा राहिला आहे; तशांत हालीं इंग्रजांकडील फौज दरबारांत चाकरी करीत असल्यामुळें सरकारास पूर्वीप्रमाणें जुन्या फौजेची गरज राहिली नाहीं. शिवाय कितीएक कारणांस्तव श्रीमंत द-

त्तक घेण्यास परवानगी देतील असें मला वाटत नाहीं. तथापि तुम्हांकरितां मी त्यांस विनंति करण्यास आळस करणार नाहीं. "

या कामीं माणकेश्वर यांजकडे येण्याजाण्यांत बाळोबा बाबा व काशीपंत बाबा यांचे दोन महिने गेले; परंतु माणकेश्वर यांनीं त्यांस कधीं धरसोडीचे व कधीं टाळाटाळीचे जबाब देऊन त्यांस बहुत रंजीस केलें. शेवटीं त्यांचा नाद सोडून खुद्द श्रीमंत यांसच पुन्हा विनंति करावी असा बाळोबा बाबा यांनीं निश्चय केला. मग बाजीराव साहेब एके दिवशीं खुषींत असतां, बाळोबा बाबा व काशीपंत बाबा यांनीं तेथें जाऊन त्यांस विनंति केली कीं, " विठ्ठल शिवदेव यांनीं थोरले बाजीराव साहेब, चिमाजी आपा साहेब, नाना साहेब व दादा साहेब यांची समयोचित नौकरी कशी बजाविली, व त्यांचे पुत्र शिवाजी विठ्ठल हेही सरकारचे किती उपयोगीं पडले हें सरकार जाणत आहेच; तसेंच नरसिंहराव यांनीं शूरत्वाचीं कामें कसकशीं केलीं, हें श्रीमंतांनीं प्रत्यक्ष पाहिलेंच आहे. आतां त्यांचें नांव पुढें चालावें अशी आम्हांसर्वांची अंतःकर्ण पूर्वक इच्छा आहे. ती पूर्ण करण्याची मालिकांनीं कृपा न-केली तर, स्वर्गीं श्रीमंत दादासाहेब हे काय म्हणतील याचा जरा विचार व्हावा, आणि मग या संबंधानें जी आज्ञा होणें असेल ती व्हावी. अतःपर आह्मी माणकेश्वर यांजकडे जाणार नाहीं. " त्याजवर बाजीराव साहेब बोलले कीं, " तुम्हीं जें कांहीं विदित केलें तें मी जाणत आहें. विठ्ठल शिवदेव हे आमचे वडील दादा साहेब यांचे केवळ आत्मलिंगच होते यांत संशय नाहीं. नरसिंहराव यांनींही माझी सेवा अंतःकरणापासून केली आहे. याकरितां विंचुरकरांचें संस्थान पूर्ववत् चालविण्यांत मजकडून बिलकूल कसर होणार नाहीं. तुम्हीं दत्तक घेण्याकरितां मुलगा पाहून आणावा. नजराणा मात्र रीतीप्रमाणें दिला पाहिजे. माणकेश्वर यांचें मत असें आहे कीं, किमानपक्ष दाहा लक्ष रुपये तरी नजराण्याबद्दल घेतले पाहिजेत. याविषयीं मात्र तुमचें ह्मणणें

काय आहे तें कळवावें." त्याजवर त्या उभयतांनीं विनंति केली कीं, "आमचे मालिकांचे दौलतींत आजपर्यंत कधींही शिलक राहिली नाहीं. रास्ते, राजेबाहादर, वगैरेची जशी शिलक बाळगण्यासारखी स्थिति आहे, त्याप्रमाणें आमचे मालिकांची कधींही नव्हती; इतकेंच नव्हे, तर, सांप्रत विंचुर संस्थानास कर्जही आहे; पाहिजे असल्यास याबद्दल चवकशी व्हावी. विठ्ठल शिवदेव यांचे घराण्यापासून नजराणा घेणें हें श्रीमंतांस उचित वाटत असेल तर सर्व संस्थान सरकारचेंच आहे; पाहिजे तें त्यांतून घ्यावें." त्याजवर श्रीमंत बोलले कीं, "निदान तीन लक्ष रुपये तरी नजराण्याबद्दल तुम्हास द्यावे लागतील. हाल्लीं तुह्मांपाशीं शिलक नसल्यास तुह्मीं उभयतांनीं चिठ्ठी लिहून द्यावी. थोडक्यांच दिवसांत ती चिठ्ठी मी तुम्हास परत देईन; पण या वेळेस तुम्हीं नाहीं ह्मणूं नका." तेव्हां उभयतांनीं आज्ञेप्रमाणें लागलीच चिठ्ठी लिहून दिली. नंतर श्रीमंतांनीं कारकुनाबरोबर माणकेश्वरांस सांगून पाठविलें कीं, "विंचुरकर यांस दत्तक घेण्याची मी परवानगी दिली आहे; व नजराण्याबद्दल त्यांच्या कारभाऱ्यांनीं मुदतीची चिठ्ठी लिहून दिली आहे, त्याप्रमाणें कागदीं जमाखर्च व्हावा." हें झाल्यावर बाळोबा बाबा यांनीं विंचुरकरांचे निकट भाऊबंदांचे घराण्यांतील चार पांच मुलगे पसंद करून पेशव्यांचे भेटीस नेले. त्यांत गोपाळ परशुराम यांचे ज्येष्ट चिरंजीव दाहा वर्षांचे उमरीचे होते,त्यांची चलाखी व मुखावरील तेज पाहून श्रीमंतांस संतोष वाटला. तेव्हां "या मुलाचा विद्याभ्यास किती झाला आहे?" असें श्रीमंतांनीं विचारिलें. त्यावरून त्यानें श्रीमंतांचे हुजूर एक बंदभर मजकूर बिनचूक लिहून दाखविला; व शिवाय तोंडीं पुसलेले हिशेबांचीं ही उत्तरें तात्काळ सांगितलीं. तसेंच जोशाकडून आलेले सर्व मुलांच्या टिपणांचा विचार करितां त्यांत या मुलाचे ग्रह उत्तम ठरले. खेरीज याची सामुद्रिक लक्षणेंही उत्तम प्रकारचीं आहेत,

असें दिसून आल्यावरून हाच मुलगा नरसिंहराव यांचे मागें सरदारीस कायम करावा असें सांगून श्रीमंतांनीं बाळोबा बाबा यांस निरोप दिला. नंतर नरसिंहराव यांचें कुटुंब रमाबाई ह्या तुळापुरास जाऊन ब्राह्मणधर्माप्रमाणें शेष राहिलेला तीर्थविधि करून परत आल्या.

पुढें कारभारी मंडळीनें त्या मुलास सुमुहूर्तावर रमाबाईसाहेब यांचे मांडीवर देऊन त्याचें दत्तविधान करविलें. या दत्तविधानाचे वेळेस पदरचे सर्व सरदार, मुत्सद्दी, गांवांतील सभ्य गृहस्थ व शेट सावकार वगैरे यांनीं आहेर केले. त्याचप्रमाणें श्रीमंतांकडूनही सदाशिव माणकेश्वर यांनीं आहेर केला. नंतर सर्व संस्कार मोठ्या समारंभानें शेवटास गेला. दत्तक घेतलेल्या मुलाचें मुळचें नांव केशवराव असें होतें; परंतु दत्तक घेणाऱ्या मातुश्रीनीं त्याचें तें नांव बदलून विठ्ठलराव असें ठेविलें; आणि रीतीप्रमाणें साखर वाटविली. नंतर कारभारी यांनीं त्या समारंभास आलेल्या सर्व मंडळीस शिष्टसांप्रदायाप्रमाणें अत्तर, गुलाब व पानसुपारी देऊन विडा केलें. पुढें कारभारी यांनीं स्वारीची तयारी करून नवीन दत्तक झालेल्या मुलास मोठ्या थाटानें श्रीमंतांचे दर्शनास नेलें, आणि त्याजकडून श्रीमंतांस साष्टांग नमस्कार घालविला. श्रीमंतांनीं बहुत संतुष्ट होऊन, माणकेश्वर वगैरे मुत्सद्दी मंडळी दरबारांत हाजिर असतां, विठ्ठलराव यांस मोठ्या उत्साहानें सरदारीचीं वस्त्रें व माहालांच्या सनदा दिल्या; आणि थोडक्याच वेळानें त्यांस कारभाऱ्यांबरोबर घरीं परत पाठविलें. नंतर कारभारी यांनीं विठ्ठलराव यांजकडून पुणें शहरांतील प्रसिद्ध देवांचीं दर्शनें करविलीं. ते घरीं आल्यावर त्यांनीं खासगी मंडळीचा मोठा दरबार भरविला; आणि त्यांत विठ्ठलराव यांचे हातानें कित्येक मंडळीस पोषाग देवविले; कितीएक ब्राह्मण मंडळीस वर्षासनाच्या सनदा देवविल्या; आणि सर्वांस पानसुपारी देऊन दरबार बरखास्त केला.

विठ्ठलराव हे त्यावेळेस कारकुनी विद्येंत बरेच प्रवीण होते. त्यांजकडून सरदारीस योग्य अशा प्रकारचा आभ्यास, म्हणजे

घोड्यावर बसून फेरफटका करणें, बोथाटी करणें, बंदुकीनें शिस्त धरून निशाण मारणें, वगैरे गोष्टी करविण्यास्तव कारभारी यांनीं पदरचे मानकरी मंडळींतील पांडोबा सोळसकर या नांवाच्या एका गृहस्थाची नेमणूक केली. सदहू मनुष्य शिपाईगिरीचे सर्व कसबांत मोठा प्रवीण होता. तसेंच त्यांजकडून तालीम करविण्यांस त्यानीं एका उत्तम वस्तादाची योजना केली; आणि इतर विद्या व कला शिकविण्याकरितांही एक उत्तम मनुष्य नेमुन त्याजकडून उत्तम प्रकारें अभ्यासाचा क्रम चालविला.

फौजे संबंधी सर्व व्यवस्था बाबूराव नाना हे पाहातच होते. दौलतीचा कारभार, म्हणजे मुलकी काम चालवून ताब्यांत असलेल्या किल्ल्यांची देखरेख व इतर किरकोळ कामें, यांचा बंदोबस्त खुद्द बाळोबाबाबा हे ठेवीत होते. श्रीमंतांकडील वकीलीचें काम काशीपंत बाबा जोगळेकर यांजकडे होतें. या शेवटच्या उभयतां गृहस्थावर कितीएक कारणास्तव श्रीमंतांची मोठी कृपा झाली; व पुढें कांहीं दिवसांनीं बाळोबाबाबा हे तर श्रीमंतांचे कारभारी मंडळांत प्रमुख होऊन त्यांचे दरबारांतील सर्व मसलती व इंग्रजांबरोबर बोलणें चालणें त्यांचे मार्फत चालूं लागलें. तेव्हां पेशव्यांनी त्यांस स्वतंत्र तैनात करून दिली, व पालखी देऊन तिजबद्दल नेमणूकही पृथक करून दिली.

कांहीं दिवसांनीं विट्ठलराव हे युद्धादीकलांत प्रविण झाले. या समयीं विठ्ठलराव व आबा साहेब पुरंदरे यांचें वय समान असून उभयतांचे आभ्यास सारख्याच प्रकारचे चालले असल्यामुळें त्या परस्परांची अत्यंत प्रीति जडली. उभयतांनीं दररोज मैदानांत जाण्याचा पाठ ठेवून घोडे फेरणें, बोथाट्या खेळणें व बंदुकीनें निशाण मारणें, हे आभ्यास पूर्ण घटविले. तेव्हां पुढें पुढें तर त्या दोघांचें प्रेम इतकें वृद्धिंगत झालें कीं, उभयतांची भेट झाल्याखेरीज एक दिवसही लोटत नसे. असा क्रम चालला असतां, ते उभयतां शिपाईगिरीचे विद्येंत चांगले प्रवीण झाल्याविषयीं चोहों-

कडे प्रसिद्धी झाली. त्यावरून त्यांची हुषारी कित्पत् आहे ती समक्ष पाहावी अशी बापू गोखले यांस इच्छा झाली. तेव्हां एके-दिवशीं ते दोघे मैदानांत घोडे फेरण्यास गेल्याची बातमी ठेवून बापूसाहेब स्वतः त्या ठिकाणीं गेले; आणि त्यांची कर्तबदारी पाहून त्यांस मोठें आश्चर्य वाटलें. नंतर ते विठ्ठलराव यांजबरोबर स्वतः बोथाटी खेळण्यास प्रवृत्तझाले, तेव्हां विठ्ठलराव हे आपले वस्ताद सोळसकर यांनीं उत्तम प्रकारें तयार केलेले मार्तंड नांवाचे घोड्यावर बसून त्यांजबरोबर बोथाटी खेळूं लागले; परंतु गोखले यांचें शरीर वायूचें असल्यामुळें अवजड होतें व विठ्ठलराव यांचे शरीर कसरतीनें कसलेलें असून त्यांचे तारुण्याची केवळ सुरुवातच होती; तशांत त्यांचा घोड्यावर बसणें वगैरेचा अभ्यासही नवाच तरतरीत होता; ह्यामुळें बोथाटी खेळण्याचे डावपेचांत गोखल्यांची बोथाटी चुकून त्यांजवर विठ्ठलराव यांची पांचसात वेळा सरशी झाली. तेणेंकरून बापू गोखले हे मनांत खजील झाले. इतक्यांत संध्याकाळ झाला, सबब त्रिवर्ग सरदार आपापले घरीं गेले. बोथाटी खेळण्यांत आपले पदरीं कमीपणा आला याचें कारण काय असावें म्हणून बापू गोखले हे रात्रीं आपले मनांत विचार करूं लागले. तेव्हां पुष्कळ वेळ तें त्यांच्या लक्षांत येईना; परंतु शेवटीं ज्या घोड्यावर विठ्ठलराव बसले होते तो घोडा फारच चपळ असल्यामुळें तशी गोष्ट झाली असें त्यांस खास वाटलें. त्यावरून तो घोडा कसा तरी विठ्ठलराव यांजपासून घ्यावा असा त्यांनीं इरादा केला. नंतर ती गोष्ट त्यांनीं कारभारी बाळोबा बाबा यांजपाशीं काढिली. त्यांनीं ती तात्काळ कबूल करून घरीं परत आल्यावर आपले मालिक विठ्ठलराव यांस तो घोडा गोखले यांस देण्याविषयीं विनंति केली; परंतु विठ्ठलराव यांनीं ती विनंति अगदीं अमान्य करून, मी आपला घोडा कधींही देणार नाहीं, असें त्यांस स्पष्ट सांगितलें. तेव्हां बाळोबाबाबा हे फारच लाचार झाले. तथापि ज्यापेक्षां गोखल्यावर श्रीमंतांचा

लोभ आहे, त्यापेक्षां त्यांस घोडा देणें हेंच प्रशस्त असून तो न देण्याचा आग्रह धरिला तर परिणाम चांगला होणार नाहीं, असें त्यांस वाटून त्यांनीं ती गोष्ट काशीपंत बाबा यांजवळ काढिली. तेव्हां ते बोलले कीं, "आपले मालिकांचे मर्जीतील घोडा त्यांजकडून आग्रहानें दुसऱ्यास देवविणें हें आपणास उचित नाहीं. गोखल्यांस पाहिजे तर त्याचे ऐवजीं दुसरे दाहा घोडे द्यावे" परंतु बाळोबा यांचें वचन गुंतलें होतें सबब ते मोठे विचारांत पडले. शेवटीं त्यांनीं विलक्षण हिय्या केला आणि तो घोडा विठ्ठलराव यांचे नकळत पागेंतून सोडून परभारें गोखले यांजकडे पाठवून दिला. या गोष्टीची खबर विठ्ठलराव यांस लागतांच त्यांची मर्जी अतिशय बेताल होऊन गेली; परंतु काशीपंत बाबानीं मोठे प्रयासानें त्यांची समजूत घालून त्यांचा राग शांत केला.

या संधीस फौजेवरील अधिकारी बाबूराव नाना हे परलोकवासी झाले. सबब विठ्ठलराव यांनीं त्यांचे चिरंजीव बाबाजी बाबूराव यांस त्यांचे वडिलांचे सरदारीवर कायम केलें; परंतु पुढें तेही अकस्मात मृत्यु पावले. त्यांस औरस पुत्रसंतति नसल्यामुळें विठ्ठलराव यांनीं त्यांचे भाऊबंदांपैकीं एक मुलगा त्यांचे स्त्रीस दत्तक देऊन त्याचें नांव आबूराव असें ठेविलें. हें नांव त्यांचे वंशाचे मूळ पुरुषास होतें. तो दत्तक अल्पवयस्क असल्यामुळें त्याचें काम चालविण्यास विठ्ठलराव यांनीं बाळाजी भगवंत म्हणून आपले पदरचा एक हुषार मनुष्य नेमिला.

सन १८०७ इ० सालीं नर्मदा नदीचे दक्षिणेकडील प्रदेशांत झालेले दंगे व पेंढारी लोकांच्या लुटालुटी यांचा बराच बंदोबस्त झाला असें आम्हीं पूर्वी नरसिंह खंडेराव यांचे चरित्रांत लिहिलें आहे. तथापि तो उपद्रव अजी नाहींसा झाला होता असें नाहीं. तशांत या वेळेस यशवंतराव होळकर यांचे फौजेंतून कित्येक नामांकित शूर सरदार निघून जाऊं लागले होते, व असे जे कोणी निघून जात ते हत्यारबंद लोक जमवून बंडें करीत. त्यामुळें पूर्वी-

प्रमाणें सर्वत्र अस्वस्थाता होऊन मुलूक उजाड होऊं लागला. हीं सर्व बंडें मोडून पेंढाऱ्यांचा विध्वंस करण्यास्तव आणि भिल्ल, कोळी, रामोशी वगैरे जातींचे लुटारु लोकांस चांगलें शासन करून ते पुढें सात्वीकपणाचे धंदे करून निर्वाह करितील व त्या प्रांतांतून पुनः कधींही दंगे होणार नाहींत असा पक्का बंदोबस्त करण्यास्तव बाजीरावसाहेब पेशवे व पुण्याचे रेसिडेन्ट यांमध्यें पत्रव्यवहार सुरू झाला. त्याचे अंतीं सदर्हू बंदोबस्त अवश्य करावा असें ठरल्यावरून, इंग्रज सरकारानें कर्नल वालेस साहेब यांस फौजेच्या एका टोळीनिशीं त्या मोहिमेवर पाठविलें; व पेशव्यांनीं आपले तर्फेनें विठ्ठलराव यांची योजना करून त्यांस आपली कायमची सर्व फौज व शिवाय इतलाक * फौज बरोबर घेऊन कर्नल वालेस साहेबास जाऊन मिळण्याविषयीं हुकुम केला. बाळोबा बाबा व काशीपंत बाबा हे आपले मालिकांची व्यवस्था लावून देण्याकरितां कांहीं दिवस पुण्यास राहिले. बाळोबा बाबानीं आपले चुलत बंधु कृष्णाजी शामराव यांस स्वारींतील कारभारी नेमिलें; व वरलिहिल्याप्रमाणें सर्व व्यवस्था लागल्यावर विठ्ठलराव हे सदर्हू मोहिमेवर चालते झाले.

उभयतां सेनापतींनीं आपापले लष्करानिशीं घोडनदी मुक्कामीं जाऊन छावण्या केल्या. तेथें त्यांचा असा विचार ठरला कीं, प्रथम खानदेशांत जाऊन तेथील बखेडा मोडावा. त्यावरून ते त्या प्रांतात गेले; आणि त्यांनीं आपल्या फौजेच्या निरनिराळ्या टोळ्या करून त्या पैकीं तीन टोळ्या खानदेशांत ठेविल्या; व एक टोळी बागलाणांत ठेवून दोन सातपुडा पर्वताचे रस्ते बंद करण्यास नेमिल्या. याखेरीज त्यांनीं एक टोळी नाशिकापासून चांदवडपर्यंत बंदोबस्त करण्यास ठेविली. कर्नल वालेस साहेब यांनीं खुद्द सातपुडा पर्वताचे पायथ्याशीं माळव्याचा रस्ता रोखून तळ दिला; व वि-

---

* प्रसंगोपात नवीन भरती केलेली.

ठ्ठलराव हे आपले हाताखालचे टोळीसुद्धां धुळ्यास राहिले. याप्रमाणें चोहोंकडे बंदोबस्त केल्यामुळें प्रजेस पेंढाऱ्यांचा उपसर्ग लागेनासा झाला; परंतु थोडेच दिवसांनीं होळकरांचे नौकरींतून निघालेला दादेखान नांवाचा एक बंगष पठाण हा कांहीं फौजेनिशीं नेमाड प्रांतांतून निघाला आणि जो रस्ता कर्नल वालेस साहेब हे रोखून राहिले होते तो रस्ता सोडून देऊन, दुसऱ्या मार्गानें खानदेशांत येऊन दाखल झाला. ही खबर विठ्ठलराव यांस धुळें मुक्कामीं समजतांच त्यांनीं फौजेसुद्धां कूच करून राणीपुरा येथें दादेखान याजवर हल्ला केला; व त्याचा अगदीं मोड करून त्याचे फौजेची वाताहात केली; आणि त्यास कैद करून पुण्यास पाठवून दिलें. याप्रमाणें चोहोंकडे बदमाष लोकांस दहषद बसून बंदोबस्त राहिल्यानें, रस्ते सुरळीत चालूं लागले; शेतकरी लोक जमिनीची उस्तवारी करूं लागले; व एकंदरीनें सर्व रयत सुखानें नांदूं लागली. नंतर विठ्ठलराव यांस कांहीं दिवस खानदेशांत राहण्यास सांगून, कर्नल वालेस साहेब हे घोडनदीस निघून गेले. तेथून त्यांनीं पुणें येथील रेसिडेंटास आपले स्वारीसंबंधी एकंदर रिपोर्ट केला. त्यांत त्यांनीं विठ्ठलराव यांची फारच तारीफ केली होती. हा मजकूर रेसिडेंट यांनीं पेशवे यांस कळविल्यावरून त्यांनीं त्याबद्दल विठ्ठलराव यांस शाबासकीचें पत्र पाठविलें.

पुढें थोडकेच दिवसानीं शूर्पकर्ण नांवाच्या एका मनुष्यानें बंड माजविलें. तो जरी वाणी जातीचा होता तरी मोठा साहसकर्मी होता. त्यानें खानदेशाच्या उत्तर भागांत तापी नदीचे आसपास आरब, रोहिले वगैरे कडवे लोक एकत्र करून धामधूम मांडिली. तो मुलूक लुटीत असून शिवाय खून करणें, घरें जाळणें, वगैरे अनेक तऱ्हेचे अनर्थ करीत असे. हें वर्तमान विठ्ठलराव यांस कळतांच त्यांनीं त्याजवर छापा घालून त्याचे लोकांची अगदीं दाणादाण करून टाकिली; आणि त्यासही एके ठिकाणीं गांठून त्याचें शिर उडविलें. याप्रमाणें या बंडाचा शेवट झाला.

वर लिहिल्याप्रमाणें झपाट्यानें बंदोबस्त होत गेल्यामुळें खानदेश, बागलाण व गंगथडी या प्रांतांत मोघलाईचे सरहद्दीपर्यंत तर स्वस्थता झालीच; परंतु या सुमारास उत्तर हिंदुस्थानांतील राजेरजवाडे यांजबरोबर इंग्रज लोकांनीं तह केल्यामुळें लढाईचें कारण नाहींसें होऊन पुष्कळ शिपाई लोक रिकामे झाले. ते टोळ्या जमवून दक्षिणेंत लुटालूट करण्यास येऊं लागले. त्यामुळें खानदेशांत पुनः उपद्रव होऊं लागला. सबब पेशवे व पुण्याचे रेसिडेंट यांनीं पुनः विचार करून असें ठरविलें कीं, जनरल स्मिथ साहेब व विठ्ठलराव विंचूरकर यांस त्या लुटारू लोकांचे बंदोबस्ताकरितां नेमावें. विठ्ठलराव हे त्या वेळेस खानदेशांतच होते. त्यांस जनरल स्मिथ साहेब यांस झटून मदत करण्याविषयीं श्रीमंतांकडून हुकूम गेला. त्यावरून विठ्ठलराव हे घोडनदीस जाऊन जनरल स्मिथ साहेबांस भेटले. त्या भेटींत उभयतांचें बोलणें होऊन त्यांत असें ठरलें कीं, सातपुड्यांतील सर्व डोंगरांच्या बाऱ्यांवर जागोजाग फौजा ठेऊन प्रथम पलीकडील पेंढारी लोक आलीकडे न येतील असा बंदोबस्त करावा; आणि मग जे लुटारू लोक पूर्वींच दक्षिणेंत आले असतील त्यांवर हल्ले करून त्यांचा अगदीं निःपात करून टाकावा. त्याबरहुकूम उभय सरदारांनीं फौजेच्या टोळ्या ठिकठिकाणीं ठेऊन सर्व रस्ते बंद केल्यावर दक्षिणेंत शिरलेल्या लुटारू लोकांवर फौजा पाठवून एकदम हल्ले केले. त्या हल्ल्यांत ते बहुतेक बंडवाले मारले गेले आणि जे शिलक राहिले ते लुटीचा धंदा अगदीं सोडून देऊन स्वस्वस्थतेनें आपापल्या गांवीं शेतकीचीं कामें करूं लागले. याप्रमाणें सर्वत्र शांतता झाल्यावर स्मिथसाहेब हे घोडनदी येथील छावणीस परत गेले. तेथून त्यांनीं पुण्याचे रेसिडेंटांस सदहू बंडासंबंधीं रिपोर्ट केला. त्यांत विठ्ठलराव यांनीं व त्यांचे फौजेनें चांगली मदत केली ह्मणून लिहिलें होतें. हा मजकूर रेसिडेंटांनीं पेश-

ब्यांचे दरबारास लिहून पाठविला. त्यावरून पेशव्यांनीं विठ्ठलराव यांची मोठीच वाहवा केली.

बाजीरावसाहेब पेशवे यांजजवळ त्रिंबकजी डेंगळे या नांवाचा एक हुजऱ्या होता. त्याजवर त्यांची मोठी मर्जी बसून त्यांनीं त्यास मोठ्या योग्यतेस चढविलें होतें. तो कांहीं राजकीय कारणास्तव इंग्रज लोकांचे कैदेंत असतां, तेथून युक्तीनें पळून गेला; आणि त्यानें भिल्ल, कोळी, रामोशी, आरब, रोहिले वगैरे लोक जमा करून मोठें बंड माजविलें. तें बंड मोडण्याविषयीं पुण्याचे रेसिडेंटांनीं पेशव्यांस सक्तीची सूचना केल्यावरून त्यानीं विठ्ठलराव यांस हूकूम केला कीं, " मोठा यत्न करून डेंगळ्याचें बंड अगदीं मोडून टाकावें;आणि त्याचे वतनाचे गांवीं खुद्द त्याचा वाडा व असबाब आहे तो सर्व जप्त करावा. " त्या हुकुमा बरहुकूम विठ्ठलराव यांनीं डेंगळ्याच्या फौजेचा शोध ठेविला आणि त्या लोकांवर दोन वेळा हल्ला करून त्यांस पळवून लाविलें; तत्रापि बंड अजी नाहींसें झालें नाहीं. सबब विठ्ठलराव यांनीं गुप्त बातमी ठेवून रात्रीचे वेळेस त्या बंडवाल्यावर छापा घातला. त्या छप्यांत बहुतेक बंडवाले मारले जाऊन कितीएक घोडे व इतर सामान विठ्ठलराव यांचे फौजेचे हातीं लागलें. फक्त त्रिंबकजी मात्र पळून गेला. नंतर विठ्ठलराव यांनीं नगर जिल्ह्यांत जाळीचें निंबगांव येथें त्याचें जें वतन होतें तें व त्याचा तेथील वाडा आणि आंतील दरोबस्त सामान असें जप्त केलें आणि ती हकीकत पेशवे यांजकडे लिहून पाठविली. तेव्हां श्रीमंतांनीं विठ्ठलराव यांजकडून आलेलें अस्सल पत्र आपले पत्रासोबत रेसिडेंटांकडे पाठवून दिले. त्यावरून रेसिडेंट फार खुष होऊन त्यांनीं विठ्ठलराव यांचे वकील काशीपंत बाबा यांस बोलावून सांगितलें कीं, " विठ्ठलराव यांनीं डेंगळ्याचें बंड मोडण्यांत सरकारची चाकरी उत्तमप्रकारें बजाविली; व इंग्रज हुद्देदारांबरोबर इतर कामांत त्यांनीं बहुत चांगलें वर्तन केलें, येणेंकरून आम्हांस मोठी खुषी झाली असून हा

मजकूर आम्ही गव्हरनर जनरल यांस लिहून कळवूं. ही हकीकत तुम्हीं आपले मालिकांस कळवावी.''

त्यानंतर विठ्ठलराव यांनीं, जे भिल्ल लोक गंगथडींत वारंवार दंगा व लुटालुट करीत असत त्यांचे नायकांस अभयवचनें देऊन भेटीस बोलाविलें, आणि जे हाजिर झाले त्यांचे वाजवी हक्क होते ते कबूल करून त्यांचा बंदोबस्त केला. त्या लोकांचे ते हक्क अद्यापि इंग्रज सरकाराकडून चालत आहेत. बाकीचे जे कित्येकजण भेटीस न येतां पूर्ववत् लुटालूट करूं लागेल, त्यांजवर त्यांनीं वारंवार हल्ले करून त्यांचा अगदीं नाश केला. याप्रमाणें सर्व गंगथडीत स्वस्थता करून विठ्ठलराव पुण्यास गेले. तेथें त्यांनीं श्रीमंतांचीं भेट घेऊन त्यांस स्वारींतील सर्व मजकूर निवेदन केला. तेव्हां श्रीमंतांनीं वहुत संतोष दर्शविला; आणि त्यांचें दस्तविधान होण्यापूर्वी त्यांचे कारभाऱ्यांपासून नजराण्याबद्दल जी तीन लाख रुपयांची चिठ्ठी लिहून घेतली होती, ती बक्षिस म्हणून त्यांस परत दिली.

विठ्ठलराव यांचे वडील नरसिंह खंडेराव विंचुरकर यांचे कारकीर्दीत त्यांचे घराण्यांचें उत्तर हिंदुस्थानांतील कांहीं माहाल शिंदे यांचे लष्करी सरदार अंबाजी इंगळे, जानबाप्टिस्ट दतियावाले राजे, आणि इतर ठाकूर संस्थानिक यांनीं बळकाविले होते. ते परत घेण्याकरितां स्वतः उत्तर हिंदुस्थानांत जाण्यासाठीं नरसिंहराव यांनीं पेशव्यांची परवानगी मागितली असून ती त्यांस मिळाली होती; परंतु पुढें त्यांस एकाएकीं देवाज्ञा झाल्याकारणानें त्यांचें जाणें त्या प्रांती न होऊन ते माहाल त्या लोकांकडे तसेच राहिले. ते परत घ्यावे म्हणून विठ्ठलराव यानीं आपले दिवाण बाळोबाबाबा यांचे मार्फत ग्वाल्हेर येथील रेसिडेंट कर्नल क्लोज व इतर इंग्रज हुद्देदार यांस दौलतराव शिंदे यांजपाशीं मध्यस्थी करण्याविषयीं विनंति केली. ती विनंति कर्नल साहेब यांनीं मान्य करून त्या बाबदींत शिंदे यास पत्र लि-

हिलें कीं, " कांहीं वर्षांपूर्वी आपले कित्येक कामगार व बुंदेल खंडातील संस्थानिक यांनीं विंचुरकर यांचे उत्तर हिंदुस्थानांतील माहाल बळकाविले असून आजवर ते त्यांचा वसूल घेत आहेत हें नीट नाहीं; याकरितां ते माहाल विंचुरकर यांस तावडतोब परत देववावे; नाहीं तर इंग्रज सरकारास त्या बाबतींत सक्तीची तजवीज करणें जरूर होईल." शिंदे यांनीं ती गोष्ट तात्काळ कबूल करून आपल्या ज्या कामगारांनीं विंचुरकर यांचे माहाल बळकाविले होते त्या कामगारांकडून पूर्वी वसूल केलेल्या एकंदर ऐवजासुद्धां ते विठ्ठलराव यांचे तर्फेचे वहिवाटदारांस परत देवविले; आणि त्या खेरीज दत्तियावाले राजे व इतर संस्थानिक यांनीं जी त्यांची ठिकाणें बळकाविलीं होतीं तींही त्यांजकडून सदहू वहिवाटदार यांचे स्वाधीन करविलीं.

कर्नल वालेस व स्मिथ साहेब यांनीं खानदेशचे उत्तर भागांत पेंढारी लोकांवर वारंवार स्वाऱ्या करून त्या लोकांचे दंगे मोडले होते; परंतु ते लोक आपले माळव्याचे जंगलांतील मुख्य ठिकाणांतून वेळोवेळ बाहेर पडून बऱ्हाड प्रांत व दक्षिणेचा उत्तर भाग यांवर लुटीकरितां स्वाऱ्या करीत. तेणेंकरून पूर्वी खानदेशांत झालेली स्वस्थता व्यर्थ झाल्यासारखें होऊन त्यांनीं वऱ्हाडांत मोठा प्रळय चालविला होता. त्या वेळेस त्यांची एकंदर संख्या सुमारें पन्नास हजार झाली होती. त्यांस आंतून कित्येक राजेरजवाडे यांची मदत असून त्या राजे लोकांकडील बरतर्फ झालेल्या ज्या नोकरांस वतनें किंवा स्थावर मिळकती नव्हत्या ते लोक सदहू पेंढारी लोकांत मिळत होते. अशा प्रकारें पेंढारी लोक प्रबळ होत चालल्यामुळें ते पुढें अनिवार्य होण्याची इंग्रज लोकांस भीति प्राप्त झाली. तेव्हां पेंढारी लोकांच्या राहाण्याच्या मुख्य ठिकाणावर चोंहीकडून एकदम हल्ले करून त्याचें निर्मूळ करावें असा त्यांनीं ठराव केला. ही गोष्ट मोठ्या शाहाणपणाची असून इंग्रज लोकांच्या राज्याचा पाया मजबूत हो-

ण्यास कारणीभूत झाली. वर लिहिलेला ठराव अमलांत आणण्यास्तव गव्हरनर जनरल यांचे हुकुमावरून बंगाल्यामध्यें ४४००० व दक्षिणेंत ७०००० इतकी फौज तयार झाली. दक्षिणेंतील फौजेवर सरदार होते ते येणेंप्रमाणें.—पहिले तुकडीवर सर टामस हिस्लाप, दुसरे तुकडीवर ब्रिगेडियर जनरल डोवटन, तिसरे तुकडीवर सर जान मालकम व चवथे तुकडीवर ब्रिगेडियर जनरल स्मिथ.

जनरल स्मिथ यांची योजना खानदेशचे उत्तर भागांतील पेंढाऱ्यांवर झाली होती. त्यांचे मदतीस पूर्ववत विठलराव विंचूरकर यांस देण्याविषयीं पुणें येथील रेसिडेंट एलफिन्स्टन साहेब यांनीं वकीलमार्फत पेशव्यांचे दरबारास पांच कलमांची यादी पाठविली. त्यांपैकीं पहिली चार कलमें, विठलराव यांचे हाताखालचे फौजेचे व्यवस्थेबद्दल असून, शेवटचे कलमांत खालीं लिहिल्याप्रमाणें मजकूर होता.

" विंचूरकर यांनीं सर्व प्रकारें इंग्रज सरकारचे सरदारांचे हुकमतींत वागावें. इंग्रज सरकारचे हुद्देदार विंचुरकर यांचे वर्तनाविषयीं सिफारिष अगर गिल्ला करतील त्यावर त्यांची सरदारी अवलंबून राहील असें त्यांनीं पक्कें समजावें.

" या सर्व कलमांतील मजकूर श्रीमंतांनीं विंचुरकर यांस स्वमुखें सांगून जनरल स्मिथ यांचे लष्करात सत्वर जाऊन मिळण्याविषयीं त्यांस हुकूम द्यावा. "

सदर्हू मजकूर पेशव्यांनीं विठ्ठलराव यांस कळवून स्मिथ साहेबांचे छावणीस जाण्याविषयीं त्यांस हुकूम केला.

या मोहिमेकरितां विठ्ठलराव यांजकडे नवीन इतलाक फौज दिलेली होती. तिचे खर्चास वारंवार अडचण पडूं लागली. सबब गंगथडी, खानदेश व बागलाण या प्रांतांचे सरसुभे बाळोबाबाबा, ह्मणजे विंचूरकरांचे कारभारी, यांस पेशव्यांकडून असा हुकूम गेला कीं, सदर्हू प्रांतांचें दरोबस्त उत्पन्न विठ्ठलराव यांचे

इतलाक फौजेचे खर्चास देत जावें. ही व्यवस्था विठ्ठलराव कूच करून जाण्यापूर्वींच करण्यांत आली होती.

वरील कलमात असें लिहिलें आहे कीं, बाळोबाबाबा हे विंचुरकरांचे कारभारी असून पेशव्यांकडील गंगथडी, खानदेश व बागलाण या प्रांतांचे सरसुभेही होते. या गोष्टीच्या संबंधानें वाचकांस घोटाळा न पडावा म्हणून येथें त्याबद्दल जरा अधिक खुलासा करणें अवश्य आहे. सदर्हू बाळोबाबाबा सालकाढे हे विंचुरकर घराण्याचे पिढीजादे दिवाण असून मोठे हुशार मुत्सद्दी होते. बाजीराव साहेब यांचे कारकीर्दीचे आरंभापासून पेशव्यांचे दरबारांत त्यांचा पुष्कळ काळ गेला असून ते कितीएक प्रसंगीं श्रीमंतांचे फार उपयोगीं पडले होते. सबब त्यांची चोहीकडून प्रसिद्धी होऊन त्यांजवर बाजीराव साहेब यांचा मोठा लोभ बसला. तेव्हां श्रीमंतांनीं सन १८०५ इ० सालीं खानदेश, बागलाण व गंगथडी यांजवर त्यांस सरसुभे नेमिलें, व त्या प्रांतांतील भिल्ल, कोळी, रामोशी, कैकाडी, मांग वगैरे हलक्या जातीचे दंगेखोर लोकांचा बंदोबस्त करण्याचें काम त्यांजकडे सांगून त्यांचे मदतीस मनोहरगीर गोसावी यांस आपले हाताखालचे पांच साहा हजार फौजेनिशी दिलें. सदर्हू दंगे मोडण्यासाठीं बाळोबाबाबा यांनीं अनेक तऱ्हेचे उपाय करून पाहिले, परंतु कांहींच चालेना, कारण, त्यां लोकांवर फौजेची जरा सक्ती झाली म्हणजे तेव्हडचा वेळेपुरता दंगा बंद करून ते स्वस्थ बसत; परंतु पेंढारी लोकांनीं माळव्यांतून येऊन दंगा माजविला, म्हणजे ते पूनः लागलीच उठावणी करून लुटण्याचा व दुसरीं अनेक अनुचित कर्मे करण्याचा क्रम सुरू करीत. सन १८१५, १६आणि १७ इ. या सालीं जेव्हां पेंढारी लोकांच्या टोळ्यांच्या टोळ्या माळव्यांतून येऊन खानदेश वगैरे प्रांतांत लुटालूट करूं लागल्या, त्या वेळेस वरील लोकांनीं पुनः दंगा करून सरकारचे रयतेस नाना प्रकारें उपद्रव दिला. कोणी लग्नकार्याकरितां परगांवीं खटल्या-

सुरूं जाऊं लागले ह्मणजे त्यांजवर त्या लोकांनीं हल्ले करून त्यांस लुटावें; त्यांच्या बायका धरून नेऊन बाटवाव्या; व त्यांचीं मुलेंबाळें हातीं लागतील तीं धरून नेऊन गुलाम करावीं. तसेंच त्या लोकांच्या टोळ्यांनीं गांवोगांव हल्ले करून लुटालूट करावी, आणि गांवांतील सर्व जातीच्या खुबसूरत बायका धरून न्याव्या. असा हा झोटिंगबादशाहीचा सपाटा चालला असतां, त्याची हकीकत विठ्ठलराव यांस वर लिहिलेले मोहिमेवर जाण्याचे वेळेस विशेष रीतीनें कळून आली. सबब त्यांनीं पेशवे यांस विनंति करून बाळोबाबावा यांस पुण्यास ठेवण्याची तजवीज केली; व त्यांचे सरसुभ्याचे हुद्यावर त्यांचे चुलतबंधु कृष्णाजी शामराव यांस पाठविलें; आणि वर लिहिलेल्या दंगेखोर लोकांचा बंदोबस्त करण्याकरितां आपले फौजेवरील अधिकारी कोठमगांवकर यांचे कुलमुखत्यार बाळाजी भगवंत यांस नेमिलें. ह्या कामगारानें त्या दंगेखोरांस पुष्कळ रीतींनीं जरबेंत ठेवण्याचा यत्न केला; परंतु तो सर्व व्यर्थ झाला. शेवटीं त्या लोकांची कोणत्या तरी रीतीनें समजूत करण्यास्तव बाळाजी भगवंत यांनीं त्यांचे नायकांस बोलावणीं केलीं. त्यांपैकीं जे कांहीं लोक हाजिर झाले त्यांस त्यांनीं खुष करून वाटेस लाविलें; परंतु ज्यांनीं मोठाले गुन्हे केले होते ते व इतरही कित्येक हाजिर झाले नव्हते त्यांजवर त्यांनीं हल्ले केले आणि जे सांपडले त्यांस कैद करून त्यांपैकीं ज्यांनीं ज्यांनीं गांवें जाळिलीं होतीं व ब्राह्मणांच्या बायका जबरीनें बाटवून घरांत घातल्या होत्या, त्यांस देहांतशिक्षा दिल्या; व बाकीच्या लाहानसाहान गुन्हेगारांनीं पुढें चांगले प्रकारें वागण्याचें कबूल केल्यावरून त्यांस सोडून दिलें.

सन १८१७ इ. सालाचे आरंभीं बाजीराव साहेब व इंग्रज सरकार यांजमध्यें एक नवीन तह झाला. त्यांत बाजीराव साहेब यांनीं नर्मदा नदीचे उत्तरेकडील मुलकावरील आपला वर्चस्वाचा हक्क इंग्रज सरकारचे स्वाधीन केला. त्यामुळें त्या प्रांतांतील आपले मुल-

काचे बाबतींत विठ्ठलराव हे अर्थातच इंग्रज सरकारचे ताबेदार झाले. परंतु पुण्याचे रेसिडेंट यांनीं त्यांचे दिवाण बाळोबाबाबा यांस असें सांगितलें कीं, "तुमचे मालीकांचा नर्मदा नदीचे उत्तरेकडील जो मुलूक आमचे ताब्यांत आला आहे, त्याचे मोबदला दक्षिणेंत दुसरा मुलूक मिळण्यास्तव त्यांनीं पेशवे सरकारास विनंति करावी." परंतु बाळोबाबाबा यांनीं तसें करणें नापसंद करून, "माझे मालिकांचे उत्तर हिंदुस्थानांतील मुलूक इंग्रज सरकारानें आपले तर्फेची जाहागीर ह्मणून त्यांजकडे चालवावे," अशी साहेब मौसूफ यांस विनंति केली. हा मजकूर एलाफिन्स्तन साहेब यांनीं गव्हरनर जनरल यांस कळविल्यावरून त्यांनीं बाळोबाबाबा यांचें म्हणणें मान्य करून एलफिन्स्तन साहेब व कर्नल क्लोज म्हणजे ग्वाल्हेर येथील रेसिडेंट यांस असें लिहिलें कीं, "इंग्रज सरकारास गरज लागेल त्यावेळेस लढाईस उत्तमप्रकारें उपयोगीं पडतील असे आठशें स्वार इंग्रज सरकारचे मदतीस देण्याची शर्त विंचूरकर कबूल करितील तर त्यांस आपले उत्तर हिंदुस्थानांतील मुलकाचा पूर्ववत् उपभोग करण्याची परवानगी देऊन तशा अधिकाराची सनद ही त्यांस करून द्यावी." हा हुकूम अमलांत यावयाचा; परंतु पुढें लवकरच पेशवे व इंग्रज यांमध्यें लढाई उपस्थित झाली, त्यामुळें तें सर्व तसेंच राहून गेलें.

विठ्ठलराव हे जनरल स्मिथ यांजबरोबर पेंढाऱ्यांचा बंदोबस्त करण्याचे मोहिमेवर असतां त्यांस फौजेसुद्धां पुण्यास तावडतोब येण्याविषयीं बाजीराव साहेब यांचा हुकूम गेल्यावरून त्यांनीं आपलें फौजेपैकीं पंधराशें स्वारांची टोळी खानदेश वगैरे मुलुकांचे सरसुभे, (आपले दिवाणाचे चुलतबंधु कृष्णाजी शामराव), यांचे हाताखालीं जनरल स्मिथ यांचे मदतीस ठेवून बाकीचे फौजेनिशीं पुण्याकडे कूच केला.

पुढें पेशवे व इंग्रज यांजमध्यें लढाई सुरू झाल्यावर जनरल स्मिथ यांनीं कृष्णाजी शामराव यांस ती खबर कळवून

आपले छावणींतून निघून जाण्यास सांगितलें; परंतु त्यांनीं जनरल स्मिथ यांस असा जबाब दिला कीं, "मला तुमच्याबरोबर राहण्याविषयीं माझे मालिकाचा हुकूम आहे, असें असतां, मी तुम्हांस सोडून गेलों तर, तो हुकूम तोडल्याचे दोषास पात्र होईन." तेव्हां जनरल यांनीं त्यांस असें कळविलें कीं, "पेशवे व इंग्रज सरकार यांमध्यें लढाई सुरू झाली आहे, यामुळें तुम्हांकडे तो दोष येणार नाहीं; याकरितां तुम्ही आतांचे आतांच छावणींतून निघून जावें; नाहीं तर मी तुम्हांस शत्रुप्रमाणें मानून त्याबरहुकूम वर्तन करीन." याप्रमाणें स्मिथ साहेबांनीं सक्त ताकीद दिल्यावरून कृष्णाजी शामराव हे निरुपाय होऊन त्यांचे छावणींतून विठ्ठलराव यांजकडे गेले.

इकडे विठ्ठलराव पुण्यास आल्यावर त्यांस असें दिसून आलें कीं, पेशव्यांची राजसत्ता अगदीं क्षीणतेस पावली असून सर्व लोक नाउमेद झालेले आहेत. तसेंच दरबारांतील मुत्सद्दी मंडळी देखील, होणार तें चुकत नाहीं, असें समजून दिलगीर बसली आहे. हा सर्व प्रकार पाहून विठ्ठलराव यांचें मन फारच उदास झालें. बाळोबाबाबा कारभारी यांनीं त्यांस अशी खबर कळविली कीं, "श्रीमंतांबरोबर माझें बोलणें झालें त्यांत त्यांनीं मला असें सांगितलें कीं, 'मी इंग्रजांस अत्यंत प्रामाणिक समजून सर्व प्रकारें त्यांजवर भरंवसा ठेविला होता. पण त्यांनीं मला वेळोवेळ अडचणींत आणून प्रत्येक वेळेस नवे नवे तह करून घेतले आणि माझी सर्व राजसत्ता हरण करून मला तृणवत् केलें आहे. अशा स्थितींत आपलें स्वातंत्र्य कायम ठेवण्यास निर्वाणीचा उपाय म्हटला तर त्या लोकांबरोबर लढाई करून जय मिळविणें एवढाच काय तो राहिला आहे, तो करून पाहावा. मग त्यांत प्रारब्धानें जें होणार असेल तें होईल. हा शेवटचा उपाय करून पाहाण्याविषयीं माझा व बापू गोखले यांचा निश्चय ठरून मीं त्यांचे मार्फत लढाईची तयारी चालविली आहे; आणि तु-

म्हास ( विठ्ठलराव यांस ) तरी याजकरितांच हुजूर बोलाविलें आहे. " ही खबर ऐकून विठ्ठलराव यांस अतिशय वाईट वाटलें; आणि त्यांनीं बाळोबाबाबांस सांगितलें कीं, " मी कांहीं दिवस इंग्रज लोकांबरोबर लढाईंत असल्याकारणानें मला इंग्रज सरकारचे सामर्थ्याची पुरी माहिती झाली आहे; व त्यावरून मी खचीत सांगतों कीं, सांप्रत इंग्रजांबरोबर लढाई करण्यासारखी आपले मालिकांचे फौजेची स्थिति मुळींच नाहीं. याकरितां तुह्मी त्यांस चार गोष्टी सांगून इंग्रजांबरोबर सख्य राहील अशीच तजवीज करावी. " त्याबरहुकूम बाळोबाबाबा व इतर शाहाणे व दूरदर्शी मुत्सदी यांनीं पेशवे यांस लढाईचा घाट मोडण्याविषयीं विनंति केली;* परंतु बाजीराव साहेबांनीं त्यांस उत्तर दिलें कीं, " हा मजकूर बापू गोखले यांस कळवावा. " त्यावरून पुष्कळांनीं बापू गोखले यांस भेटून, " लढाई केली असतां चांगला परिणाम होणार नाहीं, " असें त्यांस समजून सांगून इंग्रजांबरोबर पुन्हे सख्य करण्याविषयीं आग्रह केला; परंतु गोखले यांनीं त्यांचे बोलण्याचा आदर केला नाहीं. त्यामुळें सर्व निराश होऊन आपापले ठिकाणीं खिन्न बसले. नंतर कांहीं वेळानें पेशव्यांनीं गणपतराव पानशे यांस तोफखान्याची तयारी करण्याविषयीं हुकूम दिला; परंतु त्यांनीं असा जबाब केला कीं, " सरकारांनीं तोफखान्यासुद्धां इंग्रजी कवाइती फौज आपले जवळ ठेविल्यामुळें आजपर्यंत प्रसंगोपात जीं कामें पडलीं तीं त्यांजकडूनच बजाविण्यांत आलीं. खालसा तोफखान्यास मुळींच काम पडत नसल्यामुळें हालीं दारूगोळा वगैरेची तयारी अगदीं नाहीं. आतां नवीन करायाची ठरली तर, श्रीमंतांनीं जी मुद्दत दिली आहे, त्या मुद्दतींत पाहिजे तशी तयारी होणें अशक्य आहे. तथापि मजकडून होईल तितकी तयारी करण्यास मी बिलकूल

---

* या प्रसंगीं गोविंदराव बापू काळे यानीं बाजीराव साहेबांबरोबर जें भाषण केलें तें बापू गोखले यांचे चरित्रांत समग्र दाखल केलेलें आहे.

कसर करणार नाहीं." शिवाय, पटवर्धन सरदारांचे घराण्या बरोबर पूर्वीं दादासाहेब यांनीं, व त्या आलिकडे बाजीरावसाहेब यांनीं द्रोहभावानें वर्तन केलें असल्यामुळें ह्या महत्प्रसंगीं तेही बाजीराव साहेबांबरोबर औदासिन्यानें वागत राहिले; आणि या लढाईचे प्रसंगीं त्यांचे मदतीस त्यांपैकीं कोणीच आले नाहींत असें म्हटलें तरी चालेल. शिंदे, होळकर, गायकवाड, भोंसले वगैरे मोठ-मोठे सरदारांपैकीं प्रत्येकाबरोबर इंग्रज सरकारानें निरनिराळे तह करून, पेशव्यांस मदत न करण्याविषयीं त्यास गुंतवून घेतलें होतें. त्यामुळें त्यांपैकीं कोणीही पुण्यास येण्यास धजले नाहींत. विंचुरकर, आबा पुरंदरे, व रास्ते या त्रिवर्गास जरी खास वाट-लें होतें कीं, बाजीराव साहेबांनीं इंग्रजांबरोबर लढाईचा जो घाट घातला आहे त्याचा परिणाम चांगला होणार नाहीं, तरी समया-नरूप आपले मालिकांचे उपयोगीं पडल्यानेंच आपली इमानदारी निष्कलंक राहील असें त्यांचे मनांत येऊन, फौजांनिशीं पुण्यास येण्याविषयीं त्यांस हुकूम पोहोंचतांच ते आपापल्या फौजेनिशीं पुण्यास गेले. या शिवाय पेशव्या जवळ हुजूरात, मानकरी आरब, रोहिले, गोसावी, वगैरे मिळून पुष्कळ पायदळ फौज होती. ही पाय-दळ व घोडेस्वार यांची एकंदर जमलेली फौज सुमारें ७०००० होती. शिवाय तीन चार कवाइती पलटणें फोर्ड नांवाच्या इं-ग्रजाच्या हाताखालीं होतीं; परंतु त्या हुद्देदारानें इंग्रजी फौजेबरो-बर लढण्याचें नाकबूल केल्यामुळें त्या पलटणांपासून पेशव्यांचा कांहींच उपयोग न होतां उलटें नुकसान मात्र झालें; कारण, ल-ढाई सुरू झाल्याबरोबर तो इंग्रजी फौजेकडे जाऊन मिळाला. बाकी जी निवळ मराठी फौज राहिली तिची संख्या जरी मोठी होती, तरी इंग्रजांचे कवाइती फौजेबरोबर संग्राम करण्याजोगी तिची तयारी नसून तिजपाशीं युद्धोपयोगी सामान मुळींच नव्हतें असें म्हटलें तरी चालेल. या सर्व गोष्टी बहुतेक मराठे सरदारांचे नजरेसमूर प्रत्यक्ष दिसत असल्यामुळें कोणासही इं-

मज लोकांशीं सामना करण्याचा मनोत्साह नव्हता. तशांत लढाईसंबंधी अगर फौजेचे व्यवस्थेसंबंधी वगैरे एखादी सयुक्तिक गोष्ट श्रीमंतांस कळविण्यास कोणी गेला तर, "काय ह्मणणें असेल तें गोखल्यांस कळवावें" असा बाजीराव साहेब हुकूम करीत; आणि गोखल्यांस कोणी अशी गोष्ट सुचविली तर ते त्या सुचविणाराचा धिःकार करीत. यामुळें सर्व लोक नाखुष असून, फक्त इमान सोडूंनये म्हणूनच, वर सांगितलेले सरदार स्वामीकार्यार्थ आपले जीव खर्ची घालण्यास तयार झाले होते. लढाई करण्यास फक्त बापू गोखले यांचें मात्र बाजीराव साहेबांचे मर्जीप्रमाणें पूर्ण अनुमोदन होतें. त्यांजपाशीं फौज म्हटली तर इतर सरदारांप्रमाणें घोडेस्वारच होते. असो; ही सर्व स्थिति मनांत आणून बाजीराव साहेबांनीं इंग्रजांबरोबर सलोखा केला असता तर पेशवाई बुडाली नसती; परंतु त्यांनीं दुराग्रहानें बापू गोखले यांस पुढारी करून लढाईस आरंभ केला. तेणेंकरून सर्व हिंदु लोकांचें स्वातंत्र्य नष्ट होण्यास आरंभ झाला असें म्हटलें तरी चालेल.

एके दिवशीं गोखले यांनीं रेसिडेंट साहेबांचे छावणीवर प्रथम हल्ला केल्यामुळें लढाई सुरू झाली; आणि जरी कांहीं वेळ पर्यंत उभयतां फौजांकडून तोफांचे माऱ्याचा सामना झाला, तरी निर्णयात्मक म्हणून कांहींच झालें नाहीं. रेसिडेंट साहेबांजवळ पुण्यावर हल्ला करण्या पूर्ती फौज नव्हती यामुळें पुढें कांहीं दिवसपर्यंत लढाई झाली नाहीं. इतक्या अवकाशांत घोडनदी वगैरे ठिकाणांहून इंग्रजांची अणखी फौज येऊन पोहोंचली. ती फौज दुसरे दिवशीं पुण्यावर हल्ला करणार, अशी बाजीराव साहेब यांस खबर रात्रीस लागल्यावरून ते लागलेच उठून बाबदेवाचे घाटावर गेले, आणि इंग्रजी फौज पुण्यावर चालून आलेली पाहातांच ते तेथून सत्वर निघून साताऱ्याकडे गेले. ही गोष्ट तारीख १७ नोवेंबर सन१८१७इसवी रोजीं झाली. पेशवे निघून गेल्यामुळें इंग्रजी फौजेनें पुण्यांत बिनहरकत प्रवेश करून तिचे सेनापतीनें

पेशव्यांचे ( शनवारचे ) वाड्यावर इंग्रजी बावटा उभा केला आणि शहरांत कोणी लूट करूंनये म्हणून नाकेबंदी केली. पुढें एल्फिन्स्टन् साहेब, जे पूर्वी रेसिडेंट होते, तेच मुख्य कमिशनर होऊन सर्वांस अश्वासन देण्यास्तव त्यांनीं जागोजाग जाहिरनामे लाविले तेणेंकरून शहरांतील लोकांचीं मनें स्वस्थ झालीं. या प्रमाणें पुणेंशहर म्हणजे संपूर्ण मराठी राज्याची राजधानी येथून बाजीराव रघुनाथ पेशवे निघून जाऊन त्यांत इंग्रज लोकांचा अंमल झाल्यानें ज्या मराठी राज्याचा थोरले शिवाजी माहाराज यांनीं पाया घातला असून जें बाजीराव बल्लाळ पेशवे यांनीं वाढविलें होतें तें नष्ट झालें.

---

## प्रकरण २ रें.

बाजीरावसाहेब थेट साताऱ्यास न जातां कृष्णातीरीं जाऊन माहुली येथें राहिले; आणि तेथून त्यांनीं सातारचे राजे' त्यांचे बंधु आणि मातुश्री यांस आणण्याकरितां फौजेची एक टोळी पाठविली. तथापि त्यांचे येण्याची वाट न पाहातां ते तेथून निघून पंढरपुरास चालते झाले; आणि तेथून जुन्नराकडे जात असतां, सातारचे राजे यांस आणण्यास जी टोळी गेली होती ती त्यांस घेऊन त्यांच्या लष्करांत येऊन दाखल झाली. मग बाजीरावांनीं पुण्यावर येण्याच्या इराद्यानें तेथून कुच करून कोरेगांवाजवळ तळ दिला; परंतु घोडनदीहून कपतान स्टाटन् याचे हाताखालीं सुमारें ८०० कवाइती शिपायांची फौज पुण्यास जाण्याकरितां निघाली असून तिनेंही कोरेगांवांतच तळ दिला. तिला हाकून लावावें म्हणून मराठी फौजेनें तिजवर हल्ला केला. तेव्हां मोठी निकराची लढाई झाली ती प्रसिद्धच आहे. या लढाईचा शेवट झाला नव्हता तोंच बाजीराव तेथून निघून गेले, त्यामुळें ती लढाई सोडून सर्व मराठी फौजेस त्यांजबरोबर जाणें भाग पडलें.

बाजीराव कोरेगांवाहून निघाले ते सपूर कर्नाटकाकडे चालते झाले, कारण म्हैसूरचे राजाकडून मदत मिळण्याची त्यास आशा वाटत होती; परंतु त्या प्रांतांत टामस मनरो साहेब फौजेनिशीं असल्यामुळें बाजीराव त्या प्रांतीं पोंहोंचल्यावर ती आशा व्यर्थ आहे असें त्यांस दिसून आलें. तेव्हां ते माघारे वळून सोलालापुरास आले. तेथें त्यांनीं माणकेश्वरांचे कारकुनापासून खर्चाकरितां कांहीं ऐवज घेतला. सदई मुक्कामीं नागपूरवाले आपासाहेब भोंसले यांजकडून गणपतराव नांवाचा सरदार कांहीं स्वारांनिशीं त्यांचे मदतीस आला; परंतु इंग्रजी फौज वेळापुरास येऊन पोहोंचली अशी त्यांस खबर आल्यावरून ते तेथून निघून आष्टें गांवीं गेले. तेथें त्यांचा तळ पडला असतां, इंग्रजी फौज जवळ आल्याची खबर त्यांस समजली. तेव्हां ते घाबरून बापू गोखले यांस ह्मणाले कीं, " असेंच तुम्ही आमचें रक्षण करितां काय ? " त्याजवर गोखले यांनीं जबाब दिला कीं, "आपले पिछाडीचा बंदोबस्त मीं केला आहे. व पुढले बाजूस मी स्वतः आहें." असें बोलून त्यांनीं निपाणकर यांस आपले मदतीस बोलाविलें. इतक्यांत स्मिथ साहेबांचे स्वार अगदीं समीप आलेले त्यांचे दृष्टीस पडले. तेव्हां त्यांचे लोक म्हणाले कीं, "आपण मागें हटून चांगले तयारीनिशीं इंग्रजी फौजेशीं सामना करावा" परंतु ते त्यावेळेपर्यंत फिरून फिरून अगदीं थकले होते. तशांत त्यांनींच इंग्रजांबरोबर लढाई करण्याविषयीं बाजीराव साहेबांस उत्तेजन देऊन सर्व जबाबदारी आपले शिरावर घेतली होती; परंतु त्यांस आपला जय होण्याची आशा मुळींच दिसेना. तेव्हां अपकीर्ति होऊन जगण्यापेक्षां लढाईत मरून जाणें बेहेत्तर आहे असें त्यांस वाटून त्यांनीं लागलाच लढाई करण्याचा निश्चय केला, आणि जे लोक मागें हटून चांगले तयारीनिशीं लढाईस यावें असें म्हणत होते त्यांस त्यांनीं असा जबाब दिला कीं, " जें काय व्हावयाचें असेल तें येथेंच होईल; मी आतां माघारा जाणार नाहीं. " असें बोलून,

त्यांजवळ जे फक्त तीनशेंच स्वार होते तेवढ्यांनिशीं त्यांनीं इंग्रजी स्वारांवर हल्ला केला. तेव्हां लढाई सुरू झाली, तिचेअंतीं ते इंग्रज लोकांकडील एका कडाबीनवाल्या स्वाराच्या हातानें मारले गेले. नंतर पेशवे लागलेच निघून गेले. मग कितीएक हत्ती व इतर पुष्कळ सामान इंग्रजी फौजेचे हातीं लागलें. शिवाय सातारचे राजे त्यांचे बंधु व मातुश्री हीं इंग्रजांचे हातीं लागलीं. त्यांस इंग्रजांचे सेनापतीनें चांगलें अश्वासन देऊन पुण्यास एलफिन्स्टन साहेब यांजकडे पाठवून दिलें.

बाजीराव साहेब आष्टयाहून कोपरगावीं गेले. तेथें त्यांस पेंढाऱ्यांचा एक सरदार रामदीन हा येऊन मिळाला. मग ते तेथून बिडास गेले, आणि तेथून पूर्वेस वळून वऱ्हाडांत चांद्यास गेले. त्या ठिकाणाहून त्यांनीं आपासाहेब भोंसले यांजकडून मदतीस आलेले गणपतराव यांस माघारे पाठवून आपण वर्धानदीचे किनाऱ्यावर तळ दिला; परंतु तेथें इंग्रजी फौजेनिशी कर्नल आडम नांवाचा एक इंग्रज सरदार येऊन पोहोंचला अशी खबर आल्यावरून ते त्या नदीचे पश्चिमेस पांढरकवडा येथें तळ देऊन राहिले.तेथेंही त्यांस आडम व डोवटन यांच्या फौजांनीं गांठिलेअसतां, त्यांस तेथून निघून जाणें भाग पडले. तथापि ते चुकून आडम साहेबांचे छावणीकडे गेले, त्यामुळें त्यांचे पुष्कळ लोक मारले गेले; आणि त्यांचे कनिष्ट बंधु चिमाजीआपा हे आपा देसाई निपाणकर व नारोपंत आपटे यांजबरोबर निघून जनरल स्मिथ यांस शरण गेले. बाजीराव तेथून नर्मदेकडे त्वरेनें जात असतां,त्यांचे पाठीस डोवटन याची फौज लागली होती.त्यामुळें त्यांस विश्रांति घेण्यास फुरसत न मिळून त्यांचे फार हाल झाले.सबब विसावा मिळण्यास्तव ते तापी नदी उतरून पलीकडे गेले. तत्रापि इंग्रजी फौज आपले मागून येतच आहे असें त्यांस कळल्यावरून त्यांनीं शिंदवा घाटावर नर्मदा उतरून जाण्याचा विचार मनांत आणिला; परंतु त्या घाटावर इंग्रजी फौजेचा मजबूत बंदोबस्त असून सर जान मालकम यांनीं आपल्यास कैद करण्या-

ची तयारी केली आहे, असें त्यांस समजल्यावरून त्यांचें धैर्य अगदीं खचलें. त्यावेळेस त्यांजबरोबर सरदार ह्मटले तर फक्त विठ्ठलराव विंचूरकर व आबा पुरंदरे एवढे मात्र आपापल्या शिलक राहिलेल्या फौजेनिशीं होते. अशा विकट प्रसंगीं पुढें काय करावें हें पेशवे यांस सुचेना. तेव्हां त्यांनीं बरोबर असलेली मंडळी जमवून विचार केला, त्यांत असें ठरलें कीं, मालकम साहेब हे आपले ओळखीचे आहेत; याकरितां त्यांजकडे वकील पाठवून त्यांचें काय ह्मणणें आहे त्याचा खुलासा आणवावा. त्यावरून त्यांनीं आनंदराव चंदीचंदावरकर नांवाचे मनुष्यास मालकम साहेब यांजकडे बोलणें बोण्यालस पाठवून दिलें. नंतर बाजीराव साहेब तेथून माघारे फिरून वकील काय जबाब आणितो तो पाहण्यास्तव अशीर गडाजवळ धुळकोट येथे राहिले.

आनंदराव चंदीचंदावरकर यानें तारीख १६ मे सन १८१७ ई० रोजीं मह येथें मालकम साहेबांची भेट घेऊन त्यांस बाजीराव यांचें पत्र दिलें. तेव्हां मालकम साहेबांनीं बाजीराव यांजकडे बोलणें बोलण्याकरितां दोन साहेब लोक पाठविले. त्यांनीं श्रीमंतांची भेट घेऊन त्यांस असें कळविलें कीं, "इंग्रज सरकार तुमचा सत्कार करण्यास तयार आहेत; परंतु तुम्ही राज्यावरील दावा सोडून द्यावा आणि इंग्रज सरकार तुमचे गुजाऱ्यास जी नेमणूक औदार्यानें करून देईल ती तुम्हीं घेऊन, भागीरथीचे कांठीं ज्या ठिकाणीं राहण्याचें तुम्हांस पसंत पडेल त्या ठिकाणीं तुम्ही राहावें. तुह्मांस हें कबूल असेल तर तुह्मीं त्रिंबकजी डेंगळे यास मालकम साहेबांचे स्वाधीन करावें, व पेंढाऱ्यांचा सरदार रामदीन व जे इतर पेंढारी तुम्हांजवळ असतील ते सर्व दूर करावे, आणि मालकम साहेब यांचे छावणींत येऊन तेथें त्यांची भेट घ्यावी." याचा जबाब बाजीराव यांनीं दिला कीं, "तुम्ही जें बोलणें बोलतांतें केवळ एकटयाविषयींच बेलतां. मजबरोबर कितीएक सरदार व मुत्सद्दी आपला सर्वस्वी नाश करून आले आहेत, व माझे पूर्व-

जांनीं चिरकाल चालणारीं अशीं कितीएक धर्मकृत्यें केलीं आहेत, त्यांची वाट काय? इंग्रज सरकार औदार्यानें नेमणूक करून देईल असें तुम्हीं मोघम बोलतां; आमचे बंधु अमृतरावसाहेब यांस सालिना आठ लाख रुपयांची नेमणूक मिळत आहे त्यापेक्षां माझी नेमणूक कमी असणें योग्य नाहीं; या सर्व गोष्टींचा खुलासा झाला म्हणजे मी काय तो जबाब देईन" ही सर्व हकीकत इंग्रज वकिलांनीं मालकम् साहेब यांस लिहून कळविली. त्यांनीं जबाब पाठविला कीं "बाजीराव आमचे लष्करांत येऊन इंग्रज सरकारास शरण येतील तर, त्यांचे ह्मणण्याचा विचार करण्यांत येईल." हा जबाब इंग्रज वकीलांनीं बाजीरावसाहेब यांस कळविला. नंतर श्रीमंतांनीं विंचूरकर वगैरे सरदार व मुत्सद्दी व मानकरी यांस एकत्र जमा केलें आणि त्या सर्वांस तो मजकुर सविस्तर सांगून शेवटीं असें कळविलें कीं, " मालकम् साहेब हे ठराव होण्यापुर्वींच आह्मास आपले लष्करांत बोलावितात हें कसें?" त्यावर त्या सर्वांनीं त्यांस असें सांगितलें कीं, " आपली बहुतेक फौज आपल्यास सोडून गेली. चारीबाजूस इंग्रजी फौजेच्या चार मजबूत टोळ्या असून त्या आपल्यास कैद करण्याचे खटपटींत आहेत. मालकम् साहेब यांचा व आपला पुर्वींचा परिचय असून ते विचारी व दयाळू आहेत. ते आपले बाबदींत कांहीं गैर करतील असें आह्मांस वाटत नाहीं. याकरितां हेंच उचित दिसतें कीं आपले हालींचे स्थितीवर व आपत्कालावर नजर द्यावी आणि सर्व भरंवसा साहेब मोसूफ यांचे औदार्यावर ठेवून याप्रसंगीं त्यांचे ह्मणण्याप्रमाणें वागावें." हें ऐकून बाजीरावसाहेबांनीं तसें करण्याचें कबूल केलें. मग त्यांनीं इंग्रज वकिलांचे मार्फत मालकम् साहेब यांस खासगी रीतीनें भेटीस बोलावून ते आल्यावर एकांतीं त्यांची भेट घेतली. तींत परस्परें कांहीं वेळ बोलणें झाल्यावर शेवटीं त्यांनीं आपला सर्व भरंवसा साहेब मोसूफ यांचे औदार्यावर ठेवून त्यांचे ह्मणण्याप्रमाणें वागण्याचें कबूल केलें. इ-

तकें मात्र अधिक सांगितलें कीं. " मजबरोबर राहाण्यानें माझ्या पदरचे कितीएक लोकांचे नुकसान झालें आहे. त्यांचे गुजाऱ्याचा बंदोबस्त ठेवावा. " त्याचा जबाब मालकम् साहेबांनीं असा दिला कीं. " या गोष्टीचा योग्य विचार करण्यांत येईल. " याप्रमाणें बोलणें झाल्यावर मालकम् साहेब परत गेले. नंतर त्यांनीं बाजीरावसाहेब यांस तारीख१ जून सन १८१८ इसवी रोजी दरबारी रीतीनें पत्र लिहून त्याजबरोबर ठरावाची यादी पाठवून दिली.* सदहू यादींतील शर्ती येणें प्रमाणें;—

" १ बाजीराव यांनीं पुण्याचें राज्यावरील किंवा कोणतेही राजाधिकारावरील आपला व आपले कायमसुक्काम यांचा दावा, हक्क व संबंध सोडून द्यावा.

२ त्यांनीं आपले कुटुंब, आपले पदरचे लोक व चाकरपेशे यांजपैकीं थोडे लोक बरोबर घेऊन लागलेंच ब्रिगेडीयर जनरल मालकम् यांचे छावणींस यावें. तेथें त्यांचा बहुमानानें व आदरानें सत्कार होईल आणि त्यांचे विनंति वरून त्यांचें वास्तव्या करितां हिंदुस्थानांत काशी अगर इतर कोणतें तरी पवित्र ठिकाण गवरनर जनरल मुकरर करतील. तेथें त्यांस सुरक्षितपणें पोंहचवून देण्यात येईल.

३ दक्षिणेचे स्वस्थतेकरितां व बरसात समीप आली आहे सबब एक दिवसाचाही ढिरंग न करितां त्यांस हिंदुस्थानांत गेलेंच पाहिजे; परंतु ब्रिगेडीयर जनरल हे असा करार करितात कीं त्यांचे कुटुंबाची जी माणसें पाठीमागें राहिलीं असतील तीं साथेल तितके लौकर त्यांजकडे पावतीं करण्यांत येतील आणि त्या माणसांचा प्रवास शिघ्र व सोइचा होण्याकरतां हरएक प्रकारें व्यवस्था ठेविली जाईल.

---

* ही यादी वांचून पाहिली म्हणजे अगदीं पराजीत झालेले असे जे पेशवे बाजीराव यांजवर इंग्रज लोकांनीं किती सक्ती केली हें वांचणारांचे सहज लक्षांत येईल.

४ ही व्यवस्था बाजीराव यांनीं स्वसंतोषानें कबूल केल्यावर त्यांस आपले स्वतःचे व आपले कुटुंबाचे उपजीविकेस्तव कंपनी सरकारांतून विपुल पेनशन मिळेल. ह्या पेनशनाची रक्कम गवरनर जनरल हे ठरवितील; परंतु सदहू पेनशन सालीनां आठ लक्ष रुपयांहून कमी होणार नाहीं असें वचन देण्याचें ब्रिगेडिअर जनरल मालकम् हे आपल्याकडे घेतात.

५ ही व्यवस्था पूर्ण रीतीनें व शीघ्रतेनें सिद्धीस नेऊन इंग्रज सरकारावर आपण पूर्ण भरंवसा ठेवितों असें बाजीराव साहेब दाखवितील तर, ज्या मुख्य मुख्य जाहागिरदारांचे व पदरचे जुने लोकांचे एकनिष्ठेमुळें त्यानीं त्यांचा अंगीकार केला आहे त्या लोकांबद्दल त्यांची विनंती पुष्कळ लक्ष पूर्वक ऐकिली जाईल, आणि ज्या पुज्य ब्राम्हणां करितां, व जीं धर्माची संस्थानें त्यांचें घराण्यानें आश्रय देऊन चालविलीं आहेत त्यांकरितां त्यांनीं विनंत्या केल्या आहेत त्याही मनास आणिल्या जातील.

६ वर लिहिलेल्या शर्ती बाजीराव यांनीं फक्त कबूल केल्या पाहिजेत इतकेंच नाहीं, तर, त्यांनीं स्वतः ह्या वेळेपासून २४ तासांत ब्रिगेडियर जनरल मालकम् यांचे छावणींत आलें पाहिजे. नाहीं तर लढाई पुनः सुरू केली जाईल, आणि पुढें त्यांजबरोबर ठरावाचें बोलणें केलें जाणार नाहीं."

"आली या भोगाशीं असावें सादर" अशी वृद्ध पुरुषांची म्हण आहे. तीस अनुसरून बाजीरावसाहेबांनीं मालकम् साहेबांचा स्वाधीन होण्याचा निश्चय केला; आणि मरण समयीं जशी मनुष्याची अत्यंत दुःखदायक स्थिती होत्ये तद्वत त्यांची स्थिती झाली असतां, त्यांचा कंठ दाटून आला आणि त्यांनीं मंडळीचे मुखाकडे पाहिलें तेव्हां त्यांच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या. मग कोणाशीही न बोलतां ते म्यान्यांत बसून चालते झाले. त्या वेळेस त्यांच्या म्यान्या बरोबर भोयांखेरीज पांच साहा हुजरे व चारपांच शागीर्द इतकेच गेले, कारण इंग्रजांकडून त्यांस नेण्याकरितां जे

इंग्रज तुरुकस्वार व पलटणी शिपाई आले होते त्यांनीं इतरांस त्यांबरोबर जाण्याची मनाई केली आणि त्यांच्या म्यान्यासभोवता आपल्या लोकांचा गराडा घालून तो म्याना मालकम् साहेबांच्या छावणीत नेला. तेथें बाजीरावसाहेब मालकम् साहेबांच्या स्वाधीन झाले. याप्रमाणें बाजीराव साहेबांनीं आरंभिलेले युद्धाचा परिणाम होऊन पेशव्यांचें राज्य लयास गेलें. ही गोष्ट तारिख ३ जून सन १८१८ इसवी रोजीं झाली.

बाजीरावसाहेबांच्या पाठीमागून विठ्ठलराव विंचुरकर हे लष्करी पोषाग एकीकडे ठेवून फक्त चार पांच स्वारांनिशीं मालकम् साहेबांचे छावणींत गेले. येथें त्या साहेबांचे भेटींत त्यांनीं आपली तरवार पडदल्यासुद्धां हातांत घेऊन " ज्यांचे रक्षणाकरितां मीही तरवार बांधीत होतों त्यांच्या रक्षणाचा तुह्मीं पत्कर घेतला आहे सबब ही मी तुमच्या स्वाधीन करितों " असें बोलून त्यांनीं ती तरवार साहेब मौसूफ यांजपुढें ठेविली. पुढीलकाळीं विठ्ठलराव यांस त्या गोष्टीचें स्मरण झालें ह्मणजे बहुत दुःख वाटून ते असें ह्मणतकीं " मला युद्धांत मरण आलें असतें तर बरें झालें असतें; शरण जाणें हें माझ्या शूर कुलास कलंक लागण्यासारखें झालें आहे.

पुढें लौकरच मालकम साहेब यानीं बाजीराव साहेब यास ब्रह्मवर्तास रवाना करून दिले.

बाजीराव साहेब ब्रम्हवर्ताकडे चालते झाले त्या वेळेस त्यांजबरोबर सरदार व लष्कर गेलें त्याचा तफसील;—

१ बापु गडबोले या नांवाचे बक्षी यांचे ताब्यांतील लष्कर.

१ पेशव्यांच्या हुजुरातीच्या पागा सुमारें पांच.

१ शिवाय कोतवाल घोडे, हत्ती, उंट, पालख्या, म्याने, गाड्या, तट्टे, बैल वगैरे.

१ बापु गोखले यांचे निसबतीचे रामचंद्र व्यंकटेस यांचे ताब्यांतील फौज;—

१ रामचंद्र व्यंकटेश याची खासगी पागा.

१ बापु गोखल्यांचे मामा बाळाजीपंत मराठे यांचे हाताखालची पागा.

१ बापु गोखले यांचे निसबतीचे सरदार भिकापा जगताप याचे हाताखालची पागा.

१ कैलासवासी बापु गोखले यांचे कोतवाल घोडे, हत्ती, उंट वगैरे लवाजमा.

१ विंचूरकरांचे दिवाण बाळोबाबाबा सालकाडे यांचे हाताखालीं त्यांचे मालकांनीं सुमारें दीडशें स्वारांची पाठविलेली पागा व सरंजाम.

१ ढमढेरे यांचे निसबतीचे सरदार श्रीधर बापु दामले यांचे हाताखालची पागा.

बाजीरावसाहेब यांची स्वारी ब्रह्मवर्तास पोंहचल्यावर इंग्रज सरकारांनीं त्यांचे छावणी कारितां भागीरथीचे किनाऱ्यावर सुमारें साहा मैलाचे परिघाची जागा नेमूनदेऊन तिचे चोहोंबाजूंस हद्दीच्या खुणांकरितां दगडाचे सोळा स्तंभ रोंविले आणि नीट बंदोबस्त राहाण्यास्तव तेथें रेसिडेंटही ठेविला.

पूर्वी बाजीरावसाहेब यांचे तर्फेनें रेसिडेंट साहेबांकडील वकीलीचें काम विंचूरकरांचे दिवाण बाळोबाबाबा सालकाडे यांजकडे होतें; परंतु " मी आतां वृध्ध व अशक्त झालों सबब माझ्या कामावर दुसऱ्याची योजना करण्यांत यावी " म्हणून बाळोबाबाबानीं श्रीमंतांस विनंती केल्यावरून, त्यांनीं गोखल्यांचे निसबतीचे रामचंद्र व्यंकटेश यांजकडे तें काम सांगून आपले छावणीचे हद्दींतील दिवाणी व फौजदारी अधिकारही त्यांजकडे सोंपून दिले. रामचंद्र व्यंकटेश हे पूर्वी पेशवाईंत बापुगोखले यांचे वतीनें एक सुभ्यावर होते, म्हणून त्यांस सुभेदार असें म्हणत असत.

बाजीराव साहेब यांजबरोबर ब्रह्मवर्तास गेलेल्या मंडळीस

फौजेच्या खर्चाबद्दल त्यांजकडून ज्या नेमणुका मिळूं लागल्या त्यांचा तफसील;—

१ रामचंद्र व्यंकटेश यांस;—

| | |
|---|---|
| १ बापुगोखले यांचे निसबतीच्या तीन पागा व इतर शिलेदार स्वार यांचे गुजाऱ्याबद्दल दरमाहा रुपये..... ...... .... | ६,००० |
| १ खासगत लवाजमा व भोजन खर्च वगैरेबद्दल रुपये... .... ...... .... | २,००० |
| २ | ८,००० |
| १ विंचूरकरांचे दिवाण बाळोबाबाबा सालकाडे यांचे हाताखालचे पागेचे खर्चाबद्दल दरमाहा रुपये. | १,००० |
| १ दमडेरे यांजकडील श्रीधरबापु दामले यांचे हाताखालीं शेवटीं फक्त ३५ स्वार कायम होऊन दर स्वारास दरमाहा १५ रुपये प्रमाणें दामले मजकूर यास मिळूं लागले ते रुपये ५२५ व त्यांचे वेतन मिळून एकंदर रुपये.... ... ... | ६०० |

बाजीराव साहेब यांची पागा, पीलखाना वगैरे अठरा कारखान्यांचें काम बापु गोखले यांजकडेस होतें. त्याबद्दलचा खर्च नेमलेला नसून कच्चा होत असे. तें काम गडबोले यांनीं आपले अंतकाळ पर्यंत एकनिष्ठेनें व मोठ्या इमानदारीनें केलें. त्यांचे प्रामाणिकपणास्तव त्यांजवर बाजीरावसाहेब यांचा अत्यंत लोभ होता.

बाजीरावसाहेब यांचे ब्रह्मवर्त येथील पदरचे लोकांपैकीं ज्यांस इंग्रज सरकारांकडून पेनशनें मिळूं लागलीं ते इसम व दरमाहा पेनशनाच्या रकमा येणेंप्रमाणें.:—

| | |
|---|---|
| १ रामचंद्र व्यंकटेश सुभेदार यांस रुपये... ... ... | १००० |
| १ बापू गडबोले यांस रुपये..... ..... ... ... | ३०० |
| १ बाळोबाबाबा सालकाडे निसबत विंचूरकर यांस रुपये .... .... .... .... ... | २५० |

१ अप्पा देशमुख यांस रुपये... ... ... ... २५०
१ अंताजीपंत मामा यांस रुपये. ... ... ... २५०

ह्या नेमणुका ज्यांस मिळत होत्या त्यांचे हयाती अखेर चाल-ल्या. त्यांपैकीं बाळोबाबाबा सालकाडे हे सन १८२७ इ० चे सुमारास श्रीमंतांचे परवानगीनें काशीस राहावयास गेले. तेव्हां त्यांजकडील पागेचे काम श्रीमंतांनीं त्यांचे पुत्र निलकंठराव यांजकडे चालविलें. बाळोबाबाबा हे काशीस असतां त्यांस इंग्रज सरकाराकडून जी दरमाहा रुपये आडीचशांची नेमणूक मि-ळत होती तिजवर त्यांनीं गुजारा केला. आणि पुढें सन १८३३इ० चे सुमारास ते संन्यासग्रहण करून काशीक्षेत्री परलोक-वासी झाले. बापू गडबोले सन १८५०इ० चे सुमारास ब्रम्हवर्त येथें आपले मालिक जिवंत असतां कैलासवासी झाले. त्यामुळें इंग्रज सरकाराकडील त्यांची रुपये तीनशांचीं नेमणूक बंद झाली.

रामचंद्र व्यंकटेश सुभेदार हे मोठ्या दक्षतेनें व हुशारीनें इंग्रज सरकाराबरोबर वागले. त्यामुळें त्या सरकारचे कामगार लोकांमध्यें त्यांचें चांगलें वजन होतें. शिवाय त्यांनीं बाजीराव साहेब यांचें वर्तनावर दक्षनजर ठेवून रेसिडेंट साहेबांचें धोरण ही चांगलें ठेविलें होतें. त्यांचेच योगानें बाजीराव साहेब यांची स्थिती व बोझ कायम राहून शेवट पर्यंत एकसारखा क्रम चालला. बाजीराव साहेबांचा देहांत झाल्यावर एक वर्षानें राम-चंद्र सुभेदार हे परलोकवासी झाले. तेव्हां इंग्रज सरकाराकडून त्यांस जें दरमाहा एक हजार रुपयांचे पेनशन चालत होतें तें बंद झालें. त्यांस तीन पुत्र होते. पैकीं जेष्ट पुत्र नाना सुभेदार यांचे बा-जीराव साहेबांचे दत्तपुत्र धोंडोपंतनानासाहेब यांजबरोबर पूर्वी पासूनच कित्येक कारणास्तव वैमनस्य पडलेलें होतें. पुढें सन १८५७ इ० सालीं ब्रम्हवर्त येथें लष्करी लोकांचें बंड झालें असतां, त्या-चे बंदोबस्तास्तव इंग्रज सरकारची फौज गेली. त्या प्रसंगीं नाना

सुभेदार यांनीं त्या सरकारचे अंमलदारांस बरीच मदत दिल्याव-रून तें सरकार खुश होऊन त्यानें बाजीराव साहेबांचे छावणी-ची सोळा दगडी स्तंभाचे हद्दींतील जमीन त्यांस बक्षीस दिली. आ-लिकडे बाजीराव साहेबांचे लष्करांतील वस्ती उठूनगेल्यामुळें तेथें हाल्लीं शेतें व वाडचा होऊन नाना सुभेदार यांस सालिना सुमारें सात आठ हजार रुपयांचें उत्पन्न मिळतें असें ऐकिवांत आहे.

बाजीरावसाहेब महूहून निघून गेल्यावर लौकरच विठ्ठल-राव विंचुरकर हे मालकम्‌साहेब यांचे बोलावण्यावरून त्यांचे भेटीस गेले. त्या बैटकींत साहेब मौसूफ यांनीं त्यां-स असें कळविलें कीं "या लढाईंत तुम्हीदुराग्रहानें बाजी-राव यांचे पक्षास जडून राहिल्यामुळें तुमचें सर्वस्व जाऊन इंग्रज सरकारचे औदार्यावर तुमचा दावा बिलकूल राहिला नव्हता; परंतु आ-लीकडे तुम्ही समय विशेषीं आमचे सरकारचे वरेंच उपयोगीं पडलां यामुळें एलफिन्स्टन साहेब कमिशनर यांनीं दक्षिणेंतील सरदारांच्या ज्या तीन प्रती* केल्या आहेत त्यांपैकीं तिसऱ्या प्रतींत तुमचें नांव

*ह्या प्रती कशा होत्या हें चागले रीतीनें वाचकाचे लक्षांत येण्यास्तव एलफि-न्स्टन साहेब रेसिडेंट यांजकडून ब्रिगेडियर जनरल सरजान मालकम् यांस तारीख २८ माहे मे सन १८१८ इसवीचे पत्र गेले त्याचा उतारा आम्ही पुढें दाखल करितों;--

'तुमचें तारीख १८ माहे हालचें पत्र मला पावलें. त्या पत्रासोबत तुह्मी कर्नल आडम यांस त्याच तारखेचें जें पत्र लिहिलें त्याची नक्कल मलफूफ करून बाजीराव यानीं माझें स्वाधीन व्हावें व त्यांच्या पदरच्या लोकांबरोबर ठराव व्हावे ह्मणून त्यांशीं बोलणीं चालविलीं आहेत असें तुह्मी त्यांत लिहिलें आहे सबब मला असें वाटतें कीं ज्या सरदारांनीं पेशव्यांस सोडिलें त्या सरदा-रांबरोबर मीं ज्या नियमांनीं ठराव करीत आहे ते नियम तुह्मांस कळविणें उ-पयुक्त आहे [ याकरितां ते मीं पुढें लिहून कळवितों. ]

ज्या सरदारांनीं बाजीराव यांस सत्वर सोडिलें त्यांस त्यांचें जाहगिरी शि-वाय अधिक मलूक देण्याचें मीं बोललों आहे. ज्यांनीं त्यांस त्यानंतर सो-डिलें त्यांच्या ताब्यांत हाल्लीं असलेलें मात्र मीं त्यांजकडे कायम ठेविन. क-र्नेल आडम यानें बाजीरावांचा मोड केल्यानंतर ज्या सरदारांनीं त्यांस सोडिलें त्यांजकडे त्यांचे घराण्यांचे उपजिविकेंस्तव मीं जातीच्या जाहगिरी मात्र ठेविन आणि त्या जाहगिरी खेरीज जे त्यांचे हातांत असेल तें मी सर्व खालसा करीन.

( पुढें चालू. )

दाखल करून तुम्हांकडे तुमची जातीची जाहागीर मात्र वंश परंपरेनें चालविली जाईल " त्याजवर विठ्ठलराव बोलले कीं " या मेहरबानगीबद्दल मी तुमचा आभारी आहें; परंतु मज-पाशीं बहुत स्वार आहेत त्यांपैकीं साहाशें स्वार तरी तुम्ही सर-कार नौकरींत घेऊन त्यांजवर माझी सरदारी कायम ठेवावी. " परंतु मालकम् साहेबांनीं जबाब दिला कीं. " मी तुम्हांस जातीचे जाहागिरीबद्दल जें वचन दिलें आहे तें मीं एलफिन्स्टन साहेब यांस लिहून कळविलें आहे. त्याखेरीज मला आतां आधिक गुंततां येत नाहीं. तथापी तुम्हावर जितकी अधिक मेहेरबा-नगी करवेल तितकी करण्याविषयीं मी साहेबमौसूफ यांस लिहीन. बाजीराव हे आतां कोठे तरी भागीरथी तिरीं राहातील. त्यांजकडे जाण्याचें तुम्हास मुळींच कारण राहिलें नाहीं. याकरिता तुम्ही दक्षिणेस परत जाऊन एलफिन्स्टन सा-हेब यांची भेट घ्यावी; म्हणजे तें तुमची दरोबस्त जातीची जाहा-गीर व खासगत स्थावर जंगम मिळकत तुमचे ताब्यांत देतील आणि सर्व प्रकारें तुमचे दरजा प्रमाणें तुमचा मान ठेवितील." या-प्रमाणें मालकम् साहेब यांनीं विठ्ठलराव यांची खातरजमा करून त्यांस देशीं जाण्यास रजा दिल्यावर ते आपले छावणीस गेले. नंतर ते लवकरच दक्षिणेस जाण्यास निघाले, तेव्हां त्यांजबरोबर आबा पुरंदरे हेही निघाले.

---

(मागील पृष्ठावरून समाप्त.)

आणि जे लोक अद्यापपर्यंत त्यांजबरोबर आहेत त्यांस शेवटीं सांगितलेल्या सर-दारांपेक्षां अधिक चालविण्याचे मीं बोलत नाहीं. पेशव्यांच्या पदरच्या ज्या लोकांबरोबर तुम्ही ठरावाचें बोलणें चालविलें आहे त्या लोकांचे यापेक्षां अधिक हीत होण्याजोगें ठराव तुम्हीं त्यांजपाशीं करूंनये म्हणून हें पत्र तुम्हांस वेळेवर पोंहोचण्याची आशा मीं करितों, कारण, ज्या इतर लोकांनीं आमचे झेंड्याखालीं येऊन आमचे औदार्यावर सर्व भिस्त ठेविली आहे त्या लोकांबरोबर केलेल्या ठरावांपेक्षां जर कोणी पेशव्यांस हठवादीपणानें जडून राहिल्याबद्दलची एक ब-क्षिसी म्हणून तहनाम्यानें अधिक चांगले ठराव करून घेईल तर त्यापासून फार नुकसानीचा परिणाम होईल.

वर लिहिलेल्या युद्धाचे संबंधानें पेशव्यांचे लष्करी सरदारांचे बाबदींत एकंदरीनें विचार करितां त्यांपैकीं फक्त विंचूरकर, पुरंदरे व रास्ते हे त्रिवर्ग मात्र आपले मालिक पेशवे यांचे सुखदुःखांत भागीदार होऊन त्यांजबरोबर शेवटपर्यंत इमानदारीनें वागले, त्यामुळें त्यांचें अति मोठें नुकसानझालें. इंग्रज लोकांबरोबर उपस्थित झालेल्या लढाईचा परिणाम घातकारक होईल असें जरी त्यांस वाटलें होतें तरी इमान सोडूनये म्हणूनच केवळ ते बाजीराव साहेबांबरोबर त्यांचे संपूर्ण पर्यटनात त्यांस जडून राहिले. ते इमान सोडून इंग्रज सरकारचे पक्षास मिळाले असते तर, ज्याप्रमाणें पटवर्धन यांच्या सर्व दौलती कायम राहून त्यांस ज्यास्त मुलुक मिळाले, त्याचप्रमाणें त्यांच्याही दौलती कायम राहून त्यांस अधिक मुलूक मिळाले असते *

---

*पुण्याचे डेप्युटी एजेंट जॉन वाईन एस्क्वायर यांनीं सन१८३० चे सुमारास विंचुरकर यांचे दिवाणी अधिकाराचे बाबदींत सरकारास रिपोर्ट केला, त्यांतील उतारा खालीं दाखल केला आहे, तो पाहिला ह्मणजे वर लिहिलेल्या गोष्टीचा खुलासा वाचकांचे लक्षांत येईल.

‘ विंचूरचे चीफ हे पेशव्यांचें राज्यांत पहिल्या दर्ज्याचे लष्करी सरदार होते. त्यांचे हाताखालीं एक मोठी फौज होती. शिवाय त्यांचे स्वाधीन जरीपटका म्हणजे पेशव्यांचे राज्याचा मुख्य झेंडा होता. आणि ज्यावेळेस लढाई उपस्थित झाली त्यावेळेस पेंढारी लोकांचा दंगा मोडण्यास्तव इंग्रज सरकारचे मदतीस पेशव्यांचे फौजेचा जो एक विभाग दक्षिणेंत होता त्याचे छावणीचे मुख्य ठिकाणीं ते पेशव्यांचे तर्फेचे एक सेनापती ह्मणून आपले पतकानिशीं तळ देऊन पडले होते. खडकी येथील लढाईची खबर ऐकिल्यावर ते इंग्रज सेनापतीची रजा घेऊन निघून गेले; त्यांनीं संपूर्ण युद्ध संग्रामांत मराठी स्वारांचे इतर पतकांपेक्षां आपले स्वारांस अधिक तसदी दिली; आणि आपले सशास्त्र राज्याचे पक्षाकडे आपण असल्याचे दर्शविलें. आणि पेशवे हे आपले राज्य सर जॉन मालकम् यांचे स्वाधीन करित तोंपर्यंत त्यांनीं इंग्रज सरकारचें प्रभुत्व कधींही मान्य केलें नाहीं. बाजीरावांनीं आपलें राज्य सर जॉन मालकम् यांचे हातीं दिले त्यावेळेस त्यांचे लष्करांत दरोबस्त मराठे बडे लोकांपैकीं स्वामिभक्त असे विठ्ठलराव विंचुरकर, व आबा पुरंदरे हेच दोघे काय ते आढळलें. आणि त्यानंतर ज्या सरकारचे ते तांबेदार झाले त्या सरकाराबरोबर ते तेव्हांपासून तसाच

( पुढें चालू. )

फक्त विंचूरकर यांचे स्थितीचा विचार करितां, त्यांचे अतिशयच नुकसान झालें असें वाटतें. कारण त्यांचा दरोबस्त लष्करी सरंजाम जाऊन, शिवाय त्यांचे पूर्वज विठ्ठल शिवदेव यांनीं उत्तर हिंदुस्थानांतील राजे रजवाडे यांचे पुष्कळ उपयोगीं पडून त्या प्रांतीं त्यांजपासून एकंदर पंन्नास साठ हजार रुपयांचे वार्षिक अकाराचे इनाम मिळविलें होतें तें इंग्रजसरकारानें खालसा करून त्या प्रांतातील राजे रजवाडे यांस देऊनटाकिलें.

विठ्ठलराव विंचूरकर आपले फौजेनिशीं बाजीरावसाहेबा बरोबर पुण्याहून निघून गेल्यामुळें इंग्रज सरकारानें त्यास शत्रू समान मानून त्यांचे कबज्यांतील किल्ले व त्यांचा दरोबस्त फौजेचा व जातीचा सरंजाम, इनाम गांवें, वतनें व आंतील जंगम मिळकतीसुद्धां सर्व ठिकाणचे वाडे, येणे प्रमाणें जप्त केलें; परंतु बाजीरावसाहेब मालकम् साहेबांबरोबर ठराव करून भागीरथी तीरीं राहण्यास निघून गेल्यावर साहेब मौसूफ यांचे रजामंदिनेंते दक्षिणेस परत येण्यास निघाले अशी खबर पुण्याचे कमीशनर एलफिन्स्टन साहेब यांस लागतांच त्यांनीं त्यांचे पुण्यांतील व विंचुर येथील व इतर टिकाणचे जंगम मिळकतीसुद्धां दरोबस्त वाडे यांजवरील जप्त्या सोईसोईनें खुल्या करविल्या, त्यामुळें ते विंचुरास येऊन पोंहचले त्या वेळेस बीन हरकत आपले वाड्यांत जाऊन

---

(मागील पृष्ठावरून समाप्त.)

स्वामिभक्तीनें वागत आहेत. या सरदारास जर स्वतंत्र इन्साफ करण्याचा अधिकार अंगभूत नव्हता, तर तो पेशव्यांचे राज्यांतही नव्हता. परंतु दुर्दैवेंकरून त्या युद्धाचा असा परिणाम झाला आहे कीं उत्तम व परम राजनिष्ट लोक दरिद्रावस्थेस मिळाले आणि जे प्रथम फितूर झाले ते, पेशवे आपले पुणें येथलि राजवाड्यांत असतां, जितके सधन होते तितकेच सधन राहिले आहेत, कारण, ज्या लोकांनीं अतिसत्वर पेशव्यांचा पक्ष सोडिला त्या लोकांबरोबर उत्तम ठराव करणें हें आह्मांस हितावह वाटलें. यावरून लोक चुकून अशी कल्पना करितात कीं, जे विठ्ठलराव विंचुरकर येथें अप्रसिद्ध स्थितींत व दारिद्रावस्थेंत राहात आहेत ते आपलें देशबांधवांचे मत्तें एक यःकश्चित मनुष्य आहेत.

राहिले. तेथें त्यांचे सोबती आबासाहेब पुरंदरे हेही त्यांचे दोस्तीस्तव २।३ महिनेपर्यंत तेथें राहून नंतर पुण्यांस गेले.

वर लिहिलेल्या युद्धास आरंभ होण्यापूर्वी विठ्ठलराव यांनीं आपली स्त्री गंगाबाई यांजबरोबर कांहीं विश्वासू लोक व एक पागा देऊन त्यांस वांईस पाठविलें होतें. तेथें त्या कांहीं दिवस राहिल्यावर जे चंदन वंदनचे किल्ले विठ्ठलराव यांचे कबजांत होते त्याजवर त्या राहण्यास गेल्या. तेथें कांहीं दिवस राहून तेथून त्या नाशीकास येऊन राहिल्या, आणि विठ्ठलराव विंचुरास परत आल्यावर त्या दरोबस्त खटल्यासुद्धा विंचुरास परत आल्या.

नंतर कांहीं दिवसांनीं विठ्ठलराव हे एलफिन्स्टन साहेब यांचे भेटीकरितां पुण्यास गेले. तेव्हां त्या साहेबांनीं त्यांची भेट योग्य सत्कारानें घेऊन त्यांची मोठी खातर केली; आणि त्यांचे गुजाऱ्यास्तव त्यांचीं इनामी गांवें व वतनें त्यांचें हातांत देऊन त्यांचा जातीचा सरंजाम त्यांजकडे चालविण्याचा ठराव केला. हा ठराव मालकम् साहेब यांचे वचनास अनुसरून होता; व त्याचेच आधारानें एलफिन्स्टन साहेब यांनीं सन १८१९ इसवी सालीं गवरनर जनरल यांस जो सरंजामपट पाठविला त्यांत विठ्ठलराव यांचे नांवासमूर सर्व खुलासा लिहिला. तो ठराव गव्हरनर जनरल यांनीं सन १८२० इसवी सालीं मंजूर केला.

मालकम साहेब यांनीं सदर्हू वचन एलफिन्स्टन् साहेब कमिशनर यास आपले तारीख ५ माहे जून तारीख २६ जुलई सन १८१८ इ० चे पत्रांत कळविलें होतें व मुख्यत्वेंकरून त्या पत्रांचेच आधारानें सदर्हू जहागीर विठ्ठलराव विंचूरकर याजकडे वंशपरंपरेनें चालविण्याविषयीं मिस्तर एलफिस्टन् यानीं वर लिहिलेले सरंजामपटांत गव्हरनर जनरल यांस सिफारिष केली होती सबब मराठी तरजम्यासुद्धां सदर्हू पत्रांच्या नकला व सरंजाम पटाचा उतारा वाचकांचे माहितीं करितां आह्मीं पुढें दाखल करितों.

---

To

THE HON'BLE MOUNTSTUART ELPHINSTONE,
*Resident at Poona.*

SIR,

I have the honor to acknowledge the receipt of your letter of the 28th Ultimo.

You will see by my late communications that in the propositions I made to Bajirao and upon which he has submitted, I have pledged the Government to no more than that the claims of the Jageerdars should be taken into consideration. In my personal intercourse with the Vakeels, I went no further, and the Jageerdars included in the promise are only the Vinchurkar, the Purandare Chief and the family of Goklah.

Since the receipt of your letter, I have felt myself at liberty to communicate to those Chiefs that though they were not entitled to it, I was confident the liberality of the Governor General would place them on a footing with those Chiefs who had left Bajirao subsequent to the action with Colonel Adam and that I understood it was intended their personal Jageers should be left them, but no Sarinjami lands. I thought it of consequence to make this communication as it relieved those to whom it relates from a state of suspense and will enable them to make arrangements at an early period for the dismissal of their followers.

I cannot conclude this letter without stating that the Vinchurkar has, throughout the negotiation, made every effort to promote an early settlement, and the course he took has no doubt been productive of considerable influence in bringing the wavering mind of Bajirao to the resolution he has adopted. His conduct may, perhaps, hereafter entitle him to some mark of favor. He earnestly entreated that I would recommend five or six hundred of his horse being kept in the English service in any way you

chose. This, however, I refused to do, not knowing how far you might deem such a measure either convenient or politic.

I have the honor &c.,
(Signed) JOHN MALCOLM.

Camp Metawal,
5th June 1818.

---

सदर्हूचा मराठी तरजमा.

आनरेबल मौन्ट स्टुवर्ट एलफिन्स्टन
पुणें येथील रेसिडेंट यांस,

साहेब,

तुमचें तारीख २८ माहे गुदस्तचें पत्र पावलें.

मीं आलीकडे तुम्हांस जीं पत्रें पाठविलीं त्यांवरून तुम्हांस दिसून येईल कीं, बाजीराव यांजपाशीं मीं जें बोलणें लाविलें व ज्या बोलण्यावरून ते शरण आले आहेत त्या बोलण्यांत जाहगिरदार यांचे हक्कांचा विचार करावा इतकेंच असून त्याखेरीज मी सरकारास अधिक गुंतविलें नाहीं. माझें बोलणें वकिलांशीं समक्ष झालें त्यांत मीं अणखीं पुढें वाढलों नाहीं व वचनांत जे जाहगिरदार दाखल केले आहेत ते फक्त विंचूरकर, पुरंदरे चीफ व गोखले यांचें घराणें इतकेंच आहेत.

तुमचें पत्र पावल्यापासून मीं त्यांस मोकळेपणें असें कळविलें आहे कीं, जरी तुमचें हक्काचा विचार करण्यावर तुमचा दावा नाहीं तरी मला अशी खात्री आहे कीं, कर्नल आडम यांजबरोबर लढाई झाल्या नंतर ज्या चीफ लोकांनीं बाजीरावांस सोडिलें त्यांचिफांप्रमाणें गवरनर जनरल यांचें औदार्यानें तुमचाही दरजा समजला जाईल व मला असें कळून आलें आहे कीं, तुमच्या सरंजामी जमिनी (गांव) तुम्हांकडे न चालवितां फक्त तुमच्या जातीच्या जाहगिरी मात्र तुम्हांस सोडल्या जातील. त्यां लोकांस हा मजकूर कळविणें मला महत्वाचें वाटलें, कारण त्या मजकुरांशीं

ज्यांचा ज्यांचा संबंध पोंहचत आहे त्यां लोकांचे मनांतील दुग्धा तेणेंकरून दूर होऊन आपले पदरचे लोकांस दूर करण्याची तजवीज करण्यास ते सत्वर समर्थ होतील.

बाजीरावांबरोबर बोलणें चाललें असतां, सत्वर निकाल लागण्यास्तव विंचूरकर यांनीं हरएकप्रकारें यत्न केला व जो मार्ग त्यांनीं स्वीकारिला तेणेंकरून बाजीराव यानीं केलेला निश्चय बनवून आणण्यास्तव त्यांचे डगमगणारें मन बधविण्यास बरीच अनुकूलता झाली यांत संशय नाहीं असें कळविल्यावांचून मला हें पत्र पुरें करितां येत नाहीं.

त्यांची (विंचूरकर यांची) वर्तणूक अशी आहे कीं, ती कदाचित् यापुढें त्यांस कांहीं मेहेरबानगीचे खुशेस पात्र करील. जी रीत तुमचे पसंतीस येईल त्या रीतीनें त्यांचे ६०० स्वार इंग्रजी नौकरींत ठेवण्याविषयीं तुम्हांस सिफारिष् करावी ह्मणून त्यानीं मला विनंति केली. तथापि असें करणें मीं नाकबूल केलें, कारण अशी तजवीज तुम्हांस किती सोईची किंवा शाहाणपणाची वाटेल हें मला कळून आलें नव्हतें.

मुक्काम भिटावल, तारिख ५ जून सन १८१८. } मीं आहें वगैरे, (सही) **जॉन मालकम्.**

---

To

THE HON'BLE MOUNTSTUART ELPHINSTONE,
*Resident at Poona.*

SIR,

I have receved your letter of the 18th Instant. In explanation of mine of the 5th of June, I have to state that the assurance I gave to the representatives of the Jageerdars—Vinchurkar, Purandare, and Goklah, regarding their personal lands (Jatkee Jageer) were so strong as to amount in my opinion to an engagement, and I should consider them as binding upon the

British faith as if such had been written. The necessity for the aid of those persons did not cease upon the Peishwa's submission. It was essential to the dispersion of his troops and to reconcile his mind to his altered condition and it was throughout freely given. To ensure that object, as well as to dispel unreasonable expectations, it was of consequence to state something specific at as early a period as possible and I congratulated myself on being able to do this by the receipt of your communications of the 20th of May which reached me at the very cricis when such an assurance was necessary.

The statement of the Vinchurkar's Vakeel is, as you conjecture, false. His master never rejected the boon of his personal Jageer. He was from the first grateful for it. It is true that he most earnestly entreated I would write you to shew him any further indulgence you could, and he was most solicitous that you should keep up a part of his horse. I told him that I was confident, he would meet with every reasonable indulgence but that I could promise nothing but his personal Jageer.

The Vinchurkar never proposed to stay with Bajirao, nor did he ever bring forward any thing in the shape of conditions connected with his return to the Deccan. With regard to the Purandare chiefs and Ramchandra and those who were at the head of the Goklah troops, they appeared, from the first, satisfied with the promises made and did not ask for any thing more, nor should I have treated such a request, had they made it, with that attention I gave to the Vinchurkar who, from his family and rank, I considered it might be politic to treat with every kindness and respect.

I have the honor to be &c.,

(Signed) JOHN MALCOLM.

Camp Nily,

26th July 1818.

## सदहूचा मराठी तरजमा.

आनरेबल मौन्ट स्टुवर्ट एल्फिन्स्टन
पुणें येथील रेसिडेंट यांस,

साहेब,

तुमचें तारीख १८ माहे मजकूरचें पत्र मला पावलें. माझे तारीख ५ माहे जूनचे पत्राचा खुलासा कण्यांत मीं तुम्हांस कळविलें कीं विंचूरकर, पुरंदरे व गोखले यां जाहागिरदारांचे वकिलांस जातीचे जाहगिरींचे बाबदींत मीं आश्वासनें दिलीं आहेत तीं इतकीं मजबूत आहेत कीं माझे मतें तीं लेखी वचना प्रमाणें आहेत व जशीं लेखी वचनें द्यावीं त्याप्रमाणेंच तीं इंग्रज सरकारचा विश्वास गुंतविणारीं आहेत असें मला मानणें भाग आहे. पेशवे शरण आल्यावर ही त्या लोकांचे मदतीची गरज नाहींशी झाली नाहीं. त्यांचे ( पेशव्यांचे ) फौजेची दाणादाण करण्यास व त्यांचे बदललेले स्थितीस त्यांचे मन राजीकर्ण्यास त्यांची ( वरलिहिलेले चीफ यांची ) मदत अवश्य पाहिजे होती व ती त्यानीं हमेषा मोकळेमनानें दिली. तो हेतू सिद्धिस जाण्याचा वंदोबस्त कर्ण्यास व त्याप्रमाणेंच गैरवाजवी आशा दूर करण्यास साधेल तितकें सत्वर त्यांस कांहीं तरी विशेष खुलासेवार कळविणें महत्वाचें होतें, व ज्या वेळेस असें अश्वासन देणें अवश्य होतें त्या ऐन वेळेस तुमचें तारीख २८ माहे मे चें पत्र मला येऊन पोंहोचलें त्यामुळें मीं त्याप्रमाणें करण्यास समर्थ झालों. म्हणून मीं संतोष मानिला.

तुम्ही अटकळ करितां त्याप्रमाणें विंचूरकर यांचे वकिलानें कळविलेला मजकूर खोटा आहे, कारण, त्याचे मालिकांनीं जातीच्या जाहगिरीची देहनगी नाकबूल केली नाहीं. प्रथम पासून ते त्याबद्दल आभारी झाले आहेत. इतकें खरें आहे कीं तुमच्यानें करवेल तितकी त्यांजवर अणखीं मेहेरबानगी करण्याविषयीं मीं तुम्हांस ल्याहावें अशी त्यानीं मला परम उत्कंठेनें विनंती केली

व त्यांचे स्वारांपैकीं कांहीं स्वार तुम्हीं कायम ठेवावे म्हणून त्यांस मोठी फिकीर होती. मी त्यांस कळविलें कीं तुम्हांवर हरएक प्रकारें वाजवी मेहेरबानगी होण्याविषयीं माझी खात्री आहे; परंतु तुमचे जातीचे जाहगिरी शिवाय अगखीं कोणतेही गोष्टीविषयीं मला तुम्हास वचन देतां येत नाहीं.

बाजीराव यांजबरोबर राहण्याचे बाबदींत विंचूरकर हे कधींही बोलले नाहींत व दक्षिणेस परत जाण्याचे बाबदींत ठराव म्हणून त्यांनीं कधीं कोणतीही गोष्ट काढिली नाहीं. पुरंदरचे चीफ व रामचंद्र व गोखल्याचे फौजेवर जे मुख्य होते त्यांविषयीं ठरलेंतर त्यांस जीं वचनें देण्यांत आलीं तेणें करूनच ते प्रथमपासून संतुष्टसे दिसले व त्यांनीं अधिक कांहींच मागितलें नाहीं; व त्यांनीं एकादी विनंति केली असती तर ज्या विंचुरकरांस त्यांचे खानदानी व पदवीमुळें मेहेरबानगीनें व बहुमानानें वागविणें हें नजाविजीचें होईल असें मला वाटलें त्या विंचुरकरांकडे जे लक्ष मीं पुरविलें तें लक्ष त्यांचे विनंतीकडे मीं पुरविलें नसतें.

| | |
|---|---|
| मुक्काम नीलि<br>तारीख २६ जुलई सन १८१८. | मीं आहे वगैरे,<br>( सही ) जॉन मालकम |

Extract from the Sarinjam List submitted in 1819 by the Hon'ble Mountstuart Elphinstone then Sole Commissioner in the Deccan to His Excellency the Governor General of India.

| Serial Number | Name. | Class. | Remarks. | Decision. | Total of the Jaghir as it stood at the breaking out of the war. | Number of years in possession. | Jaghir or Yearly allowance to be restored. | | For what period recommended. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | Kamal or greatest recorded collection. | Estimated real value at present. | |
| 1 | Vithal Narsing Vinchurkar. | Sardar or great Chief. | A great Chief; most of his Jaghir is of ancient date; submitted to Sir John Malcolm with the Peishwa. | The whole of his personal lands according to the Daftar to be restored. This is proper in consequence of the respectability of the Chief and of the promises of Sir John Malcolm Communicated in his letters dated 5th June and 26th July 1818. | 1238568 | 58 | 55556-2 | 35963-3-2 | Hereditary. |

## VITHAL NARSING VINCHURKAR.

1 The whole of the personal lands of the Vinchurkar according to the Daftar to be restored. This is proper in consequence of the respectability of the Chief as they were promised by Sir John Malcolm to be restored hereditarily as Per his letters of the 5th June and 26th July 1818. To be hereditary.

---

## सदर्हूचा मराठी तरजमा.

| नंबर. | नांव. | प्रत. | व्याख्या. | ठराव. | एकंदर जाहागीरीचें उत्पन्न लढाईचे सुरुवातीस होते त्याप्रमाणें रुपये. | कब्जांत किती वर्षे होते त्या वर्षांची संख्या | जाहागीर अथवा वार्षिक नेमणूक बाहाल करावयाची ती. | किती कालपर्यंत चालण्याविषयीं शिफारीष झाली आहे. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | विठ्ठल नरसिंह विंचूरकर | सरदार म्हणजे मोठें चीफ | मोठे चीफ; यांचे जाहागीरीपैकीं बहुतेक प्राचीन तारिखेची आहे; हे पेशव्यांबरोबर सरजान मालकम यांस शरण आले. | यांच्या दरोबस्त खासगत जमीनी दफतरांत लिहिल्याप्रमाणें बाहाल करावयाच्या. या चिफांचे प्रतिष्ठितपणास्तव व सरजान मालकम यांचे तारीख ५जून व २६ जुलई सन १८१८चें पत्रांत कळविलेले वचनास्तव असें करणें वाजवी आहे. | १२३८५६८ | ५८ | कमाल म्हणजे फार मोठी जमाबंदी रिकार्डात दाखल आहे ती ५५५५६–२<br>सांप्रत वास्तविक वसूली आकार ३५९६३–३–२ | वंशपरंपरेनें. |

या सरंजाम पटाच्या उताऱ्या शिवाय एलफिन्स्टनसाहेब कमिशनर यांनीं आपले दफ्तरांत शेरा निराळा लिहून ठेविला तो असा;—

## विठ्ठल नरसिंह विंचुरकर.

दफ्तरांत लिहिल्याप्रमाणें विंचुरकर यांच्या दरोबस्त जातीच्या जमिनी ( सरंजाम ) त्यांजकडे सोडावयाच्या आहेत. सदहू जमिनी ( सरंजाम ) सर जॉन मालकम् यांनीं आपले तारीख ५ जून व तारीख २६ जुलई सन १८१८ इ० चें पत्रांत वंशपरंपरेचे शर्तीनें चालविण्याविषयीं वचन दिलें आहे सबब या सरदारांचे थोरपणास्तव तसें करणें बराबर आहे. वंशपरंपरेनें चालवाव्या.

---

विठ्ठलराव विंचुरास पोंहचले तेव्हां त्यांजबरोबर पंधराशें स्वार होते. शिवाय हत्ती, उंट वगैरे सरंजाम बराच होता. या जनावरांस चाऱ्याची अडचण पडूंनये म्हणून एलफिन्स्टन साहेब यांनीं, विंचुरापासून आठ कोसांवर गोदातीरीं चाटोरी म्हणून गांव आहे तेथील एक मोठें कुरण, व विठ्ठलराव हे पुण्यास गेले असतां तेथें ही वगैरे अडचण पडूंनये म्हणून सिंहगडाजवळ डोणजे गांवानजीक एक कुरण, अशीं दोन कुरणें, त्यांचे जातीचे सरंजामाशिवाय त्यांस नवीन बक्षिस दिलीं.

विठ्ठलराव हे बाजीरावसाहेब यांजबरोबर गेले असतां त्यांचे पश्चात इंग्रज सरकारानें त्यांचे ताब्यांतील किल्ल्यांत अंमल केला यामुळें त्यांतील खजिना व मौल्यवान चिजवस्त सर्व गेली. पुढें ते विंचुरास आल्यावर त्यांस आपला खर्च चालविण्यास कांहींच आधार राहिला नाहीं. तशांत त्यांचे जातसरंजामाचे व इनामाचे गांव व वतनें त्यांचे कबज्यांत येण्यास सरासरी एक वर्ष लागलें त्यामुळें त्यांस नवीन सावकारी देण्याचा पेंच झाला. शिवाय, त्यांस पेशवाई अमलांतील फौजे संबंधी वगैरे पुष्कळ देणें होतें. त्याबद्दल त्यांस सावकार लोकांचे तगादे लागले. हा मजकूर एलफिन्स्टन साहेब यांस कळल्यावर त्यांनीं सावकार लोकांस बोलावून त्यांस असें कळविलें कीं, "दौलती संबंधाचे देणें तें दौलती बरोबर गेलें. त्याबद्दल तुम्ही आतां विंचूरकर यांस तगादा करूंनये." याप्रमाणें साहेबमेहेरबान यांनीं सावकार लोकांस सांगून विठ्ठलराव यांस मागील देण्याचे पेचांतून मुक्त केलें.

एलफिन्स्टन साहेब यांनीं विठ्ठलराव यांजकडे फक्त जातीचा सरंजाम मात्र चालविला, यामुळें पूर्वापार चालत आल्याप्रमाणें आपले संस्थानचा जो खर्च चालविणें त्यांस अवश्य होते तो खर्च भागविण्याची त्यांस मोठी पंचाईत पडूंलागली. त्यांचे पदरीं पुरातन पिढीजादी नोकर मंडळी पुष्कळ होती. त्यांत कारभारी, कारकून, मानकरी, आश्रित, पेनशनर, वगैरे असून शिवाय हत्ती,

घोडे वगैरे पुष्कळ खटला होता. पैकीं हत्ती, घोडे वगैरेंची कळेल तशी व्यवस्था लावून त्या खर्चाचे अडचणीपासून ते मुक्त झाले. परंतु ज्या नौकर लोकांनीं चार पिढ्या इमानदारीनें नौकरी केली होती त्यांस एकदम दूर करण्याचे त्यांस मरणा पेक्षांही विशेष दुखः वाटूं लागलें. शिवाय नृसिंहजयंतीचा उत्साह वंशपरंपरानें चालत आला होता, त्याचे खर्चास त्यांचे पूर्वजांनीं दाहा हजार रुपयांची नेमणूक करून दिली होती. फक्त जातसरंजामाचे उत्पन्नानें या सर्व खर्चाचा कसा निर्वाह होईल अशी त्यांस विवंचना प्राप्त होऊन त्यांचें मन अगदीं अस्वस्थ झालें. तत्रापि इंग्रज सरकारानें जें उत्पन्न चालविलें आहे तेव्हडयानेंच होईल तसा निर्वाह करावा असें त्यांनीं मनांत आणून सुटलेले सरंजामाचे उत्पन्नापैकीं पंधरा हजारांचें उत्पन्न केवळ पिढीजादे नौकरांचे निर्वाहाकरितां नेमिलें. त्यापैकीं पेनशनर लोकांस सनदी जमिनी, आश्रित मंडळीस वर्षासनें, कारभारी, कारकून, वगैरेंस पगार व कितीएक आश्रितांस फक्त पंक्तीचें भोजन, याप्रमाणें ठरवून सर्वांचा सरासरी निर्वाह चालेल अशी व्यवस्था केली. नृसिंहजयंतीचे उत्साहास पांच हजार रुपये खर्च करण्याचा नियम करून त्यांत होईल तितकी काटकसर ते करूं लागले. तसेंच स्वतःचा लवाजमा वगैरे खर्चाच्या संबंधानें पुष्कळ तंगी सोसून दिवस काटावे असा त्यांनीं दृढ निश्चय करून तसा क्रम चालविला. तत्रापिही एकादे वर्षी अवर्षण पडलें किंवा घराण्याचे थोरपणास्तव एकादा आगंतुक खर्च करावा लागला ह्मणजे तो भागविण्याची त्यांस मोठी मारामार व पंचाईत पडे व कधींकधीं तर ऋण सुद्धां करावें लागे. सबब, पुढें मालकम् साहेब मुंबईचे गव्हरनर झाल्यावर त्यांनीं आपल्या सर्व स्थितीची कच्ची हकीकत त्यांस श्रुत केली. ती ऐकून त्या साहेबांस वाटलें कीं हे थोर प्राचीन सरदार दरिद्रावस्थेस मिळाले ते केवळ आपले मालिकांबरोबर नमकहरामी न करितां नेकीनें वागल्यामुळेंच मिळाले आहेत. याक-

करितां आपल्याकडून होईल तितकी त्यांस मदत करणे उचित आहे. सबब केवळ मेहरबानीस्तवच त्यांनीं त्यांचें स्वतःचे लवाजम्याचा खर्च भागण्यासाठीं त्यांस मायगांव व ब्राह्मणगांव अशीं दोन गांवें नवीन दिलीं. त्यांच्या वार्षिक उत्पन्नाचा एकंदर आकार रुपये दोन हजार होता. पैकीं मायगांव गोदावरी तिरीं व ब्राह्मणगांव विंचुरा नजीक, अशीं आहेत. हीं गांवें त्यांचे अंतकाळपर्यंत त्यांजकडे चाललीं. याच संधीस विठ्ठलराव यांच्या जेष्ट कंन्येचे विवाहाचा निश्चय झाला सबब त्याचें खर्चाचे मदतीस मालकम् साहेब गव्हरनर यानीं त्यांस पंधराहजार रुपये बाक्षिस दिले.

वर लिहिलेली लढाई चालू असतां, इंग्रज सरकारानें विठ्ठलराव विंचूरकर यांचे लष्करी सरंजामा बरोबर त्यांची उत्तर हिंदुस्थानांतील इनामें जप्त करून शिंदे व इतर राजे रजवाडे यांस देऊन टाकिलीं असें वर एकेठिकाणीं लिहिलें आहे. पुढें त्या इनामांचे बाबदींत काय हकीकत झाली हें वाचकांचे समजुती करितां आह्मी पुढें थोडक्यांत लिहितों.

विठ्ठलराव हे पुण्याचे रेसिडेंट एलफिन्स्टन साहेब यांचे मर्जी विरुद्ध बाजीराव साहेबांबरोबर आखेर पर्यंत नेकीनें वागल्यामुळें त्यांजविषयीं साहेबमौसूफ यांचे मनांत वाईटपणा आला होता; परंतु पुढें ते साहेब मुंबईचे गव्हरनर झाल्यावर, प्रथम विठ्ठलरावांचे वडील नरसिंहराव यानीं व त्यानंतर खुद्द विठ्ठलराव यानीं पेंढारी लोकांचे बंदोबस्ताचे कामांत इंग्रज सरकारचे लष्कारी सरदारांबरोबर जें तारिफ करण्याजोगें वर्तन केलें होतें, व त्याचप्रमाणें दक्षिणेंत इंग्रजी अंमल झाल्यानंतर, आपण आतां इंग्रजसरकारचे ताबेदार झालों त्यापेक्षां आतां आपणास त्यांचे तंत्रानें वागणें भाग आहे, असें विठ्ठलराव यांनीं पक्कें समजून, इंग्रज कामगारां बरोबर निराभिमानानें व इमानदारीनें केवळ कित्ता घेण्याजोगें वर्तन केलें होतें, या गोष्टी त्यांचे मनांत आल्यावर त्यांतील वाईट-

पणा दूर झाला;आणि त्यांचे घराण्याची कारकीर्द शाहू माहाराजांचे वेळेपासून असून त्यांचे पूर्वजांनीं पेशवाईत आपले जवांमर्दी मुळें मोठी योग्यता मिळविली होती आणि केवळ स्वराज्य नष्ट झाल्यामुळेंच तें घराणें दरिद्रावस्थेस मिळालेंहोतें, या गोष्टी त्यांचे मनांत ठसून त्यांस विठ्ठलराव यांचा कळवळा आला आणि योग्य संधी येईल त्यावेळेस त्यांजवर साधेल तितकी मेहरबानगी करण्याचा त्यानीं निश्चय केला, आणि पुढें विठ्ठलराव यानीं आपलीं सर्द्दहू इनामें परत मिळण्याविषयीं त्यांस अर्ज केल्यावर त्यांनीं तीं इनामें कधीं व कोणापासून संपादन केलेलीं होतीं या बद्दलची हकीकत व सनदा वगैरे पुरावे त्यांजपासून मागून घेऊन तीं ( इनामें ) त्यांस परत देण्याविषयीं इंडिया सरकारास सिफारिष केली. पुढें थोडकेच दिवसांनीं ते साहेब विलायतेस निघून गेले.

इंडिया सरकारानीं सदर्हू बाबतींत ग्वाल्हेरचे रेसिडेंट आणि बुंदेलखंडांतील पोलिटिकल एजेंट यांचे रिपोर्ट मागवून नंतर मुंबई सरकारास नाकबुलीचा जबाब पाठविला. त्या जबाबाची नक्कल पोट कागदां सहित मुंबईचे त्या वेळचे गव्हरनर यानीं पुण्याचे डेप्युटी एजेंट यांचे मार्फत विठ्ठलराव यांजकडे पाठविली. ती वाचकांचे माहिती करितां आम्ही पुढें दाखल करितों.

No. 751.

POLITICAL DEPARTMENT.

*Bombay Castle,* 14*th July* 1829.

To

THE AGENT FOR SIRDARS IN THE DECCAN AT POONA.

SIR,

With reference to the translate of a Memorandum from the Vinchurkar's Vakeel dated the 14th November last, respecting his Master's claim to some Inams

in Hindustan, I am directed to transmit to you copy of a letter from the Deputy Secretary to the Supreme Government of the 15th May with copies of Communications from the Acting Resident at Gwalior and Agent to the Governor General in Bundelkhand on the subject, and to acquaint you that these Communications appear to the Governor in Council conclusive as to the Vinchurkar's claim in Hindustan.

You will be pleased to make known to Vinchurkar the Resolution of the Governor General in Council on the point at issue.

I have the honor to be &c.,

(Signed) CHARLES NORRIS,

*Acting Chief Secretary.*

---

To

WILLIAM NEWNHAM, Esquire,

*Chief Secretary to Government of Bombay,*

Sir,

I am directed to acknowledge the receipt of your despatch dated 2nd December last and to transmit, for the consideration of the Honorable the Governor in Council of Bombay, the accompanying copies of letters from the Acting Resident at Gwalior and Agent to the Governor General in Bundelkhand dated respectively the 20th January and 22nd Ultimo replying to calls made on them for information regarding the Districts and allowance claimed by the Vinchurkar.

The Right Honorable the Governor General in Council is quite satisfied from a perusal of the Minute recorded by the Honorable the Governor that subsequent to the surrender of Bajirao, the conduct of the Vinchurkar, as a subject of the British Government, has been in every respect unexceptionable and even exemplary ; but as already intimated in my letter dated 28th December 1827, his adherence to the

cause of the Peishwa during the war, was considered by the Government of the day, to have justified and required the resumption of all his rights and possessions of every description in Hindustan and they were in consequence transferred to Scindia and others and are no longer at our disposal.

I have the honor &c.,

(Signed) A. STIRLING,

*Deputy Secretary to Government.*

Fort William,
15th May 1829.

(True Copies.)

(Signed) JOHN WARDEN,

*Deputy Agent.*

## सदर्हूचा मराठी तरजमा.

नंबर ७५१.

राजकीय खातें.

जंजीरे मुंबई तारीख १४ जुलई सन १८२९ इ०

दक्षिणेंतील सरदार लोकांबद्दलचे पुणें येथील एजेंट यांस,

साहेब,

आपले मालिकाचे हिंदुस्थानांतील कांहीं इनामावरील दाव्याचे बाबदींत विंचुरकर यांचे वकिलाकडून तारीख १४ नोवेंबर सन १८२८ इ० ची एक यादी आली तिचे बाबदींत ग्वाल्हेर येथील अक्टिंग रेसिडेंट व गवव्हनरजनरल यांचे बुंदेलखंडांतील एजेंट यांजकडून आलेल्या पत्रांच्या नकलां सहित मुख्य सरकारचे डेप्युटी सेक्रेटरी यांजकडून तारीख १५ माहे मेचे आलेले पत्राची नक्कल मीं तुम्हांकडे सरकारच्या हुकुमावरून पाठवून तुम्हांस असें कळवितों कीं, विंचूरकर यांचे हिंदुस्थानांतील दाव्याविषयीं सदर्हू पत्रें गव्हरनर जनरल इन्कौन्सिल यांस निर्ण-

यात्मक वाटतात. याजकरितां गव्हरनरजनरल इन्कौन्सिल यांनीं सदर्हू बाबदींत जो ठराव केला तो तुम्ही विंचुरकर यांस कळवावा.

मीं आहें वगैरे.

( सही ) च्यारलेस नारीस,

अक्टिंग चिफ् सेक्रेटरी.

---

ऊइलियम न्युनहाम एस्कायर

चिफ् सेक्रेटरी निसबत सरकार मुंबई

साहेब, यांस.

तुह्मांकडून तारिख २ डिसेंबर सन १८२८ चें पत्र आलें तें पावलें असें हुकमा वरून कळवून, विंचूरकर यानीं ज्या माहालांवर व नेमणूकेवर दावा केला होता ते माहाल व नेमणूक यां विषयींची माहिती पाठवावी ह्मणून इकडून ग्वाल्हेरचें अक्टिंग रेसिडेंट व गव्हरनर जनरल यांचे बुंदेलखडांतील एजेंट यांस पत्रें लिहून गेलीं असून त्यांचे जबाबांत त्यांजकडून तारिख २० ज्यान्यूआरी व तारिख २२ माहे एप्रिलचीं पत्रें आलीं, त्याच्या नकला नेक नामदार गव्हरनर साहेब दर इजलास कौन्सिल यांचे विचाराकरितां मी या सोबत पाठवीत आहें.

नेक नामदार गव्हरनर साहेब यांनीं लिहून ठेविलेलें मिनिट राईट आनरेबल धी गवरनर जनरल इन्कौन्सिल यांनीं वाचून पाहिल्यावरून बाजीराव इंग्रज सरकारचे स्वाधीन झाल्यावर इंग्रज सरकारचे ताबेदार या नात्यानें विंचूरकर यांची वर्तणूक हरएक प्रकारें निर्बाधाची व किंत्ता घेण्यासारखी सुद्धा चालत आली आहे अशी त्यांची अगदीं खात्री होत आहे; परंतु मीं आपले तारिख २९ माहे दिसेंबर सन १८२७ इ० चे पत्रांत पूर्वींच कळविलें आहे त्याप्रमाणें लढाई चालू असतां ते पेशव्याचे पक्षास धरून राहिले त्यामुळें त्यांचे हिंदुस्थानांतील हरएक प्रकारचे हक्क व दरोबस्त अंमल खालसा करणें जरूरीचें व वाजवी आहे असें

त्या काळच्या सरकारास वाटलें त्यामुळें ते ( खालसा करून ) शिंदे व इतर संस्थानिक यांस देण्यांत आले. ते आतां आमचे स्वाधिन राहिले नाहींत.

किले उईलियम तारिख १५ माहे मे सन १८२९ इ० } मी आहे वगैरे. सही ए. स्टरलिंग डेप्युटी सेक्रेटरी निसबत सरकार.

---

इंडिया सरकारचे वर लिहिलेले जबाबांत विठ्ठलराव यांची सदहू इनामें न सोडण्यास ते लढाई आखेर पेशव्यांचे पक्षास जडून राहिले होते, हें मुख्य कारण लागू केलें होतें. सबब सदहू लढाई सुरू होंण्याचे वेळेस इंग्रज सरकारचे एक सेनापती जनरल स्मीथ यांजबरोबर आपलें वर्तन कसें होतें व आपल्यास इंग्रज सरकारचा पक्ष सोडून जाण्यास काय कारण झालें होतें त्याचें स्पष्टीकरण करण्याचा विठ्ठलराव यांनीं निश्चय करून त्याबद्दल दाखला मिळण्याविषयीं जनरल स्मीथ यांस विनंती केली. ती जनरल मौसूफ यानीं मान्य करून त्यांस मागितलेला दाखला दिला. सदहू दाखल्याची नक्कल वाचकांचे माहितीकरितां आम्ही पुढें दाखल करितों.

"It is impossible I could receive the accompanying letter from the Vinchurkar with indifference or neglect. I therefore proceed to answer it.

Perhaps, indeed, I am positive there is no Jahagirdar in the Deccan who has served so much or mixed so much with British officers as Tatiasaheb Vinchurkar.

He began with his Contingent with Colonel Wallace, and he took the field with me in 1815-16-17. About 1500 of his horse were with me when the disturbances broke out and I had great difficulty in making them leave my Camp, though they must have been aware that Bajirao had gone to war with us. I mention this because it was all characterestic of Tatiasaheb Vinchurkar. He thought it was his duty to keep his troops with me, because his master had ordered them there, and it was not, in fact, till after

this Sirdar had received a warning that I would treat his people as enimies, if they did not leave my Camp, that they moved away.

In the same spirit of punctilious good faith, when he joind Bajirao's army, he stood to him through all his difficulties, and it is honorable to him to say and no more than just that he did his duty to that unfortunate prince far better than any other Jahagirdar of his army, and I am convinced from what I know of Tatiasaheb's honorable disposition that he would now adhere to our Government, if need come, with the same fidelity and resolution that he manifested in the cause of the Peishwa.

I have understood, Tatiasaheb has sufferred from not submitting earlier ; but this was impossible for one of his honorable and chivalrous disposition. It was not in his nature to have acted like the Nipankar or Chintamanrao who had Vakeels with Mr. Elphinstone the whole time they were pretending to fight for Bajirao. But these Jahagirdars received back their Estates, and Tatiasaheb is reduced to extreme poverty for his faithful adherence to his lawful sovereign until that sovereign surrendered himself to our power.

Were the example any longer useful, it would be necessary : but policy and generosity seem to invite us to forgive the loyalty of these highminded men to their own sovereign and endeavour to secure that virtue from them to our own Government.

Tatiasaheb's fallen fortune as one of the oldest and most influential families in the Deccan is a source of extensive regret in this country and any amelioration that could be applied to his reduced circumstances would highly raise our reputation for forbearance and generosity to those great men who have come under our power."

(Signed) LIONEL SMITH,

*Major General.*

Camp Seroor,
30th June 1829.

या सोबतचें पत्र विंचूरकर यांजकडून आलें आहे. त्याजकडे दुर्लक्ष करणें किंवा त्याची हेरसांड करणें अशक्य आहे. याकरितां त्याचा जबाब देण्यास मी प्रवर्तक होतों.

वस्तुतः मी साफ साफ बोलतों कीं, तात्या साहेब विंचूरकरां इतका सरकारचे लष्करी कामगारांत मिसळलेला किंवा त्यांजबरोबर नौकरी बजावलेला असा जाहागिरदार दक्षिणेंत कदाचित नसेलच.

या गोष्टीची सुरुवात त्यांनीं आपलें पतकाचे स्वारांनिशीं कर्नेल वालेस यांजबरोबर करून सन १८१५--१६--१७ इसवी या सालांत मजबरोबर मुलुकगीरी केली, आणि लढाइ उपस्थित झाली त्यावेळेस त्यांचे सुमारें १५०० स्वार मजबरोबर होते; आणि बाजीराव हे आह्मांबरोबर लढाई करण्यास प्रवर्तक झाले असें जरी त्यांस समजलें होतें तरी त्या स्वारांनीं माझें लष्कर सोडून जावें असें करण्याची मला मोठी पंचाईत पडली. हें मीं सांगतों याचें कारण असें आहे कीं हें सर्व तात्या साहेब विंचूरकर यांचा विशेष गुण दाखविणारें आहे. त्यांस असें वाटलें कीं आपली फौज मज जवळ ठेवणें हें आपलें कर्तव्यकर्मच होय, कारण आपले मालिकानीं ती मजजवळ ठेवण्या विषयीं हुकूम दिलेला होता. आणि वस्तुतः " तुमचे लोक माझें लष्कर सोडून गेले नाहींत तर त्यांजबरोबर मी शत्रूप्रमाणें वर्तन करीन असें मीं त्यांस बजाऊन सांगें तोंपर्यंत त्या लोकांनीं माझें लष्कर सोडिलें नाहीं. मी त्यांस असें कळविल्यावर मात्र ते चालते झाले.

पुढें ते ( तात्यासाहेब ) बाजीराव पेशवे यांचे लष्करांत मिळाल्यावर ह्याच सुक्ष्माचारदृष्टीच्या इमानदारीचे इराद्यानें त्यांचे सर्व संकटांत त्यांस जडून राहिले, आणि त्या दुर्दैवी राजाचे लष्करांतील इतर हरएक जाहागिरदारापेक्षां त्यांनीं आपलें काम फारच चांगलें बजाविलें असें म्हणणें त्यांचे हुरमतीस योग्य असून तितकेंच यथान्याय ही आहे.

त्यांचे संभावित स्वभावाविषयीं जें कांहीं मला माहीत आहे त्यावरून मला अशी खात्री वाटत्ये कीं, त्यांनीं पेशव्यांचे तर्फेनें जी इमानदारी व निश्चय दर्शित केला त्याच इमानदारीनें व निश्चयानें, जरूर पडेल तर, ते आतां आमचे सरकारास जडून राहातील.

मला असें कळून आलें आहे कीं, तात्यासाहेब (इंग्रज सरकारास) अधिक लौकर शरण न आल्यामुळें त्यांचें नुकसान झालें आहे; परंतु त्यांजसारिखे संभावित व सरदारी स्वभावाचे मनुष्यास तसें करणें अशक्य होतें. निपाणकर किंवा चिंतामणराव हे बाजीरावांकरितां लढाई करण्याचें मिष करीत असतां मिस्तर एलफिन्स्टन यांजजवळ त्यांचे वकील होते. त्यांच्याप्रमाणें वागणें हें त्यांचे (विंचूरकरांचे) अंगीं वसत नव्हतें. तत्रापि त्या जाहागिरदारांस त्यांचीं संस्थानें परत मिळालीं आणि विंचूरकर हे, आपला सशास्त्र राजा इंग्रज सरकारचे स्वाधीन होईतोंपर्यंत, त्यास इमानदारीनें चिकटून राहिल्यामुळें अतिशय दरिद्रावस्थेस मिळाले आहेत.

हें त्यांचे उदाहरण या पुढें उपयुक्त होईल तर त्याची जरूर लागेल; परंतु ह्या अभिमानी पुरुषानीं आपले राजाबरोबर इमानदारीनें वर्तन केलें तें माफ करून आपले राज्या करितां तो सद्गूण त्यांजपासून संपादन करण्याचा यत्न करण्यास राजरिती व औदार्य आम्हास पाचारण करितेंसें दिसतें.

तात्यासाहेब विंचुरकर यांचे घराणें दक्षिणेंतील अति पुरातन व अति भारदस्त घराण्यांपैकीं आहे म्हणून त्यांचे नष्टभाग्या पासून या देशांत अतिशय दुःख उत्पन्न झालें आहे, आणि त्यांचे खालावलेले स्थितीस जी एकादी सुधारणा लागू करितां येईल ती लागू केल्यानें जे हे थोर मनुष्य आपले ताब्यांत आले आहेत त्यांस सहनशीळता व मनाचा थोरपणा दर्शित केल्याबद्दल आमची मोठी सत्कीर्ती होईल.

| | |
|---|---|
| मुक्काम सिरूर तारीख ३० जून सन १८२१ इ० | (सही) लायनेल स्मिथ<br>मेजर जनरल. |

नंतर विठ्ठलराव यानीं त्या वेळचे मुंबईचे गव्हरनर मालकम् साहेब यांची समक्ष भेट घेऊन, आपलीं सदर्हू इनामें आपल्यास परत मिळण्याबद्दल, जनरल स्मिथ साहेब यांचे वर लिहिलेले दाखल्यानिशीं, त्यांस लेखी अर्ज दिला. तो अर्ज गव्हरनर मौसूफ यानीं स्विकारून सदर्हू बाबदींत इंडिया सरकारास सिफारीष केली; परंतु त्या सरकारानें पूर्वीप्रमाणेंच नाकबुलीचा जबाब दिला. त्या जबाबाची नक्कल मालकम् साहेब गव्हरनर यानीं विठ्ठलराव यांस समक्ष भेटींत देऊन तोंडानें त्यांची पुष्कळ प्रकारें समजूत केली. ते म्हणाले कीं " तात्यासाहेब ! आपण आपले सशास्त्र मालिकांबरोबर इमानदारीनें जें वर्तन केलें तें ईश्वराचे घरीं रुजू आहे. हल्लींचे काळांत हा एक चमत्कार आहे कीं जे कोणी नेकीनें वागतात ते दरिद्रावस्थेस मिळतात; परंतु जे इमान सोडून वेळ व रंग पाहून त्या बरहुकूम वर्तन करितात ते सधन होतात. असो; ईश्वर संकेताप्रमाणें सर्व गोष्टी घडतात. त्या पुढें कोणाचाही इलाज चालत नाहीं. आतां आपण समजावें कीं मी आपले शक्तयनुसार आपणास समय विशेषीं मदत करीन. आपण दिलगीर होऊंनये." असें बोलून साहेबमौसूफ यानीं विठ्ठलराव यांस शिष्ट संप्रदायाप्रमाणें विदा करून दिलें.

याप्रमाणें उत्तर हिंदुस्थानांतील आपले पूर्वजांनीं महत् प्रयासें संपादन केलेलीं इनामें आपणास इंग्रज सरकाराकडून परत मिळणें अशक्य आहे असें विठ्ठलराव यांस पक्कें वाटलें. तथापी शिंद्यांचें घराण्याशीं आपले पूर्वजांचा जो बहुत ऋणानुबंध होता त्याची माहिती सांप्रतचे शिंदे यांस असेलच, याकरितां त्यांजकडे वकील पाठवून त्यांस आपले हलाकीची स्थिती कळवावी, आणि त्यांचे कबजांत असलेले आपले इनाम गांव सोडण्याविषयीं त्यांस विनंती करावी, असें विठ्ठलराव यांस वाटल्यावरून, त्यानीं आपले पदरीं राघोपंतदादा राजवाडे म्हणून मोठे प्रामाणिक व हुशार मनुष्य होते त्यांस शिंदे व ग्वाल्हेरीचे रेसिडेंट यांजकडे

बोलणें बोलण्याकरितां वकील नेमून कारण लागेल तर इंडिया सरकाराशीं पत्रव्यवहार चालविण्यासही आपले मुखत्यार म्हणून रवाना करण्याचें योजिलें; व हा मजकूर मालकम् साहेब यांस कळवून त्या कामाकरितां त्यांचा हुकूम घेतला, व त्यांजपासून ग्वाल्हेरीचे रेसिडेंट व इंडिया सरकारचे सेक्रेटरी यांच्या नांवांचीं पत्रें घेऊन ग्वाल्हेरीस राघोपंतदादा यांची रवानगी केली. नंतर थोडे दिवसांनीं त्यांचे मदतीस भाऊ पोतनीस यांसही पाठवून दिलें. त्या उभयतांनीं खुद्द शिंदे व ग्वाल्हेरचे रेसिडेंट यांजकडे उत्तर प्रांतांतील इनामी गांव सुटण्याविषयीं बहुत प्रकारें यत्न केला; परंतु तो सिद्धीस न जातां खर्च मात्र पुष्कळ झाला.

वरील कामानिमित्त भाऊ पोतनीस व राघोपंतदादा या उभयतांचें ग्वाल्हेरीस बहुत दिवस राहणें झालें. त्यामुळें त्यांपैकीं भाऊ पोतनीस यांचा तेथील दरबारांत प्रवेश होऊन जनकोजी शिंदे यांचे हयातींत त्यांनीं तेथील दौलतीसंबंधी कामकाजांत प्रमुखता संपादन केली. जनकोजी शिंदे हक्क * झाल्यावर जयाजीराव शिंदे हे अल्पवयस्क असल्यामुळें रामरावबाबा फाळके मुख्य कारभारी झाले. तेव्हां भाऊ पोतनीस यांनीं कांहीं दिवस त्यांचे हाताखालीं कारभार केला. नंतर त्यांनीं कांहीं दिवस भागीरथीतीरीं वास केल्यावर शेवटीं ते काशी येथें संन्यास घेऊन समाधिस्थ झाले. राघोपंतदादा यांची हकीकत अशी झाली कीं, ते भाऊ पोतनीस यांचे हाताखालींच कांहीं दिवस काम करून परलोकवासी झाले. त्यांचे चिरंजीव दिनकरराव यांस, हल्लीं राज्यावर जे शिंदे आहेत, ते अल्पवयस्क असतां, त्यांचे दौलतीवर इंग्रज सरकारानें मुखत्यार नेमिलें. पुढें शिंदे उमरींत येऊन त्यांनीं आपला सर्व राज्यकारभार संभाळिल्यावर ते उत्तर प्रांतीं आग्रा, प्रयाग, काशी वगैरे ठिकाणीं राहूं लागले. दिनकरराव यांनीं या देशांत मोठी कीर्ति मिळविली हें प्रसिद्धच आहे.

---

* परलोकवसी.

उत्तर हिंदुस्थानांतील; इनाम गांव सुटण्याबद्दल बहुत खटपट केली असतांही ते सुटले नाहींत, या कारणामुळें विठ्ठलराव यांस बहुत खेद झाला. दुसरें, मराठी राज्याचा ऱ्हास केवळ बाजीरावसाहेब यांनीं अविचारी पणाचें व गैरेशिस्त वर्तन केल्यामुळेंच झाला होता या गोष्टीचें त्यांस वारंवार स्मरण येऊन त्यांचें मन फारच उदास झालें होतें; तशांत त्यांस मस्तकशूलाचा आजार उत्पन्न होऊन तो इतका वाढला कीं शेवटीं त्यांस शके १७५७ पौष शुद्ध त्रयोदशी शुक्रवार यादिवशीं (सन अठराशें छत्तीस सालीं,) विंचूर येथें देवाज्ञा झाली. त्या समयीं त्यांचे वयास एकेचाळीसावें वर्ष होतें. हा मोठा दुःखाचा प्रसंग विठ्ठलरावांचे सर्व कुटुंबावर व पदरचे मंडळीवर व त्यांचे सर्व सरंजामी गांवांतील लोकांवर अकालीं गुजरल्यामुळें सर्वांस असह्य दुःख झालें; परंतु वर लिहिलेल्या सर्व लोकांनीं विठ्ठलराव यांच्या तिघा पुत्रांवर नजर देऊन उत्तरोत्तर त्या दुःखाचा त्याग केला.

विठ्ठलराव विंचुरकर यांचे हयातींत विंचूर संस्थानांत दरबारी कामकाजाची स्थिती कशी होती हें वाचकांचे लक्षांत येण्याकरितां मी आह्मी खालीं लिहितो.

दौलतीचा सर्व कारभार मुख्यत्वें करून जुने कारभारी बाळोबाबावा यांचे चुलत बंधू कृष्णाजी शामराव यांजकडे होता. कृष्णाजी शामराव यांचे कनिष्टबंधू विठ्ठलरावआबा यांजकडे सर्व मुलकी कामांची वहिवाट होती. नारायणराव यमाजी ऊर्फ भाऊ पोतनीस हे दौलतीचे खर्चाची व्यवस्था पाहून प्रपंच संबंधी ही न्यूनाधिक्याचें मनन करित असत. विठ्ठलराव यांनीं भाऊ पोतनीस यांस ग्वाल्हेरीस पाठविल्यावर त्यांच्या कामाची व्यवस्था त्यांचे निसबतीचे कामगार सर्व प्रकारें ठेवूं लागले. दरबारीं सर्व काम गोपाळ भास्कर परांजपे याजकडेस असून दौलती संबंधी इंग्रज सरकारचे दरबारांत जें काम पडे तें तेच करित होते. [ हाल्लीं ही त्यांचे पुत्र बाबुराव गोपाळ हे विंचू-

रकरांकडून पुणें येथें वाकिलीचें काम करीत आहेत.] अहमदनगर येथें कलेक्टर साहेबांचे कचेरींत माहाल संबंधी हमेषा काम पडत असल्यामुळें तेथेंही विठ्ठलराव यांनीं शिवाजीपंत सुरेगावकर या नांवाचें मनुष्यास वकील नेमिलें होतें. याप्रमाणें सुज्ञ, प्रामाणीक, स्वामिभक्त व निस्प्रह अशा मनुष्यांचे हातांत विचार पूर्वक कांमें दिलीं असल्यामुळें विठ्ठलराव यांचे कारकिर्दीत त्यांचे सर्व रयत * लोक त्यांस आईबापाप्रमाणें मानून त्यांजबरोबर अत्यंत पूज्यबुध्दीनें वागत असत. अशाप्रकारची व्यवस्था असल्यामुळें सरकारी कामगारां पर्यंत कोणतेही प्रकारचा भोभाटा किंवा गिल्ला मुळींच गेला नाहीं. मोतद्दारापासून वर मुख्य कारभाऱ्या पर्यंत सर्व माणसें परंपरागत चाकरी केलेली व अनुभवलेली अशीं होतीं. विठ्ठलराव यांस सुदैवेंकरून अशा प्रकारची चांगली मदत असल्यामुळें त्यांस दौलती संबंधी कोणतेंही काम स्वतः पाहण्याची तसदी घ्यावी लागत नव्हती. यांमुळें त्यांस आपले आयुष्याचे शेवटचे दिवस केवळ धर्म विचारांतच घालविण्यास सवड झाली.

विठ्ठलराव नरसिंह यांस पांच स्त्रिया झाल्या. प्रथम स्त्रीशीं लग्न झाल्यानंतर त्यांचें दत्तविधान झालें. तेव्हां त्यांच्या दत्तक घेणाऱ्या मातुश्रीनीं त्या बाईचें नांव रुक्मिणीबाई असें ठेविलें. पुढें ती लवकरच परलोकवासी झाली. नंतर नांदुसकर यांचे कन्येबरोबर त्यांचा दुसरा विवाह झाला. त्या बाईचें नांव रुक्मिणीबाईच ठेवण्यांत आलें. ती बाई ऋतु प्राप्त होण्या पूर्वींच वारली.

नंतर विठ्ठलराव यांचे तिसरें लग्न गोविंदराव उडपी या नांवाचे गृहस्थाचे कन्येबरोबर धुळें मुक्कामीं झालें. गोविंदराव यांचे वडील उडपीराव यांनीं थोरले माधवराव साहेब पेशवे यांचे अमलांत बहुत वर्षे पर्यंत धारवाड सरसुभ्याचें काम केलें असून त्यांचे घराणे कर्नाटक प्रांती अद्यापी प्रसिद्ध आहे. ह्या बाईचें नांव

* त्यांस सारा देणारे.

गंगाबाई असें ठेवण्यात आलें. त्यांस दक्षिणेंत इंग्रजी अमल झाल्यावर पांच साहा वर्षांनीं पुत्र झाला. याचें नांव विठ्ठलराव यांनीं रघुनाथराव * असें ठेविलें.

विठ्ठलराव नरसिंव्ह यांची तिसरी स्त्री गंगाबाई ही जिवंत असतांच त्यांनीं मशिदीचें रांजणगांव येथील कुळकर्णी श्रीपतराव, यांचे नातीशीं लग्न केलें. या श्रीपतरावांनीं, गणपतराव रांझेकर हे होळकरांचे दिवाण असतां, त्यांचे हाताखालीं काम केलें होतें. विठ्ठलरावांच्या या स्त्रीचें नांव लक्ष्मीबाई असें ठेविलेलें होतें. त्यांस दोन पुत्र व तीन कन्या झाल्या. वडील पुत्राचें नांव कृष्णराव धाकटे पुत्राचें नांव माधवराव; वडील कन्या गयाबाई, दुसरी वहिणाताई, व तिसरी वेणुताई, याप्रमाणें त्यांचीं नांवें होतीं.

विठ्ठलराव नरसिंह यांची स्त्री लक्ष्मीबाई कायम असतांच त्यांनीं पांचवें लग्न गिजरे या आडनांवाचे गृहस्थाचे कन्येशीं केलें. त्या बाईचें नांव सत्यभामाबाई आहे. त्यांस संतान मुळींच झालें नाहीं. त्या अद्यापि विंचूर येथें असून सत्कालक्षेपकरीत आहेत.

विठ्ठलराव नरसिंह यांनीं धर्मकृत्यें केलीं तीं येणेंप्रमाणें:—त्यांचे पुर्वजांनीं नरहिंहपुर येथें जें कुलस्वामी नरसिंह याचें मंदीर बांधिलें होतें त्याजपुढें त्यांनीं बहुत पैसा खर्च करून प्रल्हादाचे मंदिरांपर्यंत मोठा लांकडी सभामंडप बांधिला. त्याचप्रमाणें त्यांनीं पूर्वद्वारींही लांकडी सभामंडप बांधिला. त्रेरीज, पश्चिमेकडील माहाद्वाराच्या बाजूस जो एक बुरूज पूर्वी शिवाजी विठ्ठल यांनीं बांधिला होता त्याज्या समूर व त्या द्वाराच्या उत्तर बाजूस विठ्ठलराव यानी एक नवीन बुरूज त्याच्या मुकबल्याचा बांधिला. शिवाय, नीरानदीच्या कांठीं एक घाट बांधिलेला होता त्यास पाण्याच्या धक्क्यानें इजा न व्हावी ह्मणून त्यांनीं त्या घाटालगत व लक्ष्मी-

* हेच सरदार हाली विंचूर संस्थानचे मालीक आहेत.

तीर्था नजिक एक मजबूत बुरूज बांधिला. हीं त्याची सर्व कामें अद्याप पर्यंत कायम् आहेत.

पूर्वी विंचूर येथें पाण्याचा मोठा तोटा असल्यामुळें तेथील लोकास पिण्याचें पाणी अर्ध कोशावरून आणावें लागत असे. हि गैरसोय नाहींशी कर्ण्यास्तव विठ्ठलराव यांनीं विंचुरापासून एक कोशावर पश्चिमेचे बाजूस एक मोठी विहीर पाहिली आणि मोटचा खर्चानें नळ बांधून त्या विहिरीचें पाणी गांवांत आणिलें. इतक्यांत त्यांस देवाज्ञा झाली त्यामुळें तें काम बंद पडलें; परंतु त्यांचे चिरंजीव रघुनाथराव यांनीं टिकठिकाणी हौद बांधून सर्व गांवास पाण्याचे त्रासापासून मुक्त केलें.

नाशिक येथें रघुनाथभटजी म्हणून प्रसिद्ध सिद्ध पुरुष होउन गेले. त्यांची कीर्ती हाल्लीं सर्वत्र प्रसिद्ध आहे. त्यांस राहाण्याकरितां विठ्ठलराव यांनीं गोदातीरीं एक उत्तम बंगला बांधून दिला. पुढें त्या सत्पुरुषापासून त्यांनीं उपदेश ग्रहण केला, आणि सर्व काल हरिहराची पूजा करून वेदांतविचारांतच आयुष्याचे दिवस घालविले. नंतर थोडे दिवसांनीं त्यांनीं रघुनाथभटजीचे हस्तें विंचूर व सायखेडें या गांवांचे जमिनींपैकीं भूमिदानें वगैरे धर्म कृत्यें करविलीं; तीं निर्वेध चालली आहेत. पुढें भटजी माहाराज हे सन्यास करून माघ वद्य चतुर्दशी ह्मणजे शिवरात्रीचे दिवशीं समाधिस्थ झाले. त्यांचें उत्तरकृत्य, नारायणबळी, वगैरे विठ्ठलराव यांनीं बहुत पैसा खर्च करून करविलें. त्याचप्रमाणें त्यांची वार्षिक पुण्यतिथी, महालय, समाधीचा पूजानैवेद्य वगैरेचे खर्चास विठ्ठलराव यांनीं सालिना चारशे रुपयांची नेमणूक करून दिली. ती या वेळेपर्यंत त्यांचे चिरंजीव रघुनाथराव यांनीं चालविली आहे.

वर लिहिलेले रघुनाथ भटजी यांचें नारायणबावा म्हणून शिष्य होते; त्यांस आपले गुरूपासून हटयोग साध्य झाला होता. त्यांची सेवा विठ्ठलराव यानीं बहुत केली आणि बहुत पैसा खर्च करून त्यांस योगाभ्यासाकरितां मालेगांवानजीक दाभाडी या नांवाचे

गांवांत एक मठ बांधून दिला. त्या मठांत नारायणबावा यांनीं विष्णूची मूर्ती स्थापन केली. त्या देवास विठ्ठलराव यानीं, पूजा नैवेद्य वगैरेचे खर्चाकरितां, नेमणूक करून दिली. ती हाल्लीं चालत आहे.

पेशवाई अमलांत विठ्ठलराव व आबासाहेब पुरंदरे यांचा परस्परें बहुत स्नेह होता. पुढें इंग्रजी अंमल झाल्यावर आबासाहेब पुरंदरे हे दत्तक घेऊन परलोकवासी झाले. त्यांचे पश्चात, त्या दत्तपुत्राकडे एल्फिन्स्टनसाहेब कमिशनर यांनीं कांहींच सरंजाम चालविला नाहीं. हें विठ्ठलराव यांस बरें न वाटून त्यांनीं पुरंदरे यांचे दत्तपुत्रास कांहीं तरी सरंजाम चालविण्याविषयीं आपले दोस्त जनरल स्मिथ साहेब यांजकडून त्या वेळचे गव्हरनर मालकम् साहेब यांस बहुत सिफारीष करविली, व स्वतःही बहुत प्रकारें उद्योग केला. त्यावरून मालकम् साहेबांनीं पुरंदरे यांचे दत्तकास पंचवीस हजार रुपयांचा सरंजाम चालविण्याविषयीं विलायत सरकारास चांगली सिफारीष केली. ती सिफारीष मान्य होऊन तितका सरंजाम पुरंदरे यांचे दत्तकाकडे चालविण्याविषयीं कोर्ट अफ् डिरेक्टर्स यांजकडून ठराव होऊन आला. त्याप्रमाणें आबा साहेब पुरंदरे यांचे दत्तकाकडे तो सरंजाम ताहयात चालून हाल्लीं त्यांचे दत्तकास त्या सरंजामाचा कांहीं भाग वंशपरंपरा चालत आहे.

अंण्णासाहेब ढमढेरे यांशींही विठ्ठलराव यांचा बहुत स्नेह होता. एके समयीं अंण्णासाहेब यांजवर बाजीराव साहेब यांची इतराजी झाल्यानें ढमढेरे यांची सर्व उत्पन्नें जप्त झालीं. त्या संकटसमयीं विठ्ठलराव यानीं कित्येक वर्षेंपर्यंत ढमढेरे यांचे पदरचे मंडळीचा व त्यांचे प्रपंचाचा सर्व प्रकारें गुजारा चालविला. पुढें अण्णासाहेबांचे चिरंजीव आबासाहेब ढमढेरे यांस विठ्ठलराव यांनीं आपलें आश्रित समजून आपले खासगी जाहगिरींतून निरंतर चालणारी अशी एक नेमणूक करून दिली. ती हाल्लीं चालत

आहे. पूर्वीपासून ढमढेरे हे विंचूरकरांस आपले मालिकांप्रमाणें मान देत होते व हा क्रम अद्यापिही चालू असून पूर्ववतप्रमाणें ढमढेरे यांचे वंशजांबरोबर विंचूरकर घराण्याचा स्नेहसंबंध आहे.

विठ्ठलराव हे सन १८१५ इसवी सालापासून पेशव्यांचे वतीनें पेंढारी लोकांचे बंदोबस्ताकरितां आपले फौजेनिशीं कर्नल वालेस व जनरलस्मिथ यांजबरोबर खानदेशांत जात होते, त्यामुळें त्यांचा इंग्रज सरकारचे बहुत लष्करी व दरबारी हुद्देदारांबरोबर स्नेह संबंध जडून ते हुद्देदार त्यांस बहूमान देत असत. परंतु जनरल-स्मिथ साहेबांबरोबर त्यांचा विशेष ऋणानुबंध होता. त्यां संबंधानें झालेली एक गोष्ट उदाहरणार्थ आह्मी पुढें लिहितों. एके समयीं असें झालें कीं विठ्ठलराव यांनीं खानदेश व बागलाण या प्रदेशांत बहुत वाघ मारिलें, आणि त्यांच्या कातड्यांचे दोन तंबू करून त्यां पैकीं एक तंबू त्यांनीं आपलेमालीक पेशवे यांस नजर पाठविला, आणि दूसरा जनरलस्मिथ यांस नजर केला. तो तंबु साहेबमौसूफ यांनीं मोठ्या आदरानें स्विकारून, वाघाच्या शिकारीस योग्य अशा दुनाली चापाच्या साहा बंदुका व कांहीं पिस्तुलें विठ्ठलराव यांस उलट नजर म्हणून पाठवून दिलीं. पुढें सन १८३१ इ. चे सुमारास जनरलस्मिथ साहेबांचे नौकरीची मुदत तमामहोऊन ते साहेब विलायतेस जाण्यास तयार झाले. त्या वेळेस विठ्ठलराव यांनीं पुणें येथें गारपिरावर कलेक्टरांचे बंगल्या नजीक मोठाले तंबू उभे केले आणि त्यांत बहुत उत्तम रोषनीं करून साहेबमौसूफ यांस जाफत दिली. त्या प्रसंगीं त्यांनीं पुण्यांतील बहुतेक नेटीव बडे लोक व मडमांसह लष्करी व दरबारी साहेबलोक यांस त्या जाफतीस बोलाविलें होतें. त्या समयीं आतष्बाजी * बहुत सोडण्यांत आली. स्मिथ साहेब बहुत खुष होऊन विठ्ठलराव यांस म्हणालें किं,

* दारुकांम.

" तात्या साहेब ! आजवर जे दिवस गेले ते आनंदांत गेले; परंतु आतां तुमचा माझा अगदीं वियोग होणार, येणें करून मला वाईट वाटतें. याजकरितां मी जाहाजांत बसून जाहाज चालतें होईतोंपर्यंत तुम्ही मजबरोबर असावें अशी माझी इच्छा आहे. विठ्ठलराव यांनीं जनरल मौसूफ यांचे इच्छे प्रमाणें करण्याचें कबूल केलें. पुढें थोडकेच दिवसांनीं ते साहेब विलायतेस जाण्यास्तव मुंबईस गेले. त्या वेळेस विठ्ठलराव ही त्यांजबरोबर गेले. स्मिथ साहेब जाहाजांत बसले त्या वेळेस परस्परें मोठचा प्रेमाचीं भाषणें होऊन शेवटीं उभयतांनीं पत्रद्वारें एकमेकास आपलें कुशल कळवीत जावें असें ठरविलें. नंतर परस्परें शेवटचा सलाम होऊन स्मिथसाहेबांचे जाहाज पश्चमेकडे चालतें झालें आणि विठ्ठलराव विंचुरास परत आले.

# भाग तिसरा.

## रघुनाथराव विठ्ठल यांचा वृत्तांत.

### प्रकरण १.

मागील भागाचे अंतीं विठ्ठलराव नरसिंह उर्फ तात्यासाहेब विंचूरकर यांचें चरित्र समाप्त झालें. आतां त्यांचे वडील पुत्र रघुनाथराव उर्फ अंणासाहेब विंचूरकर यांचा वृत्तांत आह्मीं सादर करितों.

रघुनाथराव यांचा जन्म सन १८२४ इसवी म्हणजे शके १७४६ सालीं झाला. तात्यासाहेब यांस हा पुत्र प्रथमच झाला असल्यामुळें त्यांनीं पुत्रोच्छाह मोठ्या समारंभानें केला.

पूर्वीं दक्षिणेंत इंग्रजी अंमल होण्याचे घालमेलींत तात्यासाहेब यांचे जवाहीरखान्यावरील कारकुनांनीं त्यांतील पुष्कळ जवाहीर काढून नेलें होतें. ही लबाडी रघुनाथराव यांचा जन्म होण्यापूर्वीं तात्यासाहेब यांस कळली नव्हती; परतु त्यांचे जन्माचे संधीस ती त्यांस कळल्यावरून त्यांनीं त्याबद्दल चौकशी चालविली. तीचे अंतीं चोरीस गेलेल्या जवाहीरापैकीं सरासरी पाऊण लाख रुपयांचे किमतीचे जवाहिराचा ठिकाण लागून तें पुनः जवाहीरखान्यात ठेवण्यांत आलें. त्यावरून पुत्रजन्माचा शकून आपल्यास लाभदायक आहे असें तात्यासाहेब यांस वाटून त्यांस मोठा आनंद झाला.

रघुनाथराव यांचे वय तीन वर्षांचें झाल्यावर दुर्दैवें करून सन १८२७ इसवी सालीं त्यांचे मातुश्रीस देवाज्ञा झाली. पुढें त्यांचें संगोपन तात्यासाहेब यांनींच केलें. ते चार वर्षांचे झाल्यावर सन १८२८ इ० सालीं त्यांचे नांव पहिल्या प्रतीचे सरदारांचे

पटांत दाखल करण्यांविषयीं तात्यासाहेब यांनीं सरकारास विनंती लिहिल्यावरून सरकारानें तसें कण्यांविषयीं आपले पुणे येथील एजेंट यांस हुकूम पाठविला.

त्याच वर्षी तात्यासाहेब यांची चौथी स्त्री लक्ष्मीबाई यांस प्रथम पुत्र झाला आणि त्याचे मागून चार वर्षांनीं दुसरा पुत्र झाला. पैकीं वडील पुत्राचें, कृष्णराव व धाकट्याचें, माधवराव, अशीं नांवें त्यांनीं ठेविलीं.

सन १८३२ इसवी सालीं तात्यासाहेब यांनीं रघुनाथराव, यांचा व्रतबंध करून त्यांचे पदवीस जो विद्याभ्यास योग्य तो त्यांजकडून करविण्यास आरंभ केला.

सन १८३५ इ० सालीं तात्यासाहेब यांनीं कृष्णराव यांचा व्रतबंध केल्यावर लौकरच वडील पुत्र रघुनाथराव यांचें लग्न केलें. हा शरीर संबंध शिंद्यांचे पदरीं गणपतराव भाऊ खटावकर म्हणून एक नामांकित व श्रीमान गृहस्थ होते त्यांजबरोबर झाला.

परंतु ह्या घराण्याच्या दुर्दैवामुळें तात्यासाहेब यांस सन १८३६ इसवींचे जान्युआरी महिन्यांत माथेशूळाचे आजारानें एकाएकीं देवाज्ञा झाली. त्यांचे उत्तरकार्य त्यांचे जेष्ट पुत्र रघुनाथराव यांनीं गोदातीरीं केलें.

ह्या दुखदायक गोष्टी विषयीं नाशिक येथील त्यावेळचे सब्-कलेक्टर मिस्तर रिव्हज् यांनीं सरकारास रिपोर्ट करून त्यांत कैलासवासी तात्यासाहेब यांचे तीन पुत्रांची नांवें व उमरी कळविल्या आणि त्यांजकडे जे इनामीं व सरंजामीं गांव, वतनें व हक्क चालत होते त्यांची व्यवस्था कशी करावी म्हणोन सरकारास विचारिलें. त्याचे जबावांत सरकारानें मिस्तर रिव्हज् यांस कळविलें कीं, "मरहूम * तात्यासाहेब यांजकडे जें कांहीं चालत होतें तें सर्व त्यांचे वडील पुत्र रघुनाथराव यांजकडे चालविण्याचे बाबदींत कौन्सिलांत विचार चालू आहे, याकरितां

* कैलासवासी.

तुम्हीं त्यांचे पुत्रांचे भेटीस जावें, आणि आपले वडील हक्क * झाल्यामुळें सरकारास बहुत अव्सोस् † झाला आहे व आपले वडिलांकडे सरंजाम वगैरे जें कांहीं चालत होतें तें आपणांकडे चालविण्यांविषयीं ठराव होऊन तो पुणे येथील एजेंट यांचे मार्फत आपल्यांस लौकरच कळविण्यांत येईल, असें त्यांस सांगून त्यांचें समाधान करावें." यावरहुकूम् मिस्तर रिव्हज् यांनीं सायखेडें येथें रघुनाथराव यांचे भेटीस जाऊन सरकारचे पत्रांतील मजकुर त्यांस समक्ष कळविला.

रघुनाथराव आपले वडिलांचें उत्तरकार्य करून विंचुरास परत आल्यावर त्यांनीं दौलतीचे पुरातन कारभारी कृष्णाजी शामराव यांजबरोबर पुण्यास जाऊन सरदार लोकांबद्दलचे एजेंट यांची भेट घेतली. पुढें लौकरच सरकारानें रघुनाथराव यांचे नांवानें सरंजाम वगैरे चालविण्याचे बाबदींत ठराव करून ते कायद्याचे वयांत येत तोंपर्यंत दौलतीचा कारभार चालविण्यास एक योग्य गृहस्थ नेमण्याविषयीं व त्यांस दुखवटयाबद्दल शालजोडी देण्याविषयीं एजेंट साहेब यांस हुकूम पाठविला. त्यावरहुकूम एजेंटसाहेबांनीं आपले कारकुनाबरोबर रघुनाथराव यांजकडे एक पत्रासह एक शालजोडी पाठवून दिली. सदहू पत्र वाचकांचे माहिती करितां आम्हीं पुढें दाखल करितों.

"रावसाहेब मुष्फक् मेहेरबान करम फर्माय दोस्तां रघुनाथरावजी विंचूरकर उम्देतुल मुल्क बाहादूर सल्महु.

अजींतीव अलेक्जांडर बेलसाहेब बाहादूर, एजेंट जिल्हा दक्षिण. सलाम् बादज सलाम् खैरियत अंजाम आंके येथील खैर सला जाणून आपली षादमानी हमेषा कलमीं करीत असलें पा-

* मृत.
† दुःख

हिजे. दरीं विला, आंसाहेबांनीं चंद्र ९९ रम्जान् सन १२४५ फस्लीचें खत पाठविलें तें पावलें. मरहूम विठ्ठलराव तात्यासाहेब यांचा इंतिकाल झाला हें ऐकून फार अब्सोस् झाला. तो कलमीं करितां येत नाहीं. हक्ताळाचे मर्जी पुढें इन्सानाचा इलाज नाहीं हें दिलांत ठेवून अब्सोस् सोडून दिला पाहिजे. आंसाहेबांनीं खत इब्लाग केलें त्याचा तरजमा करून सय्यद मुस्तताब् मौलाअलकाब राइट आनरेबल गव्हरनर दर इजलास् कौन्सिल जंजीरे मुंबई यांचे हुजुरांत गुजराविला. त्याचा जबाब तारीख २९ माहे फेब्रुआरी सन १८३६ इसवीचा इंजानिबांचे नांवें आला. त्यावरून कलमीं करण्यात येत आहे जे मरहूम् तात्यासाहेब यांजकडे सरंजाम चालत होता तो दरोबस्त आंसाहेबांकडे चालवावा म्हणोन मेहेरबान प्रिन्सिपल कलेक्टर साहेब सुभा पुणें व कलेक्टर सुभा अहंमदनगर व खानदेश यांस आलाहिदा हुकूम सादर झाले आहेत, व कौन्सिलचे हुकुमाप्रमाणें आंसाहेबांस दुखवट्याबद्दल शालजोडी १ एक नारोलक्ष्मण कारकून याजबरोबर पाठविली आहे; पावल्याचें उत्तर कलमीं केलें पाहिजे. व आंसाहेबांचे वय दौलतीचा बंदोबस्त राखण्यास योग्य होईतों पर्यंत दौलत संरक्षण करण्यांस व सरंजामाची वहिवाट करण्यास हरकोणीं इमानीं व हुशार पखस याची नेमणूक करावी म्हणून इंजानिबांस कौन्सिलांतून फर्मावलें आहे व आंसाहेबांचे नांवें येविषयीं गव्हरनर इनकौन्सिल साहेब यांचे खत मागाहून सादर होईल तें आपल्याकडे पोंहोंचविलें जाईल. तारीख ११ माहे मार्च सन १८३६ इसवी. ज्ञुर्सन सित सलासीन मयातैन व अल्लफ. जियादा काय लिहिणें प्यार मोहोबत असों दिज्ये हे कितावत.

( सही इंग्रजी ) अलेक्झांडर बेल

एजेंट.

जरी सरकारानें पत्रांत कळविल्याप्रमाणें विंचूर संस्थानचा कारभार चालविण्यास एक नवीन इसम नेमण्या विषयीं एजंट साहेब यांस हुकूम पाठविला होता तरी त्या साहेबांनीं तसें न करितां पुरातन कारभारी यांसच त्याकांमावर मुकरर केलें. याबाबदींत कारभारी कृष्णाजी शामराव यांस पत्र आलें तें येणेंप्रमाणेः—

मेहेरबान दोस्तां कृष्णाजी शामराव निस्‌बत् विंचूरकर सलमहु.

अर्जीसीब अलेक्जांडर बेल साहेब बाहादूर एजंट जिल्हा दक्षिण. सलाम ओंके दरिंविला, राइट आनरेबल गव्हरनर इन्‌कौन्सिल साहेब यांचा हुकूम तारीख २९ माहे फेब्रुआरी सन मजकूरचा आला, त्यांत इंजानिबांस फर्माविलें आहे जे रघुनाथराव अंगासाहेब यांची प्रस्तुत कम उमर आहे तों पर्यंत त्यांची जिनगी, सरंजाम्, इनाम, जाहागीर, वतन वगैरेची वहिवाट करण्यास कोणीं पख्त प्रौढ व खैरख्वाह असेल त्याची योजना करावी. त्यावरून आपण प्राचीन त्यांचे पदरचे व खैरख्वाह म्हणून त्या कांमावर आपली योजना करून कलमीं केलें जातें जे सदहूची वहिवाट मर्हूम तात्यासाहेब यांच्या कारकिर्दींत चालत होती त्याप्रमाणें चालवावी व खर्चांत कसोशी करावी, व जम्मे पेक्षा खर्च बिलकूल जास्ती होऊं देऊं नये, व जम्मा वसूल बाकीचे हिशेब जंजीरबंद राखावे; पदरची मंडळी कायम ठेवावी; सरकारातून हुकूम होत जातील ते साफ बजावीत जावे; अंगासाहेब यांची उमर दौलतीचा बंदोबस्त करण्यास योग्य झाल्यावर आपले वहिवाटीचे कागद पत्र ,हिशेब, वगैरे सुद्धा त्यांचे हवालीं करावे; व या कांमाबद्दल आपल्यांस कांहीं तैनात द्यावी असें नजरेस आल्यास त्याचा विचार आयंदां केला जाईल. तारीख

२९ माहे मार्च्य सन १८३६ इसवी. जियादा काय लिहिणें हे कितावत्.

( सही इंग्रजी ) अलेक्जांडर बेल
एजंट.

---

या प्रमाणें सर्व व्यवस्था लागल्यावर रघुनाथराव हे कारभारी मौसूफ यांजबरोबर विंचुरास परत गेले.

रघुनाथराव यांनीं आपले वडिलांचे ह्यातींत मराठी बाळ-बोध व मोडी लिहिण्या वाचण्याचा व हिशेब वगैरे कारकुनी विद्येचा अभ्यास चालविला होताच. तो अभ्यास कारभारी मौसूफ यांनीं त्यांजकडून पुढें चालवून शिवाय फारसी लिहिण्या वाचण्या-चाही अभ्यास सुरू करविला; आणि त्याचप्रमाणें त्यांजकडून घोडा फेरणें, बोथाटी करणें, बंदुकेने निषाण मारणें, व तिरंदाजी करणें यांचाही मोठा रफ्त करविला. तेणेंकरून ते तीन चार वर्षांत चांगले तरबेज झाले. या शिवाय, रघुनाथराव यांनीं स्व-इच्छेनें संस्कृताचाही बराच अभ्यास केला, त्यामुळें काव्यांत त्यां-ची चांगली गती होऊन ते वित्पंन्न झाले.

रघुनाथराव यांचे कनिष्ट बंधू कृष्णराव हेही त्यांचे समागमानें घोड्यावर बसण्यास चांगले शिकून फेरफटका करूं लागले. शि-वाय, त्यांची सख्खी मातुश्री लक्ष्मीबाई यांनीं त्यांस सुशिक्षा दे-वविल्यामुळें त्यांनीं कारकुनी विद्याही चांगली संपादन केली.

सन १८३८ इसवी सालीं रघुनाथराव यांनीं आपले कनिष्ट बंधू माधवराव यांचा वृतबंध केला आणि मागाहून दुसरे बंधू कृष्णराव यांचें लग्न केलें.

माधवराव यांचे वाणीस लाहानपणापासून पूष्कळ स्खलदगी होती आणि ते भक्तीमार्गांत असल्यामुळें त्यांजकडून व्हावा तसा विद्याभ्यास झाला नाहीं. तथापी ते पुढें समजुतीचे वयांत आल्यावर त्यांनीं स्वइच्छेनें व्यवहाराचे उपयोगीं पडण्या जोगा विद्याभ्यास

केला. ते लग्नास योग्य झाल्यावर रघुनाथराव यांनीं त्यांचें लग्न केलें.

वर लिहिलेल्या सर्व गोष्टी रघुनाथराव यांनीं आपले खानदानीचे नांव–लौकिकाप्रमाणें चांगले प्रकारें केल्या. याच सुमारास त्यांची पत्नी वयांत आली आणि ती त्यांचे आज्ञेप्रमाणें वागूं लागल्यानें त्यांस सर्व प्रकारें प्रापंचातील सुखप्राप्ती होण्याचा संभव दिसूं लागला; परंतु दुर्दैवेंकरून त्या सुखास व्यत्यय येऊन त्यांची स्थिती अत्यंत दुःखदायक झाली. त्याचीं कारणें पुढें लिहिलीं.

१ घरांत दोन सापत्न माता व दोन सापत्न बंधू होते ते त्यांजबरोबर स्पर्धा करित असत.

२ कारभारी हे केवळ जुन्या चालीचे असल्यामुळें दौलतींत जशी दक्षता ठेवणें जरूर होतें तशी दक्षता त्यांजकडून राहात नसे.

३ अशा वगैरे अडचणींस्तव त्यांनीं स्वतः दौलत संभाळण्याकडे विशेष लक्ष पुरविणें योग्य होतें; परंतु त्यांचे वय लाहान असून त्यांचे मनाचा विशेषकल स्नानसंध्येकडे असल्यामुळें त्यांचे लक्ष त्या गोष्टी कडे फारसें गेलें नाहीं. यामुळें त्यांबरोबर स्पर्धेनें वागणारांस आपले मतलब साधण्यास सवड सांपडली.

४ तशांत कारभारी यांची एक कंन्या वधू होती, ती आपल्यास देण्याची त्यांची इच्छा आहे असें रघुनाथराव यांस समजल्यावरून त्यांस असें वाटलें कीं आपणास ममतेचें ह्मणून स्वस्त्री खेरीज दुसरें कोणीच नाहीं, याकरितां आपण कारभारी यांचे कंन्येबरोबर विवाह केला तर त्या शरीरसंबंधाचे योगानें त्यांस आपले ( जांवई यांचे ) कल्याणाची आस्था लागून आपणांस त्यांचे चांगलें साहाय होईल. हें आपलें हृद्गत रघुनाथराव यांनीं स्वस्त्रीस कळविल्यावर तिनें ही स्वसंतोषानें त्या विवाहास रुकार दिला. नंतर त्यांनीं कारभारी यांस बोलाविलें आणि त्यांजबरोबर विवाहाचा निश्चय करून तो लौकरच केला. रघुनाथराव यांस पूर्वी वाटलें होतें त्याप्रमाणें कारभारी यांस त्यांचें हीत रक्षण करण्याची

अधिक आस्था प्राप्त झाली. परंतु तेणेकरून रघुनाथराव यांची सापत्न मातुश्री लक्ष्मीबाई व सापत्न बंधु कृष्णराव यांचे मनांत विषाद उत्पन्न होऊन दिवसानुदिवस त्यांचें वैमनस्य अधिकाधिक वाढत चाललें आणि शेवटीं तें अशा थरास गेलें कीं त्या मातुश्रीनीं संस्थानचे तीन हिस्से करून देण्याविषयीं एजेंटसाहेबांकडे यादी गुजराविण्याचा उद्योग चालविला.

५ त्यांची कनिष्ट मातुश्री सत्यभामाबाई ही आपले भ्रताराचे देहांता नंतर आपले माहेरीं जाऊन राहिली होती. त्या बाईनें रघुनाथराव यांस असें कळविलें कीं, "माझी आतां एकत्र राहाण्याची खुषी नाहीं. याकरितां मला निराळी नेमणूक तोडून द्यावी." रघुनाथराव हे आपले घराण्याचे मागील वहिवाटीप्रमाणें व आपले उत्पन्नाचे मानानें त्या बाईस पृथक नेमणूक करून देण्यास तयार झाले; परंतु ती तेव्हड्यानें संतुष्ट न होऊन अधिक मोठी नेमणूक मिळण्यास्तव तिनें रघुनाथराव यांजवर दिवाणींत दावा केला.

या संध्धीस कारभारी यांस अर्धांगवायुचा उपद्रव होऊन त्यांचे आंगीं कारभार करण्याचें सामर्थ्य नाहींसें झालें. सबब दौलतीची सर्व व्यवस्था पाहाणें अर्थातच रघुनाथराव यांचे आंगावर पडलें. त्यांनीं दौलतिचे स्थितीचा विचार केला तों त्यांस असें आढळलें कीं वडिलांचे अंतकाळीं संस्थानचे खाजिन्यांत जी रोकड शिलक होती ती कारभारी यांनीं दरोबस्त खर्च करून उलटें किरकोळ देणें करून ठेविलें होतें; त्याच प्रमाणें जमाखर्चाचे हिशेबांत ही सर्व घोंटाळाच झालेला होता; जवाहीरखाना संभाळण्यास जरी पुष्कळ कामगार होते, तरी आपसांतील कलहामुळें खासे मंडळी पैकीं ज्याचे हातीं जो डाग लागला तो त्यानें आपणास मालिक समजून आपले कबजांत ठेविला होता; आणि पदरचे मंडळींत सुध्धा ऐक्य नाहींसें झालें होतें; त्यामुळें त्यांजकडे थोडे लोक राहून बाकीचे सर्व त्यांचे उभयतां बंधूंचे पक्षाकडे मिळाले होते.

अशा बेबंदीचे स्थितींत सापत्न मातुश्री लक्ष्मीबाई यांनीं आपलें उभयतां पुत्र अज्ञान असल्याचे सबबेनें आपण त्यांची पाळन करणारी म्हणून संस्थानचे तीन निराळे हिस्से होण्यास्तव पुणे येथील सरदार लोकांबद्दलचे ऐजेंट यांजकडे यादी गुजराविली. सदर्हू यादींत दोन मुख्य तक्रारी होत्या. पैकीं पहिली तक्रार अशी कीं कारभारी यांची कन्या रघुनाथराव यांस दिलेली असल्यामुळें ते त्यांचे तर्फेनें वर्तन करितात; दुसरी तक्रार अशी कीं आम्हीं आज पर्यंत एकत्र राहिलों; परंतु आतां आमचें बनत नाहीं, याकरितां सरंजामाचे तीन हिस्से करून आमचे दोन हिस्से अमचे हवालीं करावे.

ह्या सर्व गोंडयाचे कारण विंचूरकर घराण्याचा वकील गोपाळ भास्कर परांजपे हाच आहे असें एजेंट साहेब यांस वाटल्यावरून त्यांनी वकीलमजकूर यास आपल्याकडे येण्याची मनाई केली. त्यावरून त्यानें रघुनाथराव यांस पुण्यास सत्वर येण्यांविषयीं कितीएक पत्रें पाठविलीं; परंतु त्यांस त्यावेळेस पुण्यास जाण्यास मोठी अडचण होती, कारण, एक तर, संस्थानांतील घोडीं, माणसें, वगैरे यांजवर तीन पक्षांचे तीन प्रकारचे हुकूम होत होते, त्यामुळें त्यांचा हुकूम सर्वांवर बरोबर चालत नव्हता; दूसरें, त्याचें वय केवळ १८ वर्षांचेंच असून दरबारचे कामकाजाची त्यांस चांगलीशी माहितगारी नव्हती; तीसरें, त्यांचे वर लिहिलेले वकीलास एजेंट साहेबांचे कचेरींत जाण्याची मनाई झाली असल्यानें त्यांजबरोबर जाण्यांस जुना माहितगार असा कोणीच मनुष्य राहिला नव्हता. अशा अडचणीचे प्रसंगीं पुढें काय करावें हें रघुनाथराव यांस सुचेनासें झालें. तत्रापि आपले पिढीजादे नौकर भाऊ पोतनीस, जे त्यावेळेस ग्वाल्हेरीस होते, त्यांस बोलावून घेतलें असतां ते सर्व बखेडे मोडून टाकतील असें त्यांस वाटल्यावरून त्यांनीं त्यांस विंचुरास येण्यांविषयीं कित्येक पत्रें पाठविलीं. या पत्रव्यवहारांतच एक वर्ष गुजरून गेलें; परंतु पोतनीस यांस

ग्वाल्हेर येथें शिंदे यांचे पदरी कांहीं रोजगार असल्यामुळें विंचुरास त्यांचें येणें झालें नाहीं. शेवटीं रघुनाथराव यांनीं स्वतः पुण्यास जाऊन एजेंटसाहेब यांची भेट घेतली आणि आपले स्थितीची सर्व हकीकत त्यांस समक्ष कळवून आखेरीस असें सांगितलें कीं, " आमचे दौलतींत आज पर्यंत हिस्से म्हणून कधीं ही झाले नाहीत. याउपर आपल्यांस जसें योग्य वाटेल तसें आपण करावें. मी आपला हुकूम संतोषानें कबूल करीन. " या निस्पृहतेच्या बोलण्यानें एजेंटसाहेबांस संतोष वाटून ते त्यांस म्हणाले कीं, " मी तुमचे बोलण्याचा पुर्तेपणें विचार करून नंतर जें करणें तें करीन. "

रघुनाथराव यांचे मागून त्यांची सापत्न मातुश्री लक्ष्मीबाई ही आपले उभयतां पुत्र कृष्णराव व माधवराव यांसह पुण्यास गेली होती. त्याउभयतांनीं ही एजेंट साहेबांस पुष्कळ तक्रारी कळविल्या.

पुढे एजेंट साहेबांनीं रघुनाथराव यांस एके दिवशीं समक्ष सांगितलें कीं, " या बाबदींत मला सरकारास जें ल्याहावयाचें आहे तें मी लिहीन आणि त्याजवर सरकारचा जो हुकूम येईल तो मी तुह्मास मागाहून कळवीन. " नंतर रघुनाथराव यांनीं त्या साहेबांपाशीं विंचुरास जाण्यास रजा मागितली. तेव्हां साहेब त्यांस ह्मणाले कीं, " आपण आजवर आपले संस्थानचे कामकाजांत मन घातलें नाहीं, याकरितां एक वर्ष पर्यंत आपले दौलतीचा कारभार करण्यास कोणीं तरी हुशार व योग्य गृहस्थ असला पाहिजे. या मुदतींत आपण खूब मेहेनत करून संस्थान संभाळण्या जोगी तयारी करावी. ढमढेरे यांचे घराण्याशीं आपले घराण्याचा पूर्वापार स्नेह-संबंध आहे, याकरितां रामचंद्र पांडुरंग उर्फ आबासाहेब ढमढेरे यांस आपले दौलतींत एकवर्षभर कारभारी नेमावें असें माझे मनांत आहे. " हें सर्व ह्मणणें रघुनाथराव यांनीं कबूल केल्यावर एजेंटसाहेब यांनीं त्यांस विंचु-

रास जाण्यास रजा दिली. त्याप्रमाणें ते दुसरे दिवशीं विंचुरास गेले; परंतु त्यांची सापत्न मातुश्री आपले पुत्रांसह पुण्यासच राहिली.

पुढें लौकरच एजेंट साहेबांनीं ढमढेरेमौसूफ यांस विंचूरचे दौलतीचा कारभार पाहाण्यास एक वर्ष पर्यंत नेमून त्याबाबद त्यांस पत्र लिहीलें आणि त्या पत्राची नकल रघुनाथराव यांजकडे पत्रा सोबत पाठवून दिली. ढमढेरे यांनीं लक्ष्मीबाई व त्यांचे पुत्र कृष्णराव व माधवराव यांस बरोबर घेतलें आणि विंचुरास जाऊन तेथें दौलतीचा कारभार हातीं घेतला. तेथील दिवाणीं कोर्ट बहुत दिवस बंद असल्यामुळें दिवाणीं कामें फार तुंबलीं होतीं; परंतु ढमढेरे कारभारी यांनीं पुष्कळ श्रम घेऊन त्या सर्व कामांचे निकाल सत्वर लाविले.

रघुनाथराव यांस कळविल्याप्रमाणें एजेंटसाहेब यांनीं त्यांचे बाबदींत सरकारास रिपोर्ट केला. त्याचा जबाब आल्यावर त्यांनीं रघुनाथराव यांस तारीख १० माहे जून सन १८४३ इसवीचे पत्रानें असें कळविलें कीं, "आपण विंचूर संस्थानचे मालिक आहां; परंतु आपली सापत्न मातुश्री व सापत्न बंधू यांचे खुराकी पोषागी* बद्दल आपणास जो ऐवज द्यावा लागेल त्याचे ऐवजीं त्यांस गांव तोडून देऊन त्याबदल त्यांस सनद करून द्यावी. ही सनद वापस† घेण्यास व गांव परत घेऊन नक्त नेमणूक ठरवून देण्यास आंसाहेब मुखत्यार आहेत. सदर्हू खुराकी पोषागीबद्दल रकमा ठरवून आपणास आलाहिदा कळविण्यांत येतील. याप्रमाणें सरकारचा हुकूम आला तो आपल्यांस कळविला आहे." यापत्राची नकल आह्मीं वाचकांचे माहितीस्तव पुढें दाखल करितों.

---

* अन्नवस्त्र.

† परत.

नंबर ४९१

राबसाहेब मुष्फक् मेहेरबांन करम् फ-
र्माय दोस्तां रघुनाथराव अंनासाहेब विं-
चूरकर उमदे तुल मुल्क् बाहादर सलमहु.

अजींसोब अलिषान् जान वार्डनसाहेब बाहादूर एजेंट जिल्हा दक्षिण. सलाम् बादज् सलाम् खैरियत् अंजाम आंके येथील खैरसल्ला जाणून आपली षादमानीं हमेषा कलमीं केली पाहिजे. दरींविला, आपले वडिलांकडे सरंजाम चालत होता तो आपण व आपले बंधू मेहेरबान कृष्णराव बापूसाहेब व माधवरावदादासाहेब असे त्रिवर्ग बंधू यांजकडे बरोबर चालावा किंवा कसें याचा अंदेषा आल्यावरून नबाब मुस्तताब मौला अलकाब राइट आनरेबल गव्ह-रनरसाहेब बाहादूर दर इज्लास कौन्सिल यांचे हुजुरास याबाबें मजकूर लिहिला होता. याचा जबाब इंजानिबांचें नांवें आला जे सदर्हू सरंजाम तीन पुत्रांकडे चालवावा, ह्मणजे वडील पुत्र यांस सरंजाम असावा व त्यांनीं कनिष्ट बंधूंची परवरिष यथास्थित चालवावी. ( त्याजवरून कलमीं कण्यांत येतें कीं ) सदर्हू स-रंजामास आपण मुख्त्यार आहां; परंतु आपली सापत्न मातूश्री व दोघे बंधू यांचे खुराकी पोषागी बद्दल जो ऐवज द्यावा लागेल त्याचे मुबादला गांव लावून द्यावा व त्या बद्दल त्यांचे नांवें सनद करून द्यावी. ती सनद वाफस् घेण्यास व गांव परत घेऊन नक्त नेमणूक ठरवून देण्यास आंसाहेब मुख्त्यार आहेत. खुरा-कीं पोषागी बद्दल बेरीज ठरवून आलाहिदा कळविण्यात येईल. मालूम होय. बतारीख ३० माहे जून सन १८४३ इसवी. सु-र्सन आर्बा आर्बैन मयातैन व अलफ. सन १२५३ फसली. जि-यादाकाय लिहिणें; प्यार मोहोबत असों दिज्ये हेकितावत्.

( सही इंग्रजी ) जानवार्डन

एजेंट.

या ठरावाची समज एजेंटसाहेब यांनीं, कृष्णराव व माधवराव यांस ही एक पृथक पत्रानें दिली.

याप्रमाणें आपसांतील तंट्याचा निकाल लागल्यावर सर्व कामें सुरळीत चालूं लागलीं. पुढें त्याचवर्षी रघुनाथराव हे उभयतां सापत्नबंधू व ढमढेरे कारभारी यांस बरोबर घेऊन वार्षिक दरबारा करितां पुण्यास गेले. तो दरबार दसऱ्याचे दिवशीं एजेंट साहेब करीत असून त्यास जे दक्षिणेंतील सरदार येत त्यांस ते ज्याचे त्याचे योग्यतेप्रमाणें बहुमानाचे पोषाग देतहोते. * त्या दरबारांत रघुनाथराव व त्यांचे उभयतां सापत्न बंधू यांस शिरस्तेप्रमाणें पोषाग मिळाले.

सरकारच्या वर लिहिलेल्या ठरावा अन्वयें कृष्णराव व माधवराव यांस खुराकीपोषागी बद्दल रघुनाथराव यांजकडून ज्या नेमणुका देववावयाच्या त्या एजेंटसाहेब यांनीं ठरवून त्या बाबदींत कृष्णराव व माधवराव यांस पत्र लिहिलें.

हा ठराव रघुनाथराव यांस कळविण्यास्तव, कृष्णराव व माधवराव यांस आपण लिहिलेल्या पत्राची नक्कल साहेबमोसूफ यांनी त्याच तारिखेचे पत्रासोबत त्यांजकडे पाठवून दिली.

सदर्हू ठरावाप्रमाणें रघुनाथराव यांचे वर लिहिलेले नांवांचे बंधू पैकीं प्रत्येकास फक्त सरंजामाचे उत्पन्नावर दर शेकडा रुपये ७॥ प्रमाणें मिळावयाचे, याकरितां सरंजामाचे वार्षिक उत्पन्नाचा अजमास करून एक नक्की रक्कम ठरविण्यास्तव एजेंट साहेब यांनीं कागद पत्राचे आधारानें चौकशी सुरू केली.

या संधीस रघुनाथराव यांनीं कनिष्ट बंधू कृष्णराव यांस एकांतीं बोलावून असे सांगितलें कीं, "आजवर जो व्यवहार घडला त्यास आतां इलाज नांहीं; परंतु आपण आतां जाणते

* हा दरबार पूर्वी दसऱ्याचे दिवशीं होतहोता; परंतु सन १८५७ इसवी सालापासून ती वहिवाट बंद होऊन पुढें तो केसरे-हिंद यांचे जन्माचे तारिखेस होऊं लागला. परंतु त्याआलिकडे सरकार जी तारिख नेमितील त्या तारिखेस तो होऊं लागला आहे.

झालों आहों, या करितां मागील वैमनस्य सोडून देऊन एक विचारें वागूं; म्हणजे लौकीक राहून आपलें हीत ही होइल, कारण, वडीलांनीं जो लौकीक मिळविला त्याचें रक्षणकर्णें हें आपलें मुख्य कर्तव्य कर्म आहे. " हें सांगणे कृष्णराव यांस पसंद वाटून त्यांनीं रघुनाथराव यांस जबाब दिला कीं, " आपण ह्मणतां हें अगदीं रास्त आहे. याकरितां मी यापुढें आपले विचारानेंच वागेन. " याप्रमाणें उभयतां बंधूचें ऐक्य झाल्याबर त्यांनीं एजेंट साहेबांची भेट घेऊन त्यांस कळविलें कीं, " आम्ही लाहान असतां आमचे दरमियांन वागणारे यांनीं आम्हां मध्यें कलह लावून दिला होता; परंतु कलहा पासून उभयतांचें ही नुकसान आहे असें आतां आम्हांस पक्कें समजून आलें आहे. याकरितां सरंजामाचे उत्पंन्नाचे मानानें नेमणूका ठरविण्यास्तव चौकशी चालू आहे ती रहित करावी. " हें शाहाणपणाचें भाषण ऐकून एजेंट साहेबांस संतोष वाटला. मग त्यांनीं उभयतां बंधूस असें कळविलें कीं, " आपण उभयतांनीं एकविचारें वागण्याचें कबूल केल्यावरून तूर्त पक्या नेमणूका ठरवून देण्याचे तहकूब करण्यात येत आहे. पुढें कदाचित आपलें न बनेलतर त्याबद्दल विचार करण्यात येईल. " नंतर साहेब मौसूफ यांनीं कृष्णराव व माधवराव यांस तारीख २० माहे आक्टोबर सन १८४३ इसवीचे पत्र लिहिलें तें असें;—

नंबर ७८१

रावसाहेब मुष्फक् मेहेरबान करम
फर्मायदोस्तां कृष्णराव बापू, व माधवराव दादा, साहेब विंचूरकर
उमदेतुल मुल्क बाहादर सलमहु.

अर्जी सौब जांन वार्डन साहेब बाहादूर एजेंट जिल्हा दक्षिण सलाम बाहज सलाम खैरियत अंजाम आंके येथील खेरसला जाणून आपली षादमानीं हमेषा कलमीं करीत असले पाहिजे. दरींविला, आंमेहेरबांनांस तारीख ३० माहे जून संन १८४३ रोजीं खुराकी

पोषागी बद्दल आयंदा ठराव होऊन कलमीं कर्ण्यांत येईल म्हणून वगैरे मजकुराचें खत कलमीं झालें होतें, ऐशियास त्याबाबद इनाम, वतन, व वृत्ती खेरिज करून फक्त सरंजामांचे उत्पन्नावर दर शेंकडा रुपये १५ उभयतां मिळोन म्हणजे दर एकास साडे-सात रुपये शेंकडा व आपल्या दोन्ही मातुश्रचांस इनाम, वतन, वृत्ती व सरंजाम वगैरे एकंदर उत्पन्नावर दरशेंकडा रुपये १० प्रमाणें ह्मणजे दर एक बाईस शेंकडा रुपये ५ प्रमाणें मिळोन ठराव केला; परंतु आपण व मेहेरबान आंणासाहेब यांनीं एकीनें वागूं असें कबूल केलें सबब नुर्से सदरीं लिहिल्या अन्वयें बंदोबस्त केला नाहीं. आयंदा आपलें न बनेल तर वर लिहिल्या अन्वयें आपल्यास देणें विषयीं मेहेरबान आंणासाहेब यांस लिहून गेलें आहे. त्या विषयीं मागाहून हिशेब आणवून काय ठराव होईल ती बेरीज आयंदा कळविण्यांत येईल. मालूम् होय. तारीख २० माहे अकटोबर सन १८४३ इसवी. सुर्सन आर्बा आर्बैन मया-तैन व अलफ. जियादा काय लिहिणें प्यार मोहोबत असों दिज्ये हे कितावत्.

( सही इंग्रजी ) जानबार्डन

एजेंट

---

पुढें थोडक्याच दिवसांनीं आबासाहेब ढमढेरे यांचे नेमणूकेची एक वर्षाची मुद्दत भरल्यावर त्यांनीं आपले कारकिर्दीसंबंधीं एजेंट साहेब यांस रिपोर्ट करून त्याचे शेवटीं " रघुनाथराव हे आपले संस्थान संभाळण्यास योग्य झाले आहेत, याकरितां त्यांस मुख्त्यारी द्यावी. " अशी सिफारिष लिहिली. त्याचे जबाबांत एजेंट साहेब यांनीं ढमढेरे यांचे आभार मानिले. *

ढमढेरे यांनीं वर लिहिलेला रिपोर्ट केला त्यावेळेस रघुनाथराव यांनीं ही एजेंट साहेब यांस पत्र लिहिलें होतें. त्याचा जबाब ए-

* विंचूरचें दफतर.

जेंट साहेब यांनीं पाठविला त्यांतील हांशिल कीं " आपण आपले दौलतीचें हरएक कांम चालविण्यास योग्य झालां आहां असें ढमढेरे यांचे रिपोर्टावरून दिसतें. याकरितां आपल्यास मुख्त्यारी देऊन इतकेंच सुचविण्यांत येतें कीं आपण आपले घराण्याची मनुष्यें व पदरची मंडळी यांचा सांभाळकरून गृहकलह न वाढूं देतां एक विचारें वागावें आणि रैयतपरवारिषीकडे * ही लक्ष ठेवावें. "

याप्रमाणें रघुनाथराव यांस आपले संस्थानची मुख्त्यारी मिळाल्यावर लौकरच त्यांस एजेंट साहेबांकडून दिवाणी अधिकाराची सनद मिळाली. तेणेंकरून त्यांस दिवाणी मोकदम्यांचे फैसले करण्याचा इतका मोठा अधिकार प्राप्त झाला कीं त्यांचे निवाडयांवर अपील नव्हतें. शिवाय, पूर्वी दर महिन्यास, दर साहा महिन्यांनीं, आणि दर वर्षास दिवाणी फैसल्यांबद्दल सरकाराकडे हिशेब पाठवावे लागत होते तेही पाठविण्याची माफी झाली. खेरीज, आपले कोर्टांत आपले सहीचा छापील कागद चालवून त्याचे विक्रीचें उत्पन्न त्यांनींच घेत जावें असाही सरकारानें ठराव केला. अणखी, सन १८२७ इ० चा फौजदारी कायदा १५[1] प्रमाणें त्यांस फौजदारी अधिकार ही मिळाला.

याप्रमाणें रघुनाथराव यांस निरनिराळे अधिकार मिळाल्यावर सुदैवानें सर्व गोष्टी सुयंत्र चालूं लागल्या. मग आपले बंधू कृष्णराव यांस राजी ठेवण्यास्तव त्यांजकडे दिवाणी, फौजदारी, मुलकी, आणि दौलत संबंधीं सर्व कामें सोंपून देऊन ते स्वतः त्यांजवर देखरेख ठेवूं लागले. ही गोष्ट रघुनाथराव यांनीं प्रसन्न मनानें केली, सबब कृष्णराव हेही पुष्कळ श्रम करून वर लिहिलेलीं सर्व कामें योग्य रीतीनें करूं लागले. सरकारी कामकाजा संबंधीं त्यांनीं असा वर्तनक्रम चालविला कीं कोणतेही कामाबद्दल सरकारापर्यंत बोभाटा जाण्यास बिलकूल कारण राहिलें नाहीं. शिवाय, दर वर्षास सेशन ज्यडज्य यांस आदरानें बोलावून व स-

* प्रजेचें पालनाकडे.

हर अदालतीचे सर्कीट ज्यडज्य हे दौऱ्यावर ( आपले अधिकाराचे हद्दींतील दिवाणी कोर्टांची पाहाणी करण्यास्तव ) फिरत असतां विंचुरापासून थोडे अंतरावर आले ह्मणजे त्यांस मुद्दाम विंचूरास बोलावून आपले कोर्टांतील इन्साफाचे कागदपत्र त्यांस दाखवूं लागले. ते पाहिल्यावर ते अधिकारी खुष होऊन "आमचे अधिकराचे हद्दींतील कामांपेक्षा तुमचे कोर्टांत अधिक चांगलें काम चालतें" असें बोलत इतकेंच नाहीं, तर, त्याबद्दल कृष्णराव यांस सर्टिफिकिटें (आब्रू पत्रें) ही देऊन जात व सरकारांसही त्याबद्दल तारिफ लिहित; आणि सरकारांकडून त्याबद्दल रघुनाथराव यांस तारिफेचीं पत्रें ही येत.

याप्रमाणें विंचूरचे दौलतींत सर्व कामें उत्तम प्रकारें चालल्यानें आपले बंधूंचें मन सर्व प्रकारें अनुकूलतेचें आहे असें रघुनाथराव यांचे मनांत ठसून त्यांची सर्व फिकीर दूर झाली.

याच सुमारास रघुनाथराव यांची कनिष्ट पत्नी वयांत येऊन तिचीही प्रपंचास मदत होऊं लागली; आणि त्यांच्या उभय पत्न्या एकविचारें वागत असल्यानें त्यांचें मनास मोठें समाधान वाटूं लागलें. सारांश, ते दिवस त्यांचे मोठे सुखसमाधानाचे होते. तथापि त्यांचे मनास पुनः उद्विग्नता येण्यास लौकरच एक कारण झालें. त्याचा गोषवारा पुढें लिहितों.

कोर्ट आफ डिरेक्टर्स ( कंपनी सरकारचें लंडन शहरांतील मुख्य कोर्ट ) यानें सन १८४२ इ० सालीं सरंजाम चालविण्याचें बाबदींत कांहीं नवीन रूल ( कानू ) करून ते मुंबई सरकाराकडे पाठविले होते. त्या रुलांत अशा बिकट शर्ती घातलेल्या होत्या कीं तेणेंकरून बहुतेक सरंजाम खालसा होणारे होते. त्या रुलांअन्वयें दक्षिणेंतील दरोबस्त सरंजामाच्या चौकशा करण्याविषयीं त्या वेळचे पुणें येथील एजंट मिस्तर जानवार्डन् यांस मुंबई सरकारचा हुकूम येऊन थडकला. तो पाहून सर्व सरंजामदार आपआपले ठिकाणीं लाचार व दिलगीर होऊन बसले. सरकार

हुकूमाअन्वयें मिस्तर वार्डन यांनीं चौकशा सुरू केल्या. त्या कामांत सरंजामदारांपासून पुरावे मागून घेऊन प्रत्येक सरंजाम कोणत्या शर्तीनें चालवावा याचा विचार होऊं लागला. त्यावेळेस रघुनाथराव यांस एजेंटसाहेबांकडून एक पत्र आलें, त्यांत आपले घराण्याकडे सन १७५१ इ० पूर्वीं काय सरंजाम चालत होता त्याबद्दल पुराव्याचे दाखले पाठवावे म्हणून लिहिलें होतें. अशा प्रसंगीं रघुनाथराव यांजपाशीं पुरातन माहितगार असा कोणीही कारभारी अगर कारकून राहिला नव्हता. ते स्वतः म्हटले तर अल्पवयीं असून प्राचीन गोष्टी त्यांस मुळींच माहित नव्हत्या. तशांत पूर्वीं सन १८०२ इ० सालीं यशवंतराव होळकर यांनीं पुण्यावर चढाई केली त्या वेळेस त्यांचा एक सरदार मीरखान यानें विंचूरकर यांचा विंचूर येथील वाडा जाळून टाकिला त्यांत विंचूरकर यांचे बहुत कागदपत्र जळून गेले होते, आणि जे कांहीं इतर ठिकाणीं राहिले होते त्यांची दक्षिणेंत इंग्रजी अमल होण्याचे घालमेलींत अफरातफर झाली होती. त्यामुळें एजेंटसाहेबांनीं मागितलेले दाखले कितीएक दिवस पर्यंत त्यांस हाजिर करितां आले नाहींत; आणि पुढें काय करावें हें त्यांस सुचेनासें होऊन त्यांचे मनास मोठी विवंचना प्राप्त झाली. तथापि, ईश्वर दयेनें ती विवंचना लौकरच दूर झाली, कारण, ते दाखले मिळविण्यास्तव त्यांनीं आपले पदरचे पिढीजादे कामगारांचे घरचीं जुनीं दफतरें पाहाण्यास कारकून बसविले. तेव्हां माजी पुरातन कारभारी सालकाढे यांचे घरांत विंचूरकर घराण्याचीं कांहीं जुनीं दफतरें ( रुमाल ) सांपडलीं. त्यांत सन १७५१ इसवी पूर्वीं रघुनाथराव यांचे निपणजे विठ्ठल शिवदेव यांचे हातांत उत्तर हिंदुस्थान प्रांतीं अकरा माहाल असून सन १७४३–४४ इ० सालीं त्या पराक्रमी पुरुषास दक्षिणेंत रासें व मांडकी हे गांव जाहागीर मिळाले असल्याबद्दल बाळाजी बाजीराव पेशवे यांच्या अस्सल सनदा व त्यांचे दफ्तरचे दाखले सांपडले. शिवाय वि-

इल शिवदेव यांस पूर्वी दिलेल्या देहेनग्या एकत्र करून त्याबद्दल सन १७६२ इ० सालीं सालिना रुपये १६,८५,००० चे आकाराचा एकंदर मुलुक पेशवे माधवराव बल्लाळ यांनीं लावून दिल्याचाही दाखला सांपडला.

मग रघुनाथराव यांनीं वर लिहिलेले एकंदर दाखले एजेंटसाहेब यांजकडे पाठवून दिले, आणि मागाहून त्या साहेबांची मुद्दाम भेट घेऊन त्यांस समक्ष कळविलें कीं, " हाल्लीं चालत असलेली जाहागीर वंशपरंपरेचे शर्तीनें चालविण्याबद्दल माझे वडील तात्यासाहेब यांस सर जान मालकम् व आनरेबल मौंटस्टुअर्ट एलफिन्स्टन माजी सोलकमिशनर यांजकडून वचनें मिळाल्याचा मजकूर मीं त्यांचें तोंडानें ऐकिला आहे. या करितां सदहू जाहागीर वंशपरंपरेनें मजकडे चालविण्याविषयीं सरकारास सिफारिष कर्ण्याची मेहेरबानगी करावी." त्याजवर मिस्तर वार्डन साहेब ह्मणाले कीं, " आपला सरंजाम वंशपरंपरा चालविण्याचे बाबदींत मालकम्साहेब यांनीं आपले वडिलांस वचन दिलें तें खरें आहे, व त्याच वचनाचे आधारानें तो वंशपरंपरेनें चालवावा ह्मणून मि. एल्फिन्स्टन यांनीं दफतरीं दाखला लिहून ठेविला आहे. सबब मी आपले ह्मणण्याप्रमाणें सरकारास सिफारिष करीन. आपण बिलकूल फिकीर करूं नये."

याच सुमारास एक गोष्ट झाली ती कांहीं महत्वाची वाटल्यामुळें आह्मी ती पुढें लिहितों.

दक्षिणेंत इंग्रजी अंमल होतांच कपतान पाटिंजर म्हणून जे साहेब अहंमदनगर जिल्ह्याचे कलेक्टर झाले होते, त्यांनीं सरकारची चाकरी नेकीनें केल्यावरून पुढें त्यांस बारोनेटची पदवी मिळून लोक त्यांस " सर हेन्रीपाटींजर " असें म्हणूं लागले. चीनदेशांत अफूचे व्यापाराचे संबंधानें झालेल्या बखेड्याचा पक्का व निरंतर चालेल असा बंदोबस्त कर्ण्यास्तव इंग्रज सरकारानें त्यांस त्या देशास पाठविलें होतें. आपले सरकारचे खात्रीप्रमाणें

त्या बखेडयाचा निकाल केल्यावर ते इंग्लंडास परत जात असतां मुंबईस उतरून पुण्यास आले. त्या साहेबांबरोबर आपले वडील तात्याहेब यांची निहायत दोस्ती होती असें रघुनाथराव यांस ऐकून माहित होतें. सबब त्यांनीं मिस्तर वार्डन एजेंट यांचे मार्फत त्यांची भेट घेतली. त्या भेटींत तात्यासाहेब यांजबरोबर आपली मोठी दोस्ती असण्यासंबंधीं त्यांनीं रघुनाथराव यांस कित्येक मागील गोष्टी सांगितल्या. ते साहेब उदार व मोकळ्या मनाचे असून मोठे भारदस्त व प्रतिष्टीत होते. त्यांचा मुक्काम पुण्याचें छावणींत होता. मुंबईचे गव्हरनर साहेब यांनीं त्यांस आपले दापोडी येथील बंगल्यांत बाल ( मडमांचा नाच ) व जाफत दिली. त्या प्रसंगीं पुण्यांतील दरोबस्त बडेलोकांस पानसुपारीकरितां बोलावणीं झालीं होतीं. रघुनाथराव यांसहीं बोलावणें झाल्यावरून ते तेथें गेले होते. ते पार्टिजरसाहेब यांस भेटल्यावर ते साहेब शिष्टसांप्रदायाप्रमाणें त्यांशीं बोलूं लागले. त्या बोलण्यांत त्यांनीं रघुनाथराव यांस असें सांगितलें कीं, "आपले वडील तात्यासाहेब हे मोठे इमानदार व थोर मनाचे सरदार होते. त्यांनीं आपलें अत्यंत मोठें नुकसान सोसून आपले मालिक पेशवे यांजबरोबर शेवटपर्यंत नेकीनें वर्तन केलें. असें उदाहरण पेशवाईतील सरदारांचे घराण्यांपैकीं आपलेच घराण्यांत आढळलें." पुढें अशाच प्रकारें कांहीं वेळपर्यंत परस्परें भाषण झाल्यानंतर साहेब मौसूफ यांनीं रघुनाथराव यांस बिदाकरून दिलें. पुढें लौकरच ते साहेब विलायतेस निघून गेले.

मिस्तर वार्डन् एजेंट यांनीं लौकरच दक्षिणेंतील प्रत्येक सरंजाम पुढें चालविण्याची शर्त ठरवून एक पट तयार केला आणि तो मुंबई सरकाराकडे पाठवून त्यांत लिहिलेल्या बहुतेक जुन्या सरदारांचे सरंजाम वंशपरंपरेचें शर्तीनें चालविण्या विषयीं त्या सरकारास आपले रिपोर्टांत सिफारिष लिहिली. हें जरूरीचें व महत्वाचें काम संपल्यावर ते साहेब रजा घेऊन विलायतेस गेले.

सदरहू सरंजामपट मुंबई सरकारानें कोर्ट आफ डिरेक्टर्स यांजकडे विचाराकरितां पाठवून दिला. तथापि त्यांत पुष्कळ चुका झाल्या होत्या असें त्या कोर्टास वाटल्यावरून त्यानें तो पट पुनः चौकशी कर्ण्यास्तव मुंबई सरकाराकडे परत पाठविला. त्या सरकारानें तो मिस्तर ब्रौन नांवाचे जे साहेब नुकतेच पुण्यास एजेंटीचे कामावर आले होते त्यांजकडे पुनः चौकशी कर्ण्यास्तव पाठवून दिला. याप्रमाणें सदहू सरंजामपट आणखीही एक वेळा विलायत सरकारापर्यंत जाऊन चौकशीस्तव परत आला. शेवटीं सन १८४९ इसवी सालीं इनाम कमिटी स्थापन कर्ण्याविषयीं प्रथम उपक्रम निघाला, आणि त्याजवर विलायत सरकारापर्यंत आणखीही पत्रव्यवहार चालून सन १८५१ इसवी सालीं ती कमिटी पुणें येथें स्थापन झाली. पुढें तिचे कचेरींत दक्षिणेंतील दरोबस्त सरंजामांच्या पुनः चौकशा कर्ण्याचें काम झपाट्यानें चालूं लागलें.

सन १८४७ इ० सालीं रघुनाथराव यांची वडील पत्नी प्रसूत होऊन तिला कन्या झाली; परंतु पुढें त्या बाईस सुतिका रोग झाला. तो नाहींसा होण्यास्तव रघुनाथराव यांनीं दाहा महिनेपर्यंत बहुत उपचार केले; परंतु कांहींच उपयोग न होतां शेवटीं सन १८४८ इ० सालीं त्या बाईस देवाज्ञा झाली. पुढें दोन महिन्यांनीं तिची तान्ही कन्याही वारली. या बाईचे अंगीं पातिव्रत्य धर्म वर्णनीय होता, त्यामुळें तिचे वियोगानें रघुनाथराव यांस अत्यंत दुःख झालें. त्या दुःखाचें परिमार्जन होऊन मनाची स्वस्थता व्हावी म्हणून रघुनाथराव यांनीं उत्तर हिंदुस्थानांतील तीर्थयात्रा कर्ण्याचा विचार आपले बंधूंस बोलून दाखविला. तेव्हां त्यांनीं घर सोडून न जाण्याविषयीं रघुनाथराव यांस पुष्कळ प्रकारें आग्रह केला; परंतु यात्रेस जाण्याचा विचार त्यांचे मनांत दृढ झाला असल्यामुळें त्यांनीं बंधूंचे आग्रहास मान न देतां पुण्यास जाऊन एजेंटसाहेब यांचे मार्फत सफरेस जाण्याविषयीं सरकारची परवानगी मिळविली, व त्या खेरीज, सफरेंत आपली चांगली

व्यवस्था राहावी म्हणून उत्तर हिंदुस्थानांत ज्या ज्या राजधान्या व शहरें त्यांस पाहावयाचीं होतीं त्या त्या राजधान्यांतील इंग्रज सरकारचे रेसिडेंट किंवा पोलिटिकल एजेंट व इतर अधिकारी यांचे नांवांचीं पत्रें त्यांनीं एजेंट साहेब यांजपासून घेतलीं. नंतर ते लाहानशा लवाजम्यानिशी सुमुहूर्तावर निघून चालते झाले. *

रघुनाथराव हे पाहाडांतील बद्रिकेदार वगैरे ठिकाणच्या यात्रा करित करित प्रयागास येऊन पोहोंचले. त्यासुमारास त्यांची कनिष्ट पत्नी जी अजारीपणामुळें त्यांबरोबर न जातां त्यांचे आज्ञेवरून विंचूर येथेंच राहिली होती तिला देवाज्ञा झाली. हें खेदकारक वर्तमान रघुनाथराव यांस समजतांच, नानाप्रकारच्या तीर्थयात्रा केल्यामुळें व चमत्कारिक ठिकाणें व अपूर्व पदार्थ पाहिल्यानें त्यांचे मनास जी कांहीं स्वस्थता प्राप्त झाली होती ती नाहींशी होऊन पूर्ववत् त्यांचे चित्त पुनः उदास झालें, तत्रापि त्यांनीं यात्रेचा क्रम बंद न करितां पुढें तसाच चालविला.

---

* रघुनाथराव यांनीं सन १८४१ इसवी पासून कित्येक धर्मकृत्यें व तीर्थयात्रा केल्या, व त्याचप्रमाणें कित्येक सत्पुरुषांचीं दर्शनें घेऊन त्यांचे समागम केले वगैरे गोष्टींबद्दल वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजेश्री गणेशशास्त्री लेले त्रिंबककर यांनीं "तीर्थयात्रा प्रबंध" या नांवाचें एक पुस्तक छापून प्रसिद्ध करण्याचें काम चालविलें आहे. त्यांत वर लिहिलेली गोष्ट व इतर यात्रासंबंधीं वगैरे पुष्कळ मनोरंजक गोष्टी आहेत, सबब तें पुस्तक वांचून पाहाण्याविषयीं आम्ही वांचकांस सूचना करितों.

## प्रकरण २.

पुढें सन १८५१ इसवी सालीं रघुनाथराव हे विंचुरास परत आल्यावर त्यांनीं आपली कनिष्ट मातुश्री सत्यभामाबाई यांची समजूत केली आणि त्यांस विंचुरास नेऊन आपले वाड्यांत ठेवून घेतलें.

याच सुमारास वडिलार्जित स्थंगम् मिळकतीची त्रिवर्ग बंधूंमध्यें वांटणी होण्याविषयीं वडील मातुश्री लक्ष्मीबाई यांजकडून उपक्रम निघून ती करण्यांत आली. ती होण्यापूर्वीं त्रिवर्ग बंधूंनीं आपसांत असें ठरविलें कीं सदर्हू मिळकतीपैकीं ज्याचे ताब्यांत ज्या वस्तू असतील त्या त्याचे ताब्यांतच राहाव्या, आणि मातुश्री जी वस्तू ज्यास देतील ती त्यानें स्विकारून संतुष्ट राहावें. तो ठराव मातुश्री यांस ही मान्य झाल्यावरून त्यांनीं शिल्लक असलेल्या जडजवाहिराची वांटणी करून दिली. तींत, रघुनाथराव हे वडील असल्यामुळें वडिलार्जित देव व त्यांचे अलंकार, पोथ्या, सनदापत्रें वगैरे उपयोगाचे दरोबस्त कागदपत्र त्यांस मिळून नरसिंहपूर येथील श्रीनृसिंह देवाचे संस्थानची वहिवाटही त्यांजकडेसच गेली.

सन १८५२ इ० चे मार्च महिन्यांत रघुनाथराव यांनीं सातारा येथील गोविंद नाईक पालकर यांचे वडील कन्ये बरोबर आपला विवाह केला.

सनमजकूरचे मे महिन्यांत, सरकारानें, रघुनाथराव यांचे कनिष्ट बंधू कृष्णराव यांची व्यवहारांतील हुशारी, कायद्यांची माहितगारी, प्रामाणिकपणा, प्रतिष्ठितपणाचें वर्तन, आणि त्यांचे खान्दानीचा मोठेपणा, या सर्व गोष्टींकडे लक्ष पुरवून, त्यांची पुणें येथील सदर अमिनीचे हुद्यावर एकदम नेमणूक केली. पुढें थोडकेच दिवसांनीं कृष्णराव हे आपले कामाचा चार्ज घेण्यास्तव पुण्यास गेले.

ह्या उभयतांचे कनिष्ट बंधू माधवराव यांस त्याकाळीं व्यवहा-

राची चांगली माहिती नसल्याकारणानें ते घरीं रिकामे बसून काळ घालवीत होते. त्यांनीं हुशार होऊन नांवलौकिक मिळवावा असें रघुनाथराव यांस वाटल्यावरून त्यांनीं त्यांस कायद्यांचा अभ्यास करण्यास लाविलें. त्या प्रमाणें माधवराव यांनीं चांगले परिश्रम केल्यामुळें त्यांस कायद्यांचें चांगलें परिज्ञान झालें. सबब रघुनाथराव यांनीं सन १८५२ इ० सालीं पुणें जिल्ह्याचे त्या वेळचे ज्यडज्य मिस्तर राबर्ट कीज यांस त्यांची परिक्षा घेण्याविषयीं विनंती केली. माधवराव यांची ही परिक्षा उतरल्यावर, त्यांस ज्यडज्य साहेब यांजकडून सर्टिफिकेट मिळालें. त्यांत ते दिवाणी व फौजदारी कामांत हुशार आहेत असें लिहिलेलें होतें.

रघुनाथराव यांनीं माधवराव यांची व्यवहारांतील हुशारी पाहून, पुढें सन १८५४ इ० सालीं, त्यांजकडे आपले दौलतीचा सर्व कारभार सांगितला आणि आपले संस्थानांतील दिवाणी व फौजदारी अधिकार त्यांस देण्याविषयीं, एजेंटसाहेब यांचे मार्फत, सरकारास विनंती केल्यावरून सरकारानें ते त्यांस देण्याविषयीं आपले जुडिशिअल खात्यांत ठराव केला. त्यावरून माधवराव हे दौलतीचीं दरोबस्त कामें पाहूं लागले. त्यांची बुद्धी दिवसांदिवस अधिक प्रकाशीत होत चालल्यामुळें थोडकेच दिवसांत ते सर्व कामकाजांत निष्णात झाले आणि त्यांचे वडिल बंधू कृष्णराव यांनीं दिवाणीं, फौजदारी, मुलकी, वगैरे कांमांचे वहिवाटींत लौकीक संपादिला होता त्यापेक्षां यांनीं अधिक संपादिला. भणखी तर काय? पण सरकारी कामगारांनीं सुद्धां त्यांची तारीफ केली. जिल्ह्यांचे ज्यडज्य व माजिस्त्रेट आणि सदर अदालतीचे सर्किट ज्यडज्य यांनीं विंचुरचे कोर्टांत इनसाफाचें काम चांगले रीतीनें चालत असल्याबद्दल माधवराव यांस सर्टिफिकिटे (आज्ञापत्रें) दिलीं. त्या शिवाय माधवराव यांनीं विंचूर संस्थानचे फायद्याचीं कित्येक कामें मोठ्या शाहाणपणानें केलीं. तीं अशीं कीं जाहागीर गांवांपैकीं अहमदनगर जिल्ह्यांतील बळदगांव व धामोरी व

पुणें जिल्ह्यांतील मांडकी या गांवांचे शींवसंबंधानें शेजारचे खालसा गांवांबरोबर बहुत वर्षेपर्यंत तंटे चालले होते, त्यामुळें त्या तिन्हीं गांवांतील पुष्कळ जमिनी पडित पडल्या होत्या; परंतु त्यांनीं त्याबद्दल सरकारांत उद्योग चालवून त्या तंट्याचे निकाल करून घेतले; तेणेंकरून त्या जमिनींची लागवड होऊन, संस्थानचें उत्पन्न दरसाल सरासरी एक हजार रुपये वाढलें. शिवाय, सरकारचे एका भाकूटा अन्वयें सायर वगैरे बाबी माफ झाल्या-होत्या, त्याबद्दलही त्यांनीं सरकारांत काम चालवून संस्थानचें नुकसान न होईल असे ठराव करून घेतले.

सन १८५१ इसवी सालीं पुणें येथें इनाम कमिटी स्थापन झाली असें वर लिहिलेंच आहे. त्या कमिटीचे अधिकार पुढें अधिकाधिक वाढून सन १८५५ इ० सालीं तिची मोठी बडेजाव झाली, आणि इनाम कमिशनर कपतान कौपर यांची सर्वत्र ख्याती होऊन त्यांचे हुशारीवर मुंबई सरकारचा मोठा भरंवसा बसला. तेव्हां राजकीय संबंधाचे कित्येक कामांत तें सरकार त्यांची सल्ला घेऊं लागलें. कौपर साहेब यांस इनाम, सरंजाम, वगैरे देहेनग्यांचे बाबतींत चौकशी कर्ण्याचे कामीं पेशवे सरकारचे अमलांतील गांवगंनाच्या जुन्या कागदपत्रांची गरज लागली; परंतु ते कागदपत्र देशमूख, देशपांडे, व इतर हक्कदार यांचे ताब्यांत असल्यामुळें ते हातीं येणें मोठें दुरापस्त होतें. त्यांचा शोध लावून ते मिळविण्याचे कामीं माधवराव यांनीं रघुनाथराव यांचे हुकुमावरून इनाम कमिटीचे खात्यास कार्य सिद्धी होण्या जोगी मदत केली. त्यामुळें पुष्कळ कागदपत्रांचा शोध लागून ते साहेबमौसूफ यांचे हातीं आले. त्यांखेरीज त्यांचे विंचूर येथील वाड्यांत जे जुने कागदपत्र होते व जे त्यांचे पदरचे पिढिजादे कामगारांचे घरीं सांपडले ते सर्व त्यांनीं जमा करून आपले पत्रा सोबत कौपर साहेब यांजकडे पाठवून दिले. तेणेंकरून त्या साहेबांस मोठी खुषी होऊन त्यांनीं याबद्दल मुंबई सरकारास विं-

चूरकर घराण्याची तारीफ लिहिली आणि सरकारानेंही त्याबद्दल आपली खुष मर्जी दर्शित केली. *

अहमदनगर जिल्ह्यापैकीं कोपरगांव तालुक्क्यांत बेटकोपरगांव येथील शुक्रेश्वर, कचेश्वर आणि श्रीवासुदेव व कोपरगांव येथील गोवर्धनधारी या देवांचे संस्थानांस माजी अमलापासून सालीना रुपये ६०८० साहा हजारांची एकंदर नेमणूक मिळत आहे. या नेमणूकेचा खर्च त्या संस्थानचे पंचांचे मार्फत होत असे; परंतु पंच लोकांमध्यें तक्रारी उत्पन्न होऊन सदर्हू खर्चाचे बाबदींत अत्यंत अव्यवस्था झाली; सबब सरकारानें अहमदनगर जिल्ह्याचे कलेक्टर यांस वर लिहिलेल्या संस्थानची वहिवाट विंचूरकर यांचे हातीं देण्याची मंजुरी दिल्यावरून त्यानीं रघुनाथराव यांस सरपंच नेमिलें आणि त्यांचे पदरचे लोकांस पंच नेमून त्यांचे मार्फत सर्व व्यवस्था चालविली. तेणेंकरून संस्थानचा बंदोबस्त उत्तम प्रकारें होऊन सर्व तक्रारी मिटल्या. त्या वेळेपासून आजपर्यंत सदर्हू संस्थानची वहिवाट सुरळीत चालत आहे.

याचप्रमाणें अहमदनगर जिल्ह्यांतील मौजे नानज हा गांव आळंदी येथील ज्ञानेश्वराचे चौघड्याचे खर्चाकडे चालत आहे. त्या गांवाची वहिवाट ज्या मनुष्याकडे होती त्याजकडून वसुलाचे कामांत अव्यवस्था होऊं लागली, सबब अहमदनगरचे कलेक्टर यांनीं सदर्हू गांवची वहिवाट रघुनाथराव यांचे हवालीं केली. त्या वेळेपासून सदर्हू गांवचे वसुलाची व्यवस्था उत्तम प्रकारें चालत असून एकंदर उत्पन्न ज्ञानेश्वराचे चौघड्याचे खर्चाकरितां नियमित वेळेस पोंहोंचत आहे.

अहमदनगर जिल्ह्याचे जज्य मि० जे० डब्ल्यु वुडकॉक हे त्या जिल्ह्यांत आपले ताब्यांतील दिवाणी कोर्टें पाहण्यास्तव फिरत असतां, ते विंचुरा नजीक आल्याचें वर्तमान रघुनाथराव यांस समजल्यावरून त्यांनीं त्या साहेबांस विंचुरास येण्याविषयीं आपली

* सरकारचा राजकीय खात्यांतील तारीख २३ माहे मार्च्य सन १८५६ इसवीचा ठराव.

इच्छा दर्शित केली. त्यावरून ते विंचुरास आले. तेथें रघुनाराव यांनीं त्यांचा उत्तम प्रकारें सत्कार केल्यावर त्यांस आपले कोर्टाची दिवाणी व फौजदारी दफ्तरें दाखविलीं. साहेब मैसूफ यांनीं तीं तपासून पाहिल्यावर त्यांस खुषी झाली. मग त्यांनीं माजी सदर दिवाणी अदालतीस त्या बाबद रिपोर्ट केला. सदर अदालतीनें त्या प्रकर्णी सरकारास पत्र लिहिल्यावरून सरकारानें आपले इनसाफ खात्यांत त्याविषयीं ठराव करून तो सदर अदालतीस कळविला. सदहू ठरावांत विंचूर येथील दिवाणी कोर्टाचें काम चालण्याचे बाबदींत आपल्यास बहुत खुषी झाल्याचा मजकूर सरकारानें लिहिला होता. *

याच सुमारास मुंबई इलाक्यांत विद्या वृद्धीस विशेष उत्तेजन देण्याचे इरायानें मुंबई सरकारानें गांवोगांव तजविजा सुरू केल्या. त्या कामीं रघुनाथराव यांनीं विद्याखात्याकडील कामगार यांची यथाशक्ति सरवराही केल्यामुळें किती एक सरकार खालसा गांवीं नवीन शाळा स्थापन झाल्या. त्याचप्रमाणें त्यानीं स्वतःचे जाहागीर गांवांपैकीं बहुतेक मोठया गांवीं शाळा स्थापन करून विद्या शिकण्यास्तव त्या गांवचे लोकांस उत्तेजन दिलें. ही गोष्ट सरकारचे विद्या खात्याकडील अधिकारी यांस समजल्यावर त्यांनीं त्या बाबदींत मुंबई सरकारास रिपोर्ट करून त्यांत रघुनाथराव यांची तारीफ लिहिली. सरकारानें त्या रिपोर्टाचे जबाबांत रघुनाथराव यांचे वर्तनानें आपल्यास खुषीझाली असें कळविलें. †

---

* अहंमदनगरचे जज्य मिस्तर जे डब्ल्यु वुडकॉक यांजकडून सदर दिवाणी अदालतीस नं. ३६४ ता. १६ मे स. १८५४ चें पत्र गेलें तें.

सरकाराकडून सदर दिवाणी अदालतीचे रजिस्ट्रार यांस नं. ५४२० ता० १६ डिसेंबर स. १८५४ इ. चें पत्र गेलें तें.

† १ राबर्ट कीज एस्क्वायर दाक्षिणेंतलि सरदार लोकांबद्दलेच एजेंट यांजकडून माधवरावदादासाहेब विंचूरकर यांस नं. ३५१ ता० २ एप्रील सन १८५६ चें मराठी पत्र आलें तें.

२ मुंबई सरकाराकडून विद्या खात्यावरील मुख्य अधिकारी [ डिरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन ] यांस जनरल खात्यांतून नं. १४०५ तारीख १४ जून सन १८५८ चें पत्र गेलें तें.

विंचूर संस्थानांत पुष्कळ गांवीं चावडया व मारुतींचीं देवालयें मोडकळीस आलीं होतीं. ही स्थिती रघुनाथरावयांस त्यांचे शेकदार यानीं कळविल्यावरून त्यानीं त्या सर्वांच्या मरामती करविल्या. शिवाय ज्या गांवांत अजी चावडी अगर देवालय नव्हतें तेथें स्वतःचे खर्चानें नवीन चावडी बांधविली, व त्याच प्रमाणें कित्येक गांवांस नवीन गांवकुसें करविलीं. तसेंच गांवोगांव जुने पाटबांधारे बेमरामत झाल्यामुळें त्यांचें पाणी फुटून बाहेर वाहून जात होतें असें त्यांस कळल्यावरून त्यानीं त्यांची डागडुजी करविली आणि जेथें नवीन बांधारे होण्यासारखीं स्थळें होतीं तेथें ते बांधवून पाण्याचे पुरवठयाकरतां शिवारांतून पाट सुरू केले.

पूर्वीं दक्षिणेंतील सरदार लोकांबद्दलचे एजंट हे पुणें येथें दसऱ्याचे सणाबद्दल दरबार करून त्या प्रसंगीं जे सरदार हाजिर असतील त्यांस पोषाग देत असत; परंतु सन १८५७ इ० सालीं त्यांनीं सरकार हुकमावरून ती वहिवाट बंद केली; आणि माहाराणी क्वीन विक्टोरिया [ सांप्रत केसरेहिंद ] यांचे जन्मदिवशीं ह्मणजे ता० २४ मे रोजीं दरबार करून त्यास जे सरदार येतील त्यांस पोषाग द्यावे असा ठराव केला. तथापि विंचूरचे चीफ रघुनाथराव अंणासाहेब यांचे विनंतीवरून सरकारानें सदर्हू दरबारांत त्यांस स्वतः हाजिर होण्याची शर्त रद्द करून त्यांस पोषाग द्यावयाचा तो त्यांचे वकिलाचे हवालीं करीत जावा म्हणून एजंट साहेब यांस सन १८५७ इ० सालीं हुकूम पाठविला. त्याप्रमाणें हालीं रघुनाथराव यांस त्या वार्षिक दरबारांत वकील मार्फत पोषाग मिळत आहे.

सन १८५७ इ. चे एप्रील महिन्यांत उत्तर हिंदुस्थान प्रांतीं बंगालखात्यांत एक भयंकर लष्करी दंगा उपस्थित झाला, आणि पुढील (मे) महिन्यांत काळे पलटणींतील शिपाई लोकांनीं मीरत येथील छावणींत एकाएकीं गोरे लोकांवर उठून पुष्कळ साहेब लोकांस ठार मारिलें; आणि सरकारी तोफखाना व खजीना ताब्यांत

घेऊन तुरंगांतील कैदी लोक सोडून दिले; आणि गोरे लोकांचे बंगल्यांस आगी लावून त्यांस मुलांबाळांसुद्धां प्राणरक्षणार्थ पळून जाणें भाग पाडिलें. नंतर कांहीं तोफा व दारू गोळा वगैरे बरेंच जंगी सामान बरोबर घेऊन ते लोक दिल्लीकडे कूच करून गेले. दिल्लीचे छावणींतील काळे पलटणींचे शिपाई व स्वार त्या दंगेखोरांस सामील झाल्यामुळें त्यांनीं तेथेंही गोरे लोक मारून त्या कोटबंदी शहरांत अमल केला, आणि मोघल बादशाहास तख्तावर बसवून त्याचे नावानें द्वाही फिरविली. पुढें आग्रा, कोईल, नसिराबाद, मह्रू, कानपूर, झाशी, बांदा वगैरे कित्येक ठिकाणचे छावण्यांतही वर लिहिल्याप्रमाणेंच दंगे माजले. त्यांपैकीं कित्येक छावण्यांतील शिपाई लोक दिल्लीस जाऊन तेथील दंगेखोर लोकांस मिळाले. शेवटीं दिल्ली, कानपूर व झाशी हीं दंग्याची मुख्य ठिकाणें झालीं. मग इंग्रज सरकारानें पंजाब वगैरे प्रांतांत नवीन शिपाई लोक भरती केले, आणि इंग्लंडाहून मदत बोलावून प्रथम दिल्ली शहरावर हल्ला केला आणि तेथील दंगा अगदीं मोडून टाकून तें शहर ताब्यांत घेतलें. दंगेवाले तेथून निघून लखनौ शहरास गेले. तेव्हां तेथें मोठी जमात होऊन तें शहर दिल्लीप्रमाणेंच दंग्याचें मुख्य ठिकाण झालें; परंतु आमच्या जवांमर्द सरकारानें मोठ्या जुरतीनें तेथीलही दंगा मोडून तें शहर आपले ताब्यांत घेतलें, आणि दंगेखोरांचा पाठलाग करून त्यांस नेपाळवाल्याचे हद्दींत हांकून लाविलें. त्याचप्रमाणें सरकारानें इतर ठिकाणच्या दंगेखोरांवर हल्ले करून त्यांचेही दंगे क्रमाक्रमानें मोडून टाकिले.

हे सर्व दंगे मोडण्यास्तव सरकारचे सर्व खात्यांत तयारी चालू असतां, " सरकार जी नौकरी फरमावितील ती बजावण्यास मी सिद्ध आहे. " असें रघुनायराव यानीं पुण्याचे एजेंट यांचे मार्फत मुंबई सरकारास कळविलें. त्यांचे जबाबांत सरकारानें एजेंट साहेब यांस ता० २७ सेप्टेंबर सन १८५७इ०चे पत्रानें असें कळविलें कीं' " विंचूरकर यांचे राज्यनिष्ठेबदल सरकार बहुत

खुष झाले असून ते त्याबद्दल विलायत सरकारास लिहून पाठवि-तील."

वर लिहिलेला लष्करी दंगा वाढतां वाढतां त्याचेंनुसार मुंबई इलाक्यापर्यंत येऊन पोहोंचले; आणि खानदेश व नगर जि-ल्ह्यांत भिल्ल लोकांनीं उठून जागोजाग बंडें केलीं. शिवाय कित्ये-क ठिकाणीं भुरेचोर उठून त्यांनीं मुलुकांत रस्तेलूट व दरोडे घा-लण्याचा क्रम सुरू केला.

त्याच वेळेस विंचूर येथील कित्येक गैरचालीचे लोकांनीं पैसा जमविण्याचे इराद्यानें असमंतांतील गांवांत दरवडे घालणें सुरू केलें. ही खबर रघुनाथराव यांस कळतांच त्यांनीं ती नाशीक सबतुकडी चे त्या वेळचे माजिस्त्रेट चापम्यान साहेब व पोलीस सुपरिंटेंडेंट यांस जाहिर करून विंचूरचे बंदोवस्ताकरितां कांहीं पोलीसचे लोक पाठविण्याविषयीं विनंती केली. तेव्हां पोलीस सुपरिंटेंडेंट हे पोलिसाचे कांहीं शिपाई व स्वार बरोबर घेऊन विंचुरास आले; आणि त्यांनीं रघुनाथराव यांची भेट घेऊन ती दरोबस्त फौज विंचूर व त्याचे आसपा-सचा प्रदेश यांचे बंदोबस्ताकरितां त्यांचे हवालीं केली. सुपरिंटेंडेंट साहेब परत गेल्यावर चापम्यान साहेब माजिस्त्रेट यांनीं विंचुरास येऊन पडले-ल्या दरवडयाबद्दल तपास सूरू केला; आणि लष्करी कायद्या अन्वयें तेथील कित्येक वहिमी लोकांस पकडण्याचा इरादा दर्शित केल्यावरून रघुनाथराव यांनीं त्यांस त्या कामीं पुष्कळ मदत दि-ली. त्यामुळें साहेब मौसूफ यानीं कित्येक वहिमीं लोकांस पकडू न फांशीं दिलें आणि विंचूरकर यांचे इमानदारीविषयीं मुंबई सर-कारास रिपोर्ट केला.

हें भिल्ल लोकांचें बंड मोडण्यास इंग्रजसरकारचे पोलिस कामगार झटत असतां, विंचूर संस्थानांतील पोलिसचे शिपाइ व स्वार यानीं त्या कामीं त्या कामगारांस बरीच मदत दिली होती. त्या विषयीं पुढें सन १८५८इ० सालीं रघुनाथराव व मा धवराव यानीं अहंमदनगरचे पोलिस सुपरइन्टेंडेंट यांस रिपोर्ट

केल्यावरून सुपरिंटेंडेंटमौसूफ यांस खुषी झाली, आणि त्यांनीं विंचूरचे पोलिसापैकीं कित्येक लोकांस नक्त पैसा व कित्येकांस पागोटीं अशीं बक्षिसें वांटिलीं.

याच सालीं विंचूर संस्थानचे खानदेशाचे हद्दींवरील दहिवड नांवाचे गांवावर भिल्ल लोकांचा पुढारी भागोजी नाईक यानें भरदिवसास हल्ला केला. त्या वेळेस विंचूरचे पोलिसपैकीं कांहीं शिपाई व स्वार तेथें असून त्या लोकांनीं बहुत परिश्रम केल्यामुळें फक्त लाडशिका नांवाचे वाण्याचे घर खेरीज बाकी दरोबस्त गांवाचा बचाव झाला.

या शिवाय, भिल्ल लोकांच्या एका टोळीनें शिन्नर तालुक्यांत सारोळें येथें दरवडा घातला. त्या दरवडेखोरांपैकीं कांहीं लोकांचा पाठलाग सरकारचें पोलीस करीत असतां, त्या भिल्ल लोकांनीं विंचूर संस्थानचे हद्दींत पळ काढिला. त्या वेळेस विंचूरकर यानीं सरकारचे पोलिसास चांगली मदत केल्यामुळें भिल्लांचे टोळीपैकीं कित्येक दरवडेखोर लुटीचे मालानिशीं विंचुरानजीक पकडले गेले; आणि लुटीपैकीं कांहीं मालाचा भाग खुद्द विंचूरगांवांतच गेला असतां, त्याचा पुरा पत्ता लावण्यास विंचूरचे चीफ् यानीं जातीनें झटून चांगली मदत केली. *

विंचूर संस्थानचे कारभारी माधवराव दादासाहेब विंचूरकर यांनीं सरकारचे पोलीस खात्याचे कामगारांस बंड मोडण्याचे कामीं चांगली मदत केली ही गोष्ट त्या कामगारांनीं सरकारास कळविल्यावर त्यांस मोठी खुषी होऊन त्यानीं दादासाहेब यांस डेप्युटी माजिस्ट्रेटचा अधिकार दिला † आणि त्यांचे हाताखालीं

---

* अहंमदनगर डिस्ट्रिक्टचे पोलीस सुपरइनटेंडेंट यांजकडून त्या डिस्ट्रिक्टचे माजिस्ट्रेट यांस ता. ९ नोव्हेंबर सन १८६० चें पत्र गेलें तें.

अहंमदनगरचे डिस्ट्रिक्ट माजिस्ट्रेट यांनीं माधवरावदादासाहेब विंचुरकर यांस नं. ३ ता. ८ जानेवारी सन १८६१ चें मराठी पत्र पाठविलें तें.

† अहंमदनगरचे डिस्ट्रिक्ट माजिस्ट्रेट यांस सरकारचे ज्युडिशिअल खात्यांतून नं. ३७७६ ता. २३ नोव्हेंबर सन १८५९ चें पत्र गेलें तें.

माजिस्ट्रेटचें काम करण्यास त्या संस्थानचे पिढीजादे फडनवीस वामनराव नारायण सालकाढे यांस थर्ड क्लास माजिस्ट्रेटचा अधिकार दिला.

या संधीस ह्मणजे सन १८५९ चे आक्टोबर महिन्यांत उत्तर हिंदुस्थानांत बहुतेक ठिकाणीं शिपाई लोकांचा दंगा मोडला जाऊन स्वस्थता झाल्यावर माहाराणी क्वीन विक्टोरिआ ( सांप्रतची केसरे हिंद ) यानीं कंपनी सरकारचे हातांतून हिंदुस्थानचे राज्याचा कबजा घेतला; आणि शेष राहिलेला दंगा मोडण्यास्तव जे बंडवाले केवळ दुष्ट व आपमतलबी लोकांचे संगतीनें त्या दंग्यांत सामील झाले होते त्या लोकांस त्यानीं माफी देण्याचा ठराव करून आपले हिंदुस्थानांतील वाइसरॉय ( प्रतिनिधि ) व गवरनर जनरल लॉर्ड क्यॉनिंग् यांचे मार्फत संपूर्ण हिंदुस्थानांत ता० १ लीं नोव्हेंबर सन १८५९ इ० रोजीं जाहीरनामा लाविला. त्यांत वर लिहिलेले प्रकारचे दंगेखोर आपआपले घरीं गेले असतां झालेले गुन्हे त्यांस माफकरण्यांत येतील म्हणून वगैरे मजकूर लिहिलेला होता.

या जाहीरनाम्यांतील मजकूर विंचूर संस्थानचे चीफ् व त्या संस्थानांतील सर्व लोक यांस जाहिर करण्याकरितां नाशिक तुकडीचे माजिस्ट्रेट चाप्म्यान साहेब दुसरे कांहीं साहेबलोकांनिशीं वर लिहिलेले तारिखेस विंचुरास आले आणि त्यांनीं विंचूरचे चीफ रघुनाथराव अंणासाहेब यांजकडून दरबार करवून त्यांत सदहू जाहीरनामा वाचून दाखविला.

सन १८५९ इ० सालीं हिंदुस्थानांत मलिका मुआझ्मा यांचें राज्य स्थापन झाल्यावर पुढें सन १८६२ इ० सालीं मुंबई येथें नवीन कायदे कौन्सिल् स्थापण्यांत आलें. त्यांतील मेम्बर साहेब लोक असून शिवाय आडिशनल मेम्बर ह्मणून हिंदुस्थानांतील प्रतिष्टित गृहस्थांचीही योजना करण्याविषयीं सरकारचा ठराव झाला. त्यावरून त्या कौन्सिलांत सावनूरचे नवाब, ना-

नाशंकरशेट, अहमदाबादचे सावकार हेमाभाई प्रेमाभाई व रघुनाथराव यांचे कनिष्ट बंधू माधवरावदादासाहेब यांच्या नेमणुका झाल्या.

याचवर्षी आक्टोबर महिन्यांत माधवरावदादासाहेब यांस अहमदनगर व खानदेश या जिल्ह्यांत चालविण्यास्तव फुल्पावर माजिस्ट्रेटचे * अधिकार मिळाले.

सन १८६३ इ० सालीं दादासाहेब विंचूरकर यांची कन्या विवाहास योग्य झाली होती, सबब त्यांचे वडील बंधू व विंचूर संस्थानचे मुख्य रघुनाथरावअंणासाहेब यांनीं भोर येथील संस्थानिक कैलासवासी नानासाहेब सचीव यांचे पुत्र ( भोर येथील सांप्रतचे संस्थानिक )यांस देण्याचें ठरवून लग्नाचा निश्चय केला. हा लग्नसमारंभ त्याच वर्षाचे माघ महिन्यांत भोर येथें झाला. त्या प्रसंगीं औंद येथील प्रतिनिधि, फलटणचे निंबाळकर, साताऱ्याचे माजी राजाचे ताब्यांतील कित्येक सरदार व पुण्यांतील बरेच सभ्य गृहस्थ असे गेले होते. हा समारंभ बहुत दिवसपर्यंत चालला असून त्यांत रघुनाथराव यानीं बहुत पैसा खर्च केला; परंतु दुर्दैवेंकरून लग्न झाल्या नंतर सुमारें एक महिन्यानें नवरी मुलगी विंचुरास परत जात असतां मार्गांत महामारीचे उपद्रवानें तिला देवाज्ञा झाली. त्या कारणानें विंचूरकर व सचीव यांचीं मनें किती उदास झालीं असतील हें लिहिणें नकोच; वाचकांचे सहज लक्षांत येईल.पुढें सुमारें तीन वर्षांनीं विंचुरकरांबरोबर झालेला शरीरसंबंध पुनः नूतन व्हावा या हेतूनें नानासाहेब सचीव यांनीं कृष्णराव बापूसाहेब विंचूरकर यांचे कन्येबरोबर आपले पुत्राचा द्वितीय विवाह केला.

याच सालीं मुंबई येथील गव्हरनरचे हुद्यावर सर बार्टल् फ्रीयर या नांवाचे साहेब आले. त्यांनीं दरबार करण्याची

---

* आलीकडे फौजदारी कांमचालविण्याचे बाबदींत नवीन कायदा झाला त्यास साधारणतः क्रिमिनल प्रोसिजर कोड असें म्हणतात. त्यांत फुलपावर माजिस्ट्रेटचे ऐवजीं फर्स्ट क्लास माजिस्ट्रेट अशी संज्ञा लिहिली आहे, व तीच संज्ञा हल्लीं चालू आहे.

जुनी वहिवाट मोडून मोघल बादशाहाचे रीतीप्रमाणें दरबार करण्याचा क्रम सुरू केला.

रघुनाथराव यानीं यात्वर्षी कर्नाटक प्रांतांतील तीर्थयात्रेस जाण्याची तयारी केली; परंतु त्यांचे जाण्यास अकल्पित हरकत आली. ती अशी कीं, मुंबई सरकारानें स० १८६३ इ० सालीं देशमुख, देशपांडे वगैरे वतनदार लोकांचे हक्क कायम ठरविण्याकरितां एक कमिशन स्थापून त्यांत माधवरावदादासाहेब विंचूरकर यांस एक मेम्बर नेमिलें; तेव्हां तो नवीन हुद्दा चालविण्यास्तव माधवराव यांस प्रवासास जाणें प्राप्त झालें. त्यामुळें रघुनाथराव यांस आपले संस्थानचा कारभार स्वतः पाहाणें अर्थातच भाग पडलें. मग त्यांनीं आपले बंधू कृष्णरावबापूसाहेब हे ठाणें येथें सदरआमिनीचे हुद्यावर असतां त्यांस कांहीं महिन्यांची रजा घेऊन विंचुरास येण्याविषयीं पत्र लिहिलें. त्याप्रमाणें बापूसाहेब हे एक वर्षाची रजा घेऊन विंचुरास आले. मग रघुनाथराव यानीं आपले संस्थानचा कारभार त्यांचे हवालीं करून आपण स० १८६४ इ० सालीं माहाराष्ट्र देश व कर्नाटक यांतील तीर्थयात्रा करण्यास निघून गेले. सदहू यात्रा करून विंचुरास परत येण्यास त्यांस तेरा चौदा महिने लागले. *

माधवराव दादा साहेब यांचे कायदे कौन्सिलांतील नेमणुकेची दोन वर्षांची मुद्दत भरल्यावर सन १८६४ इ०चे अव्वलीस सरकारानें त्याच हुद्यावर त्यांची पुनः दोन वर्षे पर्यंत नेमणूक केली.

विंचूर संस्थानांत एकंदर ५० गांव असून त्यांपैकीं बहुतेक नाशिक जिल्ह्यांत, कांहीं अहमदनगर जिल्ह्यांत व दोन पुणें जिल्ह्यांत असे आहेत. नाशिक जिल्ह्यापैकीं येवलें हा गांव जरी त्या संस्थानांत सामिल आहे तरी तेथील दिवाणी व फौजदारी अधिकार रघुनाथराव यांजकडे नसून ते सरकार तर्फेचे अमलदार चालवीत होते. ज्याप्रमाणें हे दोन्ही अधिकार त्यांस इतर जा-

* या यात्रेचा वृत्तांत नाशिक येथें वेदशास्त्रसंपन्न रा. रा. गणेशशास्त्री लेले त्रिंबककर यांनीं "यात्राप्रबंध" या नांवानें जो ग्रंथ तयार करून छापिला आहे त्यांत तपसिलवार आढळून येईल.

हागीर गांवांत चालविण्यासाठीं मिळाले होते त्याचप्रमाणें ते येवलें येथेंही चालविण्यास्तव मिळावे म्हणून रघुनाथराव यांनीं याच सुमारास मुंबई सरकारास विनंती केली. त्यावरून ते दोन्ही अधिकार त्यांस द्यावे आणि त्यांचे येवलें येथील वाड्यांत मामलेदार कचेरी आहे ती काढून तो वाडा त्यांचे ताब्यांत द्यावा असा सरकारचा ठराव झाला. त्या बरहुकूम रघुनाथराव यांस माजिस्ट्रेटचा अधिकार मिळून कचेरीचा वाडाही त्यांचे हवालीं करण्यांत आला; परंतु दिवाणी अधिकार देण्यास कायद्याची कांहीं हरकत आल्यावरून तो मिळणें तसेंच राहिलें. मिळालेला माजिस्ट्रेटचा अधिकार चालू करण्यास्तव रघुनाथराव नरसिंगपुराहून विंचुरास परत आले. माधवराव यांची कायदे कौन्सिलांतील दुसऱ्या नेमणुकीची मुद्दत संपून तेही त्यावेळेस विंचुरास आले. कृष्णराव बापूसाहेब हे विंचुरासच होते. नंतर त्रिवर्ग बंधू येवल्यास गेले. तेव्हां तेथील राहणारे लोक व म्युनिसिपालिटीचे कमिशनर यांनीं रघुनाथराव यांचा मोठ्या समारंभानें सत्कार केला. रघुनाथराव यानीं माधवराव यांस येवलें येथील माजिस्ट्रेटच्या कामाची सोंप करून ते विंचुरास परत आले आणि विंचूर येथील कारभार त्यांचे दुसरे बंधु कृष्णराव हे पाहातच होते सबब ते नरसिंगपुरास परत गेले.

याच सालीं सेप्टेंबर महिन्यांत दादासाहेब यांची पत्नी प्रसूत होऊन तिला कन्या झाली. पुढें त्या बाईची प्रकृति वायूनें बिघडून तिला एकाएकीं देवआज्ञा झाली. तिचे मागें तिची तान्ही कन्या तान्हुबाई राहिली. तिचें दादासाहेब यांनीं संगोपन करून ती दाहा वर्षांची झाल्यावर म्हणजे सन १८७४ सालीं त्यानीं तिचें लग्न चांदुरीकर जाहागीरदार हिंगणे यांचे पुत्राबरोबर करून दिलें.

वर लिहिल्याप्रमाणें दादासाहेब यांचें पहिलें कुटुंब निवर्तल्यावर अजमासे एक वर्षानें त्यांनीं मुंबई येथें आपलें दुसरें लग्न केलें. ही वधू बडोदें येथील माजी दिवाण गोविंदराव रोडे यांचे पदरचे

तात्यासाहेब देशपांडे शिरपूरकर यांची कन्या होती. त्या बाईचें नांव दादासाहेब यांनीं सरस्वतीबाई असें ठेविलें.

या लग्नाचे संबंधानें दादासाहेब यानीं मुंबई येथें गिरगांवांत आंग्र्याचे वाडींत एक मोठा सुशोभित मंडप घालविला आणि त्यांत उत्तम प्रकारची रोषनी करवून येथें मुंबईचे गव्हरनर सर हेन्री बार्टल् फ्रीअर यांस एके रात्रीं जाफत दिली. त्या जाफतीस मोठे दर्ज्याचे पुष्कळ दरबारी व लष्करी साहेब यांस ही बोलावणीं झालीं होतीं. सर्व साहेबलोकांनीं खाना खाल्यावर त्यांजपुढें पुष्कळ प्रकारची आतषबाजी ( दारुकाम ) सोडण्यांत आली. नंतर हिंदुनाटककाराचें नाटकही करविण्यांत आलें. शिवाय, बडोद्याहून तेथें कसरतीचा खेळ आला होता तोही त्यांजपुढें करून दाखविण्यांत आला. या जाफती करितां दादासाहेब यांचे विशेष बोलावण्यारून रघुनाथराव हे मुंबईस जाऊन त्या जाफतीचे प्रसंगी साहेबलोक वगैरेच्या सत्काराकरितां त्या मंडपांत हाजिर होते.

वर लिहिल्याप्रमाणें रघुनाथराव हे सन १८६५ इ० सालीं दक्षिण व कर्नाटक यांतील कांहीं यात्रा करून विंचुरास परत आल्यावर त्यांचे कनिष्ट बंधू बापुसाहेब यांची रजा भरली सबब त्यानीं त्यांजकडून अणखीं एक वर्षाची रजा मिळण्यासाठीं आपले वरिष्ट अधिकाऱ्यांस अर्ज करविला. तो अर्ज मंजूर होऊन रजा मिळाल्या नंतर रघुनाथराव आपले कुलस्वामीची सेवा करण्यास्तव नरसिंगपुरास परत गेले.

माधवराव दादासाहेब विंचूरकर यांस सरकारानें सन १८६३ इ० सालीं वतन कमिशनाचे एक मेम्बर नेमिल्याबद्दल वर मजकूर लिहिलाच आहे. तें काम त्यानीं उत्तम प्रकारें बजाविल्यावरून सरकारानें विलायत सरकारचे मंजुरीनें सन १८६५ चे एप्रील महिन्यांत त्यांचे नांव दक्षिणेंतील पहिल्या प्रतीचे बडे लोकांत घातलें.

याच सुमारास इंग्लंडांतील जानसन नांवाचे प्रख्यात चितारी साहेब मुंबईस येऊन तेथून पुण्यास गेले. त्यांचे अंगीं पाहिजे त्या मनुष्याची व पदार्थाची हुबेहुब तसबीर काढण्याचा गुण आहे असा त्यांचा लौकीक ऐकल्यावर रघुनाथराव यांचे मनांत आलें कीं, सर बार्ट्ल फीअर साहेब गव्हरनर हे हिंदुस्थानांत बहुत वर्षे पर्यंत काम करीत राहिले असून ते बहुतेक नेटिव संस्थानिकांशीं दोस्तीनें वागले आहेत; शिवाय त्यांनीं आपले अधिकारांत करितां आले तितके उपकार बहुत लोकांवर केले आहेत; आणि जोंवर ते गव्हनरचे हुद्यार राहातील तोंवर ते प्रायः अणखींही लोकांचीं कल्याणें करितील; याकरितां वर लिहिलेल्या चितान्याकडून त्यांची तसबीर काढवून ती प्रसिद्ध दरबारांत त्यांस नजर करावी, ह्मणजे पुढें ते आपले विलायतेस परत गेल्यावर त्यांस दक्षिणेंतील बडे लोकांचें वारंवार स्मरण होण्यास तें एक साधनच होईल. त्यावरून रघुनाथराव यांनीं दक्षिण व दक्षिणमाहाराष्ट्रदेश यांतील बहुतेक जाहागिरदारांस पत्रें लिहून त्यांत गव्हरनर साहेबांची तसबीर काढवून ती त्यांस दरबारांत मोठ्या समारंभानें सर्वांनीं मिळून नजर करण्याचा माझा विचार आहे या करितां त्या कृत्यास लागणान्या खर्चांत भागीदार होऊन यथाशक्ति वर्गणी देण्याची इच्छा असेल तर तसें लिहून कळवावें म्हणून सूचना केली. सदर्हू जाहागिरदारांकडून अनुकुलतेचे जबाब आल्यावर रघुनाथराव यानीं नेकनामदार फीअर साहेब यांस विनंतीपत्र लिहून त्यांत असें कळविलें कीं, "आंसाहेबांची तसबीर काढवून ती आपल्यास उघड दरबारांत नजर करावी असा माझा व दक्षिणेंतील बहुतेक सरदार लोकांचा हेतु आहे याकरितां या बाबदींत आपली मर्जी काय आहे ती मेहेरबानगीनें कळवावी." सदर्हू पत्राचे जबाबांत साहेब मौसूफ यांनीं ती तसबीर स्वीकारण्याविषयीं आपली खुषी दर्शित केली. मग रघुनाथराव यानीं त्या कामीं आपले कनिष्ट बंधू कृष्णराव

यांची योजना केली. तेव्हां कृष्णराव यानीं दक्षिण व दक्षिण माहाराष्ट्रदेश यांतील सरदारांकडून आलेल्या वर्गण्या एकत्र करून फंड जमा केला आणि ती तसबीर काढण्याबद्दल जॉन्सन साहेबांचे मेहेनतान्याचा * ठराव करून त्यांजकडून ती काढण्याची सुरवात करविली. चितारी साहेब यानीं थोडकेच दिवसांत ती तयार झाली म्हणून रघुनाथराव यांस लिहून कळविलें. मग रघुनाथराव यानीं नेकनामदार फ्रिअर साहेब यांची भेट घेऊन तसबीर तयार झाल्याचा मजकूर त्यांस समक्ष कळविला. पुढें थोडकेच दिवसांनीं ते साहेब सदर्हू तसबीर पाहाण्यास्तव रघुनाथराव यांस बरोबर घेऊन जॉन्सन साहेबांचे बंगल्यावर गेले आणि ती पाहिल्यावर त्यांस मोठी खुषी झाली.

सन १८६६ चे अव्वलीस अक्कलकोटचे राजे मुंबईसरकारचे मर्ते मनानें व शरिरानें अशक्त ठरले, सबब त्यांचा राज्यकारभार चालविण्यास्तव सरकारानें सन मजकूरचे जून महिन्यांत रघुनाथराव यांचे कनिष्ट बंधु माधवरावदादासाहेब यांस " रिजेंट " ( राज्यकारभार चालविणारे ] या हुद्यावर नेमिलें. तेव्हां दादासाहेब हे येवलें येथील माजिस्ट्रेटच्या कामाचा चार्ज आपले वडील बंधू कृष्णराव यांस देउन आपले नवीन हुद्याचा चार्ज घेण्यास्तव अक्कलकोटास गेले.

पुढें नेकनामदार फ्रीअरसाहेब गव्हरनर यानीं ता० २९ आक्टोबर सन १८६६ इ० रोजीं दिवसास बारावर चार वाजतां पुणें येथें बडा दरबार केला. या दरबारास येण्याविषयीं दक्षिण व दक्षिण महाराष्ट्र देशांतील राजे व संस्थानिक व सरदार यांस सरकारचीं पत्रें गेलीं. त्यावरून त्या दरबारास बडे लोक आले ते येणें प्रमाणें:—

* तसबीर काढण्या बद्दलचे फीचा.

१ कोल्हापुरचे माहाराज आपले प्रतिनिधि विशाळगडकर, बावडेकर, अमात्य, वगैरे अष्ट प्रधानांसुद्धां.

२ सातारचे प्रतिनिधि औंधकर.

३ भोरचे सचीव.

४ अक्कलकोटचे राजे रिजेंट माधवराव विठ्ठल विंचूरकर यां सुद्धां.

५ रतनसिंग जाधवराव राजे मालेगांवकर.

६ जवारजे राजे.

७ रामदुर्गकर भावे.

८ मुधोळकर घोरपडे.

९ विंचूरचे चीफ अंणा साहेब व त्यांचे बंधु कृष्णराव बापूसाहेब.

१० पटवर्धन संस्थानिक

१ सांगलीकर.

२ मिरजकर.

३ कुरुंदवाडकर.

४ जमखिंडीकर.

---

४

११ फळटण येथील निंबाळकर.

१२ जतकर डफळे.

१३ दक्षिण व दक्षिण माहाराष्ट्र देश यांतील इतर संस्थानिक.

१४ मुंबई येथील सर खर्सदजी जीजीभाय बाटलीवाले बारोनेट.

१५ डेव्हिड् सासून यांचे जेष्ट चिरंजीव.

१६ पुण्यांतील पुरंदरे वगैरे बडे लोक.

१७ स्टार ऑफ इंडियाचे खिताबवाले सरदार.

१८ कायदे कौन्सिलचे मेम्बर साहेब लोक व नेटिव.

१९ मुंबईतील मोठे अब्रुदार सानसावकार व सौदागर.

२० पुण्यांतील दरोबस्त नेटिव हुद्देदार.

२१ या शिवाय मोठे दरजाचे दरबारी व लष्करी हुद्देदार साहेबलोक व अजमासें २०० मडमा.

२२ सुरत येथील एक आरब जातीचे मुसलमान सरदार.

या दरबारा करितां पुण्यांतील रेल्वे स्टेशनाचे पूर्वेस विक्टोरिया गार्डन नांवाचे बागेचे दक्षिण बाजूस ज्या ठिकाणीं हाल्लीं कौन्सिल हालचा बंगला आहे त्या ठिकाणालगत तंबू दिले होते

आणि त्यांत गव्हरनरसाहेबांकरितां एक मोठें तख्त ठेविलेलें असून इतर बडेसाहेबलोक व मडमा व सरदार लोक यांकरितां कोचें व खुर्च्या ठेविलेल्या होत्या.

नेकनामदार गव्हरनरसाहेब बॉडीगार्डांचे स्वारांनिशीं किती एक मोठमोठाले दरबारी व लष्करी साहेबलोक बरोबर घेऊन वर लिहिलेले दरबारचे तंबूस आले. तेव्हां शिरस्तेप्रमाणें सलामीच्या तोफा झाल्या. गव्हरनरसाहेबांस ताजिम देण्यास्तव कोल्हापुरचे माहाराज, सर्व संस्थानिक व सरदार आपआपल्या ठिकाणीं उभे राहिले. गव्हरनर साहेब तख्तावर बसल्यावर त्यांनीं कोल्हापुरचे माहाराज यांस जवळ बोलावून आपल्या लगत बसविलें; आणि त्यांस मुख्त्यारी दिल्याबद्दल वस्त्रें व अलंकार आणि तरवार देऊन त्यांजबरोबर आलेले प्रतिनिधि व अष्टप्रधान यांस पोषाग दिले. नंतर माहाराजांनीं उभें राहून थोडा वेळपर्यंत इंग्रजींत आभारदर्शक संभाषण केलें, तेणेंकरून गव्हरनर साहेब यांस मोठी खुषी झाली. मग त्यांनीं जवार येथील राजांचे दत्तपुत्र यांस जवारचे गादीचे मालिक असें कबूल करून वस्त्रें व तलवार दिली. राजे यांनीं त्याबद्दल सरकारचे आभार मानिले. नंतर गव्हरनरसाहेब यांनीं रघुनाथराव विठ्ठल ऊर्फ अंणासाहेब विंचूरकर, सुरत येथील मुसलमान सरदार आणि मुंबईंतील सौदागर डेविड सासून यांचे वडील चिरंजीव यांस कंपानियन ऑफ् धि मोस्ट एक्झाल्टेड ऑर्डर ऑफ् धि स्टार ऑफ इन्डिया असा खिताब व त्यासंबंधानें सोनें जडावाचीं निरनिराळीं पदकें दिलीं. हा खिताब देते वेळेस गव्हनरसाहेबांनीं त्रिवर्ग कंपानियन यांजबरोबर पृथक संभाषण केलें, व त्या त्रिवर्गांनीं त्यांस जबाब दिले; परंतु हा वृत्तांत रघुनाथराव अंणासाहेब यांचा आहे सबब गव्हरनरसाहेब यांनीं त्यांजबरोबर जें संभाषण केलें व त्यांनीं जो त्याचा जबाब दिला त्याचा उतारा आम्ही खालीं दाखल करितों.

गव्हरनर साहेब म्हणाले, " रघुनाथराव विठ्ठल! नेक नामदार व्हाइसरॉय व ग्रॅंड मास्टर ऑफ् धि स्टार ऑफ् इन्डिआ यांचे हुकुमावरून कंप्यानियन या पदवीचे चिन्हांसहित ती पदवी देणारी जी मलिकामुआज्जमा त्यांचे सहीची सनद मी तुम्हास मोठ्या संतोषानें देतों. तुम्ही व तुमचे घराण्यानें आपले देशबांधवांस जें चांगलें उदाहरण दाखविलें तें मलिकामुआज्जमा यांस पसंद होऊन तुम्ही ज्या भारदास्त प्रतीचे गृहस्थ आहां त्या प्रतीविषयीं त्यांनीं आपली खुष मर्जी दर्शविली त्याचें एक प्रमाण म्हणून ही त्यांचे मेहेरबानगीची खूण आहे असें तुम्ही व तुमचें घराणें व दक्षिणेंतील संस्थानिक हे मानितील अशी मी उमेद बाळगितों. माजी पेशव्यांचे पदरचे लोकांमध्यें सर्वांत शूर, इमानदार व प्रतिष्ठित म्हणोन तुमचे पूर्वजांचें नांव इतिहासांत प्रसिद्ध आहे. बुडणारे राजघराण्याशीं त्यांनीं जी इमानदारी ठेविली ती केवळ अपूर्व आहे. तत्रापि त्यांनीं मागाहून वर्त्तणूक केली तेणेंकरून आनरेबल् मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन व सर जान मालकम् यांजकडून त्यांस बहुमान मिळाला व त्यांचा किता व त्यांनीं केलेली व्यवस्था येणेंकरूनच तुम्ही व तुमचे बंधू हे आपले नांवास व दरजास योग्य होण्यास तरबेज झालां आहां. तुमची स्वतःची जाहागीर ही चांगले वहिवाटीचा एक नमुना होय. तुमचे दोन बंधूंपैकीं एकजण ( रावबाहादुर कृष्णराव विठ्ठल ) यांनीं नेटिव जडज्य या नात्यानें व दुसरे बंधू ( माधवराव विठ्ठल ) यांनीं मुंबई येथील गव्हरनर यांचे कायदे कौन्सिलांतील आडिशनल मेम्बर या नात्यानें आमचे सरकारची चांगली नौकरी बजाविली आहे. मी मोठ्या उत्कंठेनें अशी आशा करितों कीं, दक्षिणेंतील सरदारांपैकीं बहुतेक तुमचे कित्याबरहुकूम वागतील. आपले स्वतःचे व आपले पदरचे लोकांचे खरे हिताकडे लक्ष्य देऊन ह्या तुमच्या कित्याप्रमाणें ते वर्त्तणूक करतील तर प्रतिष्ट

मिळविण्यास त्यांस अद्यापीही मार्ग खुला आहे असें त्यांनीं मनांत समजावें."

त्याजवर विंचूरचे चीफ् यांनीं जबाव दिला तो,—"नेकनामदार साहेब! कंपानियन ऑफ् धि मोस्ट एक्झाल्टेड आर्डर ऑफ धि स्टार ऑफ इन्डिया या दरजाचे लोकांचे पटांत माझें नांव घालण्यांत परम दयाळू माहाराणीसाहेब यांनीं मला जो बहुमान दिला त्याची योग्यता मी किती मोठी समजतों तें मला पुरतेपणीं बोलून दाखवितां येत नाहीं. मी आंसाहेबांस खातरीनें सांगतों कीं, माहाराणीसाहेबांचे मेहरबानगीचे ह्या चिन्हानें ग्रेट ब्रिटनचे राज्याशीं विंचूरकर घराण्याचे संघट्टण हाल्लीं पूर्वीपेक्षां अधिक दृढ होऊन ज्या सरकाराशीं आमचा आजरोजीं इतक्या प्रतिष्टेनें संबंध झाला आहे त्या सरकारचे ताबेदारींत पूर्वीपेक्षां अधिक परिश्रम करण्यास माझे घराण्याचे पुरुषांस उत्तेजन येईल."

नंतर हाजिर असलेले राजे व संस्थानिक व सरदार यांस अत्तर, गुलाब व विडे वांटण्यांत येऊन दरबार बरखास्त झाला. नंतर गव्हरनरसाहेब वगैरे सर्व साहेबलोक व मडमा आपआपले बंगल्यास परत गेल्या. फक्त पोलिटिकल् एजेंट मात्र मागें राहिले. त्यांनीं आपापले ताब्यांतील राजे, संस्थानिक व सरदार यांस शिष्ट सांप्रदायाप्रमाणें बिदा करून दिलें.

नेक नामदार गव्हरनरसाहेब यांस नजर करण्यास्तव रघुनाथराव वगैरे बडे लोकांनीं त्यांची तसबीर काढवून ती त्यांसदाखविल्याचा मजकूर पूर्वी लिहिलाच आहे. वर सांगितलेला बडा दरबार झाल्याचे दुसरे दिवशीं सदहू तसबीर त्यांस नजर करण्यास्तव त्याच तंबूंत पृथक दरबार करण्याविषयीं वर लिहिलेल्या बडेलोकांमध्यें बेत ठरला. आणि त्या दिवशीं दोन प्रहरां नंतर रघुनाथराव व दक्षिण व दक्षिण माहाराष्ट्र देश यांतील जमलेले बहुतेक संस्थानिक व सरदार यांनीं नेक नामदार गव्हरनरसाहेबांचे गणेशखिंड येथील बंगल्यावर जाऊन त्यांस दरबारचे तंबूस येण्याविषयीं विनंति केली. गव्हरनर साहेबांनीं ती विनंति मान्य केल्यावर सर्व सं-

स्थानिक व सरदार हे आपआपले लवाजम्यानिशीं दरबारचे ठिकाणीं जाण्यास निघाले. त्यांचे मागून गव्हरनरसाहेब बॉडीगार्डाचे स्वारांनिशीं कितीएक मोठे दरजाचे दरबारी व लष्करी साहेब लोक बरोबर घेऊन आपले बंगल्यांतून निघाले. ही एकंदर स्वारी नारायण पेठेंतील लकडी पुलावरून शहरांत आली; आणि सदाशिव पेठचा हौद, नगरकरांचा वाडा, गवत्या मारुती व बुधवारचा वाडा यांवरून आदितवारचे चौकांत गेली; नंतर तेथून रास्त्यांचे वाड्यावरून व पुढें गोसावीपुऱ्यामधून गारपिरावर जाऊन दरबाराचे तंबूस पोंहोंचली. त्या वेळेस शिरस्तेप्रमाणें सालामीच्या तोफा झाल्या. या ठिकाणीं बसण्याची वगैरे सर्व व्यवस्था कृष्णराव बापूसाहेब विंचूरकर यानीं उत्तम प्रकारें ठेविली होती. या दरबारास इतर बहुत साहेबलोक व मडमा आल्या होत्या. शिवाय, मुंबईतील कित्येक बडे लोक व पुण्यांतील सर्व बडे लोक आले होते. दरबारचे तंबूबाहेर शहरांतील इतर लोकांची फार मोठी गर्दी जमली होती. गव्हरनरसाहेबांस ताजिम देण्यास्तव सर्व संस्थानिक व सरदार वगैरे पुढें जाऊन आपापल्या ठिकाणीं उभे राहिले होते; आणि गव्हरनरसाहेब जाऊन तख्तावर बसल्यावर त्या बडेलोकांनीं संकेताप्रमाणें जॉनसनसाहेबांनीं काढिलेली तसबीर मोठ्या आदरानें त्यांस नजर करून तिजबरोबर त्यांस इंग्रजी मानपत्रही दिलें. हें मानपत्र कृष्णराव बापूसाहेब विंचूरकर यानीं वाचिलें. नंतर अत्तर, गुलाब व विडे वाटण्यांत येऊन दरबार बरखास्त झाला. हें झाल्यावर रघुनाथराव वगैरे संस्थानिकांनीं गव्हरनरसाहेब व इतर साहेब लोक यांस विक्टोरिया बागेजवळ नेऊन तेथें एक मंडप तयार केला होता त्यांत खुर्च्यांवर बसविलें. दरबारचे बंगल्यापासून या ठिकाणापर्यंत रोषनी दुतर्फा केलेली होती. नंतर जगंनाथ शंकरशेठ यांचे मार्फत बापूसाहेब विंचूरकर यांनीं जी आतषबाजी ( दारूकाम ) करविली होती ती सोडण्यास आरंभ झाला. ही करमणूक रात्रीं दाहा वाजत तोंपर्यंत झाली. नंतर

सर्व साहेबलोक व मडमा आणि सर्व संस्थानिक वगैरे आप-आपले ठिकाणीं परत गेले.

तसबिरीचे संबंधाचा दरबार झाल्यावर दुसरे दिवशीं वर लिहिलेले संस्थानिक व सरदार एकत्र जमून त्यांनीं असा विचार ठरविला कीं, जॉनसनसाहेब यांकडून लेडीफ्रिअर, कमान्डर इन-चीनफ् व इतर कौन्सिलदार यांच्या निरनिराळ्या तसबीरा काढवून त्या नेकनामदार गव्हरनरसाहेब यांचे तसबिरी जवळ ठेवाव्या. शिवाय, त्याच चितान्याकडून हाजिर असलेला प्रत्येक संस्थानिक व सरदार यानें आपली तसबीर काढवून त्या सर्व तसबिरा गव्हरनरसाहेब यांचे तसबिरीचे आसपास त्याच जागीं ठेवाव्या. पुढें थोडेकच दिवसांनीं हा ठराव त्या बडेलोकांनीं नामदार एलीस साहेब कौन्सिलदार यांचे मार्फत गव्हरनरसाहेब यांचे कानावर घालून त्याप्रमाणें करण्याविषयीं त्यांची परवानगी मागितली. ती मिळाल्यावर त्या वडे लोकांनीं एकंदर तसबिरा काढविण्याचे तजविजी-साठीं एक कमीटी नेमली. तींत नामदार एलीस साहेब हे अध्यक्ष असून बापूसाहेब विंचूरकर व आबासाहेब कुरुंदवाडकर हे मेम्बर होते. ह्या कमिटीनें जॉनसनसाहेब यांजकडून वर लिहिले-ल्या तसबिरा काढविल्या व प्रत्येक संस्थानिक व सरदार यानेंही पूर्व संकेताप्रमाणें आपली तसबीर काढविली. त्या सर्व तसबिरा कौन्सिल हॉलांत नेक नामदार गव्हरनर साहेब यांचे तसबिरी जवळ ठेवण्यांत आल्या. त्यांत रघुनाथराव यांचीही तसबीर आहे हें लिहिणें नकोच.

वर लिहिलेल्या गोष्टी झाल्यावर रघुनाथराव व कृष्णराव विंचूरकर हे उभयतां विंचुरास गेले, आणि त्यांचे कनिष्ट बंधु माधवराव हे अक्कलकोटचे राजांस घेऊन अक्कलकोटास निघून गेले.

सन १८६७ चे आखेरीस आफ्रिका खंडांतील अबिसीनिया (हबष) देशावर इंग्रज सरकारानें स्वारी केली. त्या वेळेस त्यानें हिंदुस्थानांतील किती एक काळीं पलटणें लढाई करितां नेलीं.

त्या संधीस "आम्ही सरकारास यथाशक्ति मदत करण्यास तयार आहों." म्हणून रघुनाथराव यांनीं त्या वेळेचे मुंबईचे गव्हर्नर सर सिमोर वी. सी. फिट्झिराल्ड साहेब यांस पत्र लिहिलें. त्याचे जबाबांत साहेबनौसूफ यांनीं तारीख २० फेब्रुआरी सन १८६८ चें पत्रानें रघुनाथराव यांस आपले आभार कळविले.

पुढें सन १८६८ चे मार्च महिन्यांत माधवराव विंचूरकर हे रजा घेऊन अक्कलकोटाहून विंचुरास आले. तेव्हां त्रिवर्ग बंधूंनीं वडिलार्जित स्थावर मिळकतीच्या आपसांत वांटण्या करण्याचा विचार काढिला; परंतु जम बसेल असें वाटेना. सबब रघुनाथराव यांनीं रावबाहादूर गोपाळराव हरी देशमुख यांस विंचुरास येण्याविषयीं पत्र लिहिलें. त्यावरून देशमुख हे विंचुरास आले. तेव्हां आपली समाईक इनामगांवें, वतनें, मिराशीजमिनी, वाडे व घरें यांची समभाग वांटणी करून देण्यास्तव व सरंजामाचे उत्पन्नावर दर शेंकडा रुपये साडेसात प्रमाणें प्रत्येक कनिष्ट बंधूस रघुनाथराव यांनीं द्यावें असा पूर्वी सरकारचा ठराव झाला होता त्याप्रमाणें सरंजामी गांवांचे उत्पन्नांची एक नक्की बेरीज ठरवून त्या बेरजेचे मानानें कृष्णराव व माधवराव यांस नक्त नेमणुका किंवा त्यांचे ऐवजीं सरंजामगांवांपैकीं गांव नेमून देण्यास्तव त्रिवर्ग बंधूनीं त्यांस लवाद नेमिलें. त्याबरहुकूम त्यांनीं त्रिवर्गाचीं निरनिराळी म्हणणीं समजून घेऊन प्रत्येक म्हणण्याबद्दल पुरावा घेतला; आणि त्रिवर्गांची समजूत घालून सर्वांचें समाधान केल्यावर एक ठराव लिहिला. त्या ठरावाच्या तीन प्रती त्रिवर्ग बंधूनीं आपले वहिवाटी करितां घेतल्या. याप्रमाणें सरंजामी उत्पन्नांची व्यवस्था लागल्यावर रावबाहादूर यांनीं इनामगांव, वतनें, मिराशीजमिनी, वाडे, व घरें यांचीही योग्य वांटणी करून दिली. तेणें करून त्रिवर्ग बंधूचें समाधान होऊन बखेडा मिटला. हें खासगी काम झाल्यावर माधवराव हे अक्कलकोटास परत गेले असते; परंतु वर लिहिलेल्या वांटणीच्या कामास दिरंग लागण्याचा संभव दिसल्यामुळें त्यांनीं

सरकारापाशीं एक वर्षाची रजा मागितली. परंतु ती न मिळाल्यामुळें त्यांस अक्कलकोट येथील रीजेंटचे हुद्याचा राजीनामा देणें भाग पडलें.

राजधर्माचे पुस्तकाविषयीं. माहाभारत ग्रंथांतील शांति पर्वांत भीष्मानीं धर्मराजास आपदधर्म, राजधर्म, मोक्षधर्म व दानधर्म हे चार धर्म सांगितले आहेत. त्यांपैकीं रघुनाथराव यांनीं राजधर्माचें मराठी भाषांतर करून त्याचें एक पृथक पुस्तक छापवून प्रसिद्ध केलें; आणि त्याच्या प्रती सरकारी अधिकारी साहेब, एतद्देशीय विद्वजन व सभ्य गृहस्थ यांस नजर पाठविल्या. त्यावेळेस त्यांनीं मलिका मुअझमा यांचे सरकारचे हिंदुस्थानाबद्दलचे सेक्रेटरी, इंडियाचे व्हाइसराय व गव्हरनर जनरल आणि मुंबईचे गव्हरनर यांसहीं निरनिराळ्या प्रती आदरपूर्वक नजर पाठवून दिल्या. या सर्व प्रतीचा त्या थोर अधिकाऱ्यांनीं स्विकार करून पुढें सन १८७० इ० सालीं त्या पावल्याचे जबाब रघुनाथराव यांस पाठवून त्यांत त्यांची तारीफ केली.

सन १८६९ सालीं विंचूर येथें एक गोष्ट झाली; ती कांहीं महत्वाची वाटल्यामुळें आह्मी ती थोडक्यांत पुढें लिहितों.

बडोद्याचे गायकवाड खंडेराव माहाराज यांचे पदरीं भाऊशिंदे या नांवाचे एक मराठे गृहस्थ होते. ते त्यांचे कृपेंतील असल्यामुळें त्यांनी त्यांस आपले दिवाण करून नाशिक जिल्ह्यापैकीं चांदवड तालुक्यांत त्यांचे वतनाचा गांव देवरगांव हा त्यांस इनाम करून देण्याचा निश्चय केला; परंतु तो गांव त्यांचे अमलांत नसून इंग्रजी अमलांत होता, सबब त्याचे मोबदला आपले राज्यापैकीं तितक्याच आकाराचा एक गांव त्यांनीं इंग्रज सरकारास देऊन तो [ देवरगांव ] शिंदे यास इनाम करून दिला. त्या गांवीं आपले कुटुंबाचीं माणसें राहाण्याकरितां शिंदे यानीं बहुत पैसा खर्च करून इंग्रजी पद्धतीचा एक वाडा बांधिला; आणि त्याचे घरभरणीकरितां ते स्वतः त्या सालीं आपले घरीं आले. तो विधी आटपल्यावर ते रघुनाथराव यांचे भेटी करितां विंचुरास आले. परस्परें

भेटी झाल्यावर त्यांनीं रघुनायराव यांस आपले गांवीं मंडळीनिशी मेजवानीस येण्याचें आमंत्रण केलें. तें स्वीकारून रघुनाथराव हे नेमलेल्या दिवशीं आपले कनिष्ट बंधू बापूसाहेब व दादासाहेब व पदरची दरोबस्त मंडळी यांसहवर्तमान देवरगांवास गेले. भाऊ शिंदे यांनीं त्रिवर्ग बंधूंस सामोरें येऊन सन्मानानें आपले वाड्यांत नेऊन बसविलें. भोजन झाल्यावर शिंदे यांनीं त्रिवर्ग विंचूरकर बंधू यांस आपले हातांनीं अत्तर, गुलाब व पानसुपारी देऊन नंतर त्यांस निरनिराळे उंची पोषाग दिले. शिवाय त्यांनीं रघुनाथराव यांस एक घोडा नजर केला आणि त्यांचे पदरचे मंडळीसही ज्याचे त्याचे योग्यतेप्रमाणें पोषाग दिले. नंतर शिष्टसांप्रदायाप्रमाणें थोडा वेळ परस्परें भाषण झाल्यावर शिंदे यांनीं सर्वांस योग्य रीतीनें बिदा करून दिलें.

पुढें भाऊ शिंदे यांस उलट मेजवानीचें आमंत्रण करण्यास्तव रघुनाथराव यांनीं आपले बंधू बापूसाहेब यांस देवरगांवास पाठविलें. तें आमंत्रण स्विकारून भाऊ शिंदे आपले ताबेदारमंडळीनिशी नेमलेले दिवशीं विंचूरचे वाड्यांत आले. तेथें मराठे दरबारचे रीतीप्रमाणें उंची बिछायत केलेली असून कळवंतिणीचा नाच ही उभा केलेला होता. भोजन झाल्यावर रघुनाथराव यांनीं शिंदे यांस पानसुपारी, अत्तर गुलाब, आणि पोषाग देऊन मागाहून एक मोल्यवान घोडाही बक्षिस दिला. त्याचप्रमाणें बापुसाहेब यांनीं शिद्यांचे मंडळीस ज्याचे त्याचे योग्यते प्रमाणें पानसुपारी, अत्तर गुलाब, आणि पोषाग दिले. नंतर रघुनाथराव यांचा निरोप घेऊन शिंदे लासलगांव स्टेशनावर गेले आणि आगगाडींत बसून बडोद्यास गेले.

बडोद्यास पोंहोचल्यावर शिंदे यांनीं विंचूर येथें आपल्यास झालेल्या सत्काराची खबर खंडेरावमाहाराजगायकवाड यांस कळवून रघुनाथराव यांची मोठी प्रशंसा केली; आणि आपले दरबारांत बापूसाहेब विंचूरकरां सारिखे हुशार गृहस्थ असावे

अशी त्यांस सूचना केल्यावरून, गायकवाड माहाराजांनीं रघुनाथराव यांस खलिता पाठवून बापूसाहेब यांस भेटीस्तव एक वेळा बडोद्यास पाठवून द्यावें असें लिहिलें. त्याप्रमाणें रघुनाथराव यांनीं बापूसाहेबांस माफीक लवाजम्यानिशीं बडोद्यास पाठवून दिलें. बापूसाहेबांचे पेशवाईकरितां खंडेराव माहाराजांनीं भाऊ शिंदे यांस तेथील आगगाडीचे स्टेशनावर पाठवून त्यांचे उतरण्या राहण्याची सर्व व्यवस्था आपले एका बागेंत लावून ठेविली. दुसरे दिवशीं खंडेराव माहाराजांनीं बापूसाहेब यांचीं भेट स्विकारिली. पुढें एक दोन भेटी झाल्यावर माहाराज बापूसाहेबांस म्हणाले कीं, "आपण इंग्रजी कामकाजांत चांगले वाकिफगार आहां: याकरितां या दरबारचे तर्फेनें रेसिडेंटसाहेबांकडे जें काम पडेल तें आपण करीत जावें, म्हणजे आम्हास मोठी मदत होईल." परंतु बापूसाहेबांनीं माहाराजांस मोठ्या चातुर्यानें जबाब दिला. ते म्हणाले, "इंग्रज सरकारचे पदरीं माझी नौकरी बहुत वर्षें झाली असून अणखी एक दोन वर्षें झालीं म्हणजे मला पेनशन् मिळेल; याकरितां माहाराजांचे ह्मणण्याप्रमाणें कर्ण्यास तूर्त सवड नाहीं." त्याजवर खंडेराव माहाराज म्हणाले कीं, "तुह्मी ह्मणतां हें ठीक आहे व त्याप्रमाणें तुह्मी सरकारी नौकरीवर जावें; परंतु तुमचे चिरंजीव नरसिंगराव हे विद्यमान येथें असून तेही इंग्रजी कामांत चांगले वाकिफगार आहेत; याकरितां त्यांस तरी येथें ठेवून द्यावें." हें म्हणणें मात्र बापूसाहेब यांस तात्काळ नाकबूल करितां आलें नाहीं. मग त्यांनीं माहाराजांस असें कळविलें कीं, "हरएक गोष्टींत आह्मीं आजवर आपले वडील बंधूंचे आज्ञेप्रमाणें वागत आलों आहों; याकरितां चिरंजीवांस येथें ठेवण्याचे बाबदींत त्यांस विचारून मागाहून जबाब लिहून कळवूं. तूर्त त्यांस माहाराजांचे मर्जीप्रमाणें येथें ठेवून देतों." त्याप्रमाणें माहाराजांनीं रावसाहेब विंचूरकर यांस तेथें ठेवून घेऊन बापुसाहेब यांस बहुमानानें बि-

दाकरून दिलें. रावसाहेब हे बडोदा येथें असतां तेथील उन्हाळा त्यांस न सोसून ते आजारी पडले, आणि पुढें तेथें राहिल्यानें आपली तबियत फारच बिघडेल असें त्यांस वाटल्यावरून ते महाराजांचे परवानगीनें तेथून निघून आपले वडिलांकडे गेले. पुढें बडोद्याचें हवापाणी आपले तबियतीस मुळींच मानणार नाहीं असें त्यांस वाटल्यावरून ते पुनः बडोद्यास गेले नाहींत.

---

## प्रकरण ३.

मालिका मुआज्ञमा यांचे द्वितीय चिरंजीव ड्यूक आफ् इंडिबरो यांचे मुंबईस आगमन. सन १८६९ इसवीचे आखेरीस ड्युकसाहेब यांची स्वारी हिंदुस्थान पाहाण्याचे इराद्यानें लंडन शहराहून निघाली. या सफरेंत त्यांजबरोबर किती एक लार्ड पदवीचे साहेब लोक आले होते. ड्यूक साहेब आगबोटींतून प्रथम भागिरथीचे किनाऱ्यावर कलकत्ता येथें उतरले. त्या वेळेस हिंदुस्थानांत लार्ड मेयो नांवाचे गव्हरनर जनरल होते. त्यांनीं ड्यूकसाहेबांचा उत्तम प्रकारें सत्कार करून त्यांकरितां बडा दरबार केला. त्या दरबारास उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक राजे, नबाब, व सरदार गेले होते. त्या प्रसंगीं गव्हरनर जनरल यांनीं मलिका मुआज्ञमा यांचे प्रतिनिधी या नात्यानें ड्यूकसाहेबांस "ग्रांड मास्टर आफ् धि मोस्ट एक्झालटेड आर्डर आफ् धि स्टार आफ इंडिया" असा खिताब दिला. शिवाय, त्यांनीं आपले बंगल्यांत रात्रीं मोठी रोषनी करून डयूकसाहेबांस बाल (मडमांचा नाच) व जाफत दिली. नंतर आतषबाजी (दारूकामें) सोडून मोठी मौज दाखविली. त्या प्रसंगीं कलकत्ता शहरांतील सावसावकार व मोठमोठाले सौदागर यानीं ही शहरभर मोठी रोषनी करून जागोजाग कळवंतिणींचे नाच व गाणीं व इतर आनंदप्रदर्शक कृत्यें केलीं. त्याचप्रमाणें त्या शहरांतील म्युनिसिपालिटीनें सडकांवर ठिकठिकाणीं कमानदार दरवाजे उभेकरून त्यांजवर मोठी रोषनी केली.

पुढें सन १८७० इसवीचे अव्वलीस ड्यूक साहेबांची स्वारी कलकत्याहून निघून मुंबई शहरास आली. त्या शुभदायक प्रसंगीं मुंबई शहरांत हीं गव्हरनरसाहेबांनीं ड्यूकसाहेबांचे सत्काराकरितां आपले इलाक्यांतील राजे, संस्थानिक व सरदार यांस आमंत्रणें केल्यावरून ते सर्व मुंबईस जाऊन राहिले. या थोर समाजांत सरकारचे पत्रावरून रघुनाथराव अंणासाहेब व कृष्णराव बापूसाहेब हेही गेले होते. त्यांचे कनिष्ट बंधू माधवराव दादासाहेब हे शीतज्वरानें आजारी असल्यामुळें त्यांचे जाणें झालें नाहीं.

ड्यूकसाहेबांची स्वारी बोरीबंदराचे स्टेशनावर आगगाडींतून उतरण्याचे वेळेस गव्हरनरसाहेब हे कमांडर इन् चीफ, इतर कौन्सिलदार, हायकोर्टाचे चीफ जस्टिस व ज्यडज्य, इतर मोठाले अधिकारावरील साहेब लोक व तेथें येऊन राहिलेले दरोबस्त राजे, संस्थानिक व सरदार यांसहवर्तमान ड्यूकसाहेबांचे सत्कारार्थ उभे राहिले; आणि ते स्टेशनचे सपाट फरसावर उतरतांच त्यांचे आदाब योग्यरीतीनें बजावून त्यांस समारंभानें परळ येथील सरकारी बंगल्यावर नेलें. दुसरे दिवशीं ड्युकसाहेबांची स्वारी गोदी, टांकसाळ व गिरण्यां वगैरे मोठे कारखाने पाहावयास गेली. तिसरे दिवशीं गव्हरनरसाहेबांनीं त्यांस बडा खाना देऊन बाल ( मडमांचा नाच ) दाखविला; आणि सेक्रेटरी हपिसांत ग्यास लाइटची ( वाफेनें जळणाऱ्या दिव्यांची ) रोषनी करून तेथें ड्यूकसाहेबांची स्वारी आल्यावर समुद्र किनाऱ्यावर आतषबाजी ( दारूकामें ) सोडण्यांत आली. या ठिकाणींही शेंकडों साहेब लोक व मडमा व नेटिवराजे, संस्थानिक व सरदार गेले होते. पुढें थोडकेच दिवसांनीं परळ येथील बंगल्यांत लेवी ( धूळभेट ) झाली. त्या वेळेसही गुजराथ, व काठेवाड येथील व दक्षिण व दक्षिणमाहाराष्ट्र देश यांतील समस्त नेटिवराजे, संस्थानिक व सरदार हे हाजिर होते. रघुनाथराव यांनीं तेथें आलेल्या राजांपैकीं खंडेराव माहाराज गायकवाड यांची भेट घेतली. त्यावेळेस माहाराजांनीं रघुनाथराव यांचा परम आदरानें सत्कार केला.

ड्यूकसाहेब यांचे सन्मानार्थ व त्यांचे आगमनार्थें एक स्मारक कृत्य म्हणून शहर पुणें पेंठ बुधवार येथें बुधवारचे वाड्याचे ईशान्येकडील कोंपऱ्यावर एक मोठें घड्याळ स्थापन कर्ण्याविषयीं रघुनाथराव यांनीं मुंबईचे गव्हरनरसाहेबांचे मार्फत ड्यूकसाहेबांचे अनुमत घेऊन तेथें नेटिव जनरल लैब्ररीवर सर्वांचे द्दष्टीस पडेल अशा प्रकारची उंच इमारत बांधून तिजवर तें घड्याळ स्थापन केलें. *

ड्यूकसाहेबांची स्वारी मुंबई येथे असतां तेथे त्यांजकरितां अनेक प्रकारचे उच्छाव झाल्यावर ते इंग्लंडास परत गेले.

याच वेळेस ब्राह्मण जातीचे गतभर्तृकेचा पुनर्विवाह कर्णें शास्त्रसंमत आहे किंवा शास्त्राविरुद्ध आहे याचा निर्णय करण्यास्तव कोल्हापूरचे मटांतील श्रीजगद्गुरू शंकराचार्य यांचें पुणें शहरास आगमन होऊन उभयपक्षांचे शास्त्रीलोकांमध्यें कित्येक दिवस वाद झाला.

या वादाचे वेळेस हाजिर राहाण्यास्तव श्रीजगद्गुरूकडून दक्षिणेतील दरोबस्त ब्राम्हण संस्थानिकांस बोलावणीं झालीं. त्याच प्रमाणें रघुनाथराव हे ड्यूकसाहेबांचे दरबाराकरितां मुंबईस गेले असतां तेथें त्यांस बोलावणें कर्ण्यास्तव श्रीजगद्गुरूकडून एक कारकून आला. रघुनाथराव यांस श्रीजगद्गुरूंचे आज्ञे प्रमाणें पुण्यास जाण्याची मोठी उत्कंठा होती; परंतु त्यांचे कनिष्ट बंधू-माधवराव यांची प्रकृती विंचूर येथें फार बिघडलेली असल्यामुळें त्यांस विंचुरासच परत जाणें भाग पडलें. तथापि, आपले न येण्याचें कारण श्रीजगद्गुरूंस कळविण्यास्तव त्यांनीं शंकर शास्त्री या नांवाचे आपले एका आश्रितास पुण्यास पाठवून दिलें.

सन १८७१ इ. चे डिसेंबर (मार्गशीर्ष) महिन्यांत रघुनाथराव यांची सापत्न मातुश्री लक्ष्मीबाई साहेब यांस देवाज्ञा झाली.

* आलीकडे बुधवारचा वाडा जळून गेला तेव्हां त्या बरोबर तें घड्याळही जळून गेलें.

त्यांचें उत्तरकार्य त्यांचे सख्खे कनिष्ट पुत्र माधवराव यांनीं गोदातीरीं आपले घराण्याचे रिती प्रमाणें केलें. बाईचे सख्खे जेष्ट पुत्र कृष्णराव हे सातारा येथें सदरअमिनीचे हुद्यावर असल्यामुळें आपले मातुश्रीचे अंतकालीं व उत्तरकार्याकरितां त्यांचें येणें झालें नाहीं.

सन १८७२ इ० सालीं हिंदुस्थानचे त्यावेळचे गव्हरनर जनरल लार्ड नार्थब्रुक साहेब यांची स्वारी मुंबई शहरास येण्याचें ठरलें, तेव्हां त्यांचे सत्कारार्थ बंगाल, मद्रास आणि मुंबई या इलाक्यांतील नेटिव माहाराज, राजे, संस्थानिक व सरदार यांस मुंबईस अमुक तारिखेस येण्याविषयीं सरकारीं पत्रें गेल्यावरून ते सर्व तेथें येऊन राहिले.

लार्डसाहेब बोरीबंदराचे स्टेशनावर उतरण्याचे वेळेस मुंबईचे गव्हरनरसाहेब हे कमांडर इन्चीफ व आपले इतर कौन्सिलदार, सेक्रेटरी, हायकोर्टाचे चीफजस्टिस व ज्यडज्य, व मोठ्या दर्जाचे इतर दरबारी व लष्करी साहेब लोक आणि तेथें आलेले दरोबस्त राजे रजवाडे यांसहीत त्या स्टेशनावर उभे राहिले. लार्डसाहेब आगगाडींतून प्लाटफार्मावर उतरतांच सर्वांनीं त्यांचे आदाब योग्य रितीनें बजाविले. नंतर गव्हनरसाहेबांनीं लार्डसाहेबांस घोड्याचे वाहनांत बसवून त्यांचे जिलेबीचे साहेबलोकांसुद्धां त्यांची स्वारी परळ येथील सरकारी बंगल्याकडे चालविली, आणि जमलेले राजेरजवाडे यांस आपापले बंगल्यावर परत जाण्यास परवानगी दिली.

पुढें एकदोन दिवसांनीं लार्डसाहेबांनीं क्यांपाचे मैदानांत दलबादल बादशाही तंबू उभे करवून त्यांत कांहीं संस्थानिक व साहेब लोक यांस स्टाराचे निरनिराळे खिताब देण्यास्तव दरबार केला. त्या दरबारांत स्टारच्या खिताबाचे जे महाराज वगैरे हाजिर होते त्यांपैकीं प्रमुखाची नांवें येणें प्रमाणें:—

१ माहाराज जयाजीराव शिंदे.
२ रिव्याचे माहाराज.
३ भोपालची बेगम.
४ सर सालारजंग, निजाम सरकाचे वजीर.
५ सर रावराजे दिनकरराव राजवाडे.
६ सर टी माधवराव.
७ रघुनाथरावअंणासाहेब विंचूरकर.

लार्डनार्थब्रुकसाहेबांची स्वारी दरबारचे तंबू जवळ येण्याचे सु॰ मारास सर्व माहाराज वगैरे आपापल्या दर्ज्याचीं निरनिराळीं निषाणें आपल्यापुढें चालवून, त्या तंबूपासून कांहीं अंतरावर हद्दीकरितां जो दरवाजा लाविलेला होता त्याजवळ उभे राहिले, आणि लार्डसाहेबांची स्वारी तेथें येतांच त्यांचे आदाब बजावून आपापल्या दर्जाप्रमाणें दरबारचे तंबूकडे चालले. त्या सर्वांचे मागून ग्रांडमास्टर ( लार्डसाहेब ) हे गेले. त्या तंबूंत गेल्यावर सर्व माहाराज वगैरे आपापले खुर्च्यांपुढे उभे राहिले, आणि मागून ग्रांड मास्टर येऊन खुर्चीं वर बसल्यावर मग सर्व बसले.

ज्या साहेब लोकांस स्टाराचे खिताब मिळावयाचे होते त्यांस ते देण्यांत आल्यावर भोपाळच्या बेगमसाहेब यांनीं बुरख्यानिशीं ग्रांडमास्टरांपुढें येऊन त्यांचे आदाब बजाविले. मग ग्रांडमास्टर साहेबांनीं बेगमसाहेबांस जी. सी. एस्. आय. चा खिताब दिला. नंतर बेगमसाहेबांनीं स्टारच्या दर्ज्यांचे माहाराज वगैरे यांपैकीं प्रत्येकापुढें जाऊन इंग्रजी रितीप्रमाणें त्यांचे हातांत आपला हात घालून तो हालविला. [ हें चिन्ह बेगमसाहेब ह्या त्यांच्या रफिक ( सोबातिणी ) झाल्याचें होय. हें झाल्यावर बेगमसाहेब नेमलेल्या खुर्चीवर बसल्या. नंतर थोडचा अवकाशानें सर्व माहाराज वगैरे उठले आणि आपपल्या दर्ज्याप्रमाणें निषाणें पुढें करून वर लिहिलेल्या हद्दीच्या दरवाज्याकडे चालतेझाले. त्यांचे मागून ग्रांडमास्टर निघाले. ही स्वारी त्या दरवाज्या जवळ पोंहोंचतांच माहाराज वगैरेनीं ग्रांडमास्टरांचे योग्य आदाब बजाऊन त्यांस बिदाकरून दिलें आणि सर्व आपापले डेऱ्यांस परत गेले.

दुसरे दिवशीं फक्त मुंबई इलाक्यांतील राजे, संस्थानिक व सरदार यांजकरितांच दरबार झाला. त्यांत मोघल बादशाहांचे दरबाराचे रीतीप्रमाणें समस्त राजे रजवाडे वगैरे यांनीं आपापले योग्यते प्रमाणें लार्ड नार्थब्रुक यांस मोहोरा नजर केल्या. त्यांचा लार्डसाहेबांनीं स्विकारकरून ज्याचे त्याचे योग्यते प्रमाणें सर्वांस खिल्लती * दिल्या.

यादरबारांत विंचूरचे चीफ रघुनाथरावअंणासाहेब यांनीं लार्ड साहेबांस १० दाहा मोहोरा नजर केल्या आणि लार्डसाहेबांनीं त्यांस पांच पार्च्यांची † खिल्लत दिली.

पुढें लार्डसाहेबानीं प्रत्येक माहाराज वगैरे यांस उलट भेट देंण्याविषयीं आपली इच्छा दर्शित केल्यावरून सर्वांनीं आपले बंगल्यांत त्यांचा निरनिराळे वेळेस सत्कार केला. नंतर लार्डसाहेबांनीं सर्व माहाराज वगैरे यांस आपापले राजधानीस परत जाण्यास परवानगी दिली.

रघुनाथरावअंणासाहेब विंचूरास परत जाण्याचे तयारींत असतां, लार्डसाहेबांची स्वारी उत्तर हिंदुस्थानांत परत जाईल त्या वेळेस आपलें जाहागीर गांव मनमाड येथें त्यांचा सत्कार करावा अशी त्यांस इच्छा प्राप्त झाल्यावरून, त्यांनीं ती इच्छा नामदार एलिस साहेब कौन्सिलदार यांचे मार्फत लार्ड साहेबांस कळविली. लार्ड साहेबांनीं ती पूर्ण करण्याचें कबूल केल्यावरून रघुनाथराव यांनीं ताबडतोब मनमाडास जाऊन तेथील आगगाडीचे स्टेशना जवळ लार्डसाहेबांचे सत्काराची सर्व प्रकारें तयारी केली; आणि ज्या तारीखेस व ज्या वेळेस त्या साहेबांची स्वारी मनमाडचे स्टेशनावर यावयाची होती त्या तारीखेस व त्या वेळेस त्यांनीं तेथें पुष्कळ शिष्ट मंडळी निशीं उभें राहून लार्डसाहेब आगगाडींतून खालीं उतरतांच त्यांचे आदाब बजाविले;

* पोषाग.

† वस्त्रांची.

आणि त्यांस सत्काराचे ठिकाणीं नेऊन तेथें त्यांस नानाप्रकारची मिठाई व मेवे नजर केले; आणि मागाहून हारतुरे, गजरे, छड्या, अत्तर, गुलाब आणि विडे दिले. त्या सर्वांचा लार्ड साहेबांनीं खुषमर्जीनें स्विकार केल्यावर त्यांजबरोबरचे साहेबलोकांस अत्तर गुलाब वगैरे वांटण्यांत आलें. लार्डसाहेब या ठिकाणीं आजमासे १८ मिनिटें बसल्या नंतर ते पुनः स्पेशल ट्रेनावर चढून पुढें खांडव्याकडे चालते झाले. नंतर रघुनाथराव विंचुरास परत आले.

माहाराज तुकोजीराव होळकर यांचा मनमाड येथें सत्कार व त्यांस विंचूर येथें मेजवानी. सन १८७३ इसवीचे डिसेंबर महिन्यांत माहाराज तुकोजीराव होळकर यांची स्वारी दक्षिणेंत जेजुरीं वगैरे ठिकाणच्या यात्रा करण्यास्तव इंदुराहून आगगाडींत बसून निघाली. त्यांचा विचार प्रथम मनमाडचे स्टेशनावर उतरून नंतर तेथून सडकेनें नगरावरून जेजुरीस जावें असा होता. ही खबर इंदुराहून अंणासाहेब गरूड नायब दिवाण निसबत होळकर यांनीं रघुनाथराव अंणासाहेब यांस विंचुरास लिहून कळविली. विंचूरकर व होळकर यांचे घराण्यांमध्यें थोरले बाजीरावसाहेब पेशवे यांचे वेळेपासून स्नेहसंबंध चालत आला होता; परंतु दरमियान इंग्रजी अंमल झाल्यामुळें उभय घराणीं दूरत्वावर राहून त्या घराण्यांचे मुख्य यांच्या परस्परें भेटी होण्याचा योग घडून आला नाहीं. त्या कारणानें पूर्वीचा स्हेहसंबंध मजीत झालाहोता. तो पुनः पुर्ववत नूतन व्हावा अशी रघुनाथराव यांचे मनांत बहुत दिवसांपासून इच्छा होती; परंतु तसें घडण्यास अनुकूल अशी संधी मुळींच आली नव्हती. तथापि, हाल्लींचे होळकर तुकोजीराव माराराज हे विंचूर संस्थानचे गांव मनमाड येथें उतरणार होते त्या योगानें पूर्वीचा स्नेहसंबंध पुनः नुतन कर्ण्यास ही संधी चांगली आहे असें रघुनाथराव यांस वाटून, होळकर माहाराजांचा मुक्काम खांडवा येथें असतां, त्यांजकडे त्यांनीं कारकून व शिपांई पाठवून दिले;

आणि त्यांचे सत्काराकरितां मनमाड येथें रेलवे स्टेशनाजवळ एक मोठा मंडप उभारून तेथें आपण स्वतः पदरचे सभ्य मंडळीनिशीं जाऊन राहिले. होळकर माहाराज मनमाडास येण्यापूर्वी एक-दोन दिवस त्यांचे पुष्कळ नौकरलोक पुढें येऊन त्यांनीं तंबू उभे केले आणि त्यांचे स्वारीचे हत्ती, घोडे, वगैरे खडल्या-चे उतरण्याची मिसल लावून त्यांजकरितां सर्व तयारी करू-न ठेविली.

दुसरे दिवशीं रात्रीस सात वाजण्याचे सुमारास होळकरमा-हाराजांची स्वारी आगगाडींतून उतरण्यापूर्वी रघुनाथराव आपले पदरचे प्रतिष्ठीत मंडळीनिशीं स्टेशनावर उभे राहिले. तेथें मा-हाराजांची स्पेशल ट्रेन येऊन ते त्यांतून उतरतांच रघुनाथराव यां-नीं त्यांची आदरपूर्वक भेट घेतली. कांहीं वेळपर्यंत परस्परें आगतस्वागताचें भाषण झाल्यावर रघुनाथराव यांनीं माहाराजांस त्यांचे तळावर पोंहोचतें केलें.

दुसरे दिवशीं तिसरे प्रहराचे सुमारास " भेटीस येतों " म्ह-णून माहाराजांनीं रघुनाथराव यांस निरोप पाठविला. त्यावरून रघुनाथराव यांनीं आपले मंडपांत बिछायत घालून रोषनीही करविली; आणि कळंवतिणींचे ताफ्याचा नाच उभा करवून मा-हाराजांचे सत्काराची सर्व तयारी केली. पांच वाजण्याचे सुमा-रास होळकर माहाराजांची स्वारी पदरचे मानकरी, मुत्सद्दी, आणि दरबारी व लष्करी हुद्देदार यांसह सत्काराचे मंडपांत आली. रघुनाथराव यांनीं पुढें होऊन माहाराजांस मोठ्या आ-दरानें बसवून घेतलें. नंतर नृत्यास व गायनास आरंभ झाला. दरमियान माहाराज व रघुनाथरावअंणासाहेब यांमध्ये बराच वेळ संभाषण झालें. त्यांत पूर्वापार चालत आलेल्या स्नेहसं-बंधाच्या सर्व गोष्टी बोलण्यात येऊन शेवटीं जो स्नेह नूतन झाला आहे तो चिरकाळ चालावा असें परस्परें भाषण झालें. इतक्यांत रघुनाथराव यांचे पदरचे विष्णुपंत छत्रे या नांवाचे ब्राह्मण चाबुक

स्वार हे त्यांचे पागेतील एक शिकविलेल्या घोड्यावर बसून मंडपाचे तोंडाजवळ आले. हे मनुष्य मोठे नामांकित चढाईत असून त्यांनींच तो घोडा शिकवून तयार केला होता. ते त्या घोड्यावर असतांच रघुनाथराव यांचे इषाऱ्या वरून मंडपांत आले. परंतु त्यांनीं तो घोडा इतके हलके कदम टाकीत आणिला कीं त्याचा कदम जरा देखील न वाजतां तो एकाएकी होळकर माहाराजांपुढें येऊन पोंहोंचला. मग विष्णुपंतांनीं माहाराजांस त्या घोड्यावरूनच मुजरा केला. त्या घोड्याची कर्तबगारी पाहून माहाराज फार खुष झाले. मग रघुनाथराव यांनीं माहाराजांस आर्बी जातीची एक घोडी नजर केली. सुमारें २ तास बसल्यावर माहाराजांनीं आपले छावणींत परत जाण्याची इच्छा दर्शित केल्यावरून रघुनाथराव यांनीं त्यांस अत्तर लाविलें आणि त्यांजवर गुलाबपाणी शिंपडून विड्यांचे तबक पुढें केलें. तें माहाराजांनीं आदरपूर्वक स्विकारिलें. मग रघुनाथराव यांनीं माहाराजांस विंचुरास चलण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला. तेव्हां माहाराज बोलले कीं " मीं एव्हडयानेंच तृप्त झालों असें नाहीं. जेजुरीहून परत येतांना मीं विंचुरास येऊन मेजवानी घेईन. " इतकें बोलून माहाराज उठले आणि रघुनाथराव यांनीं त्यांस शिष्टसांप्रदाया प्रमाणें विदाकरून दिलें. दुसरे दिवशीं माहाराजांची स्वारी मनमाडाहून अहमदनगराकडे कूच करून गेली.

पुढें जेजुरीची यात्रा झाल्यावर, होळकर माहाराज पुणें वगैरे ठिकाणीं जाऊन शेवटीं विंचुराजवळ निफाड येथें आले. त्यांचे स्वारांबरोबर रघुनाथराव यांनीं दिलेले कारकून माधवराव भगवत व कांहीं स्वार होते, त्यांजकडून रघुनाथराव यांस माहाराजाचे विंचुरास येण्याचे वेळाची खबर येताच,त्यांनीं त्यांचे सत्काराची आपले सामर्थ्याप्रमाणें उत्तम तयारी केली; आणि त्यांचे पेशवाईकरितां स्वतः अर्ध्या कोसाचे अंतरावर जाऊन त्यांस आपले वा-

ड्यांत आणिलें. माहाराजांची खासा स्वारी उतरण्यास रघुनाथराव यांनीं आपले वाड्याचा दरोबस्त पुढील चौक खालीं करून ठेविला होता. तेथें सर्व खासी मंडळी उतरली. माहाराजांचे लष्कर गांवाबाहेर उत्तरेचे बाजूस कुरणाचे मैदानांत उतरलें असून मानकरी, मुत्सद्दी व हुद्देदार यांस गांवातील निरनिराळे लोकांचे घरांतून जागा दिलेल्या होत्या. रघुनाथराव यांनीं रात्रीस माहाराजांचे भोजन वगैरेचा उत्तम प्रकारें बंदोबस्त ठेविला. दुसरे दिवसीं सकाळीं माहाराजांची स्वारी आपले जन्मभूमीचें गांव करंजी हें पाहाण्यास गेली. मार्गांत नांदुर येथें गोदास्नान करून तेथून ती करंजीस गेली, आणि त्याचे दुसरे दिवसीं अस्तमानीं विंचुरास परत आली. रात्रीस पहिल्या प्रमाणेच सर्व प्रकारचा बंदोबस्त ठेवण्यात आला. दुसरे दिवसीं रघुनाथराव यांनीं माहाराजांस मोठी मेजवानी केली. भोजन झाल्यावर अत्तर, गुलाब, विडे आणि पानसुपारी वाटण्यात आली, त्यावेळेस रघुनाथराव यांनीं माहाराज व त्यांचे उभयतां चिरंजीव यांस उत्तम प्रकारचे पोषाग दिले आणि हत्यारें ही नजर केलीं. त्याचप्रमाणें त्यांनीं माहाराजांचे पदरचे मंडळींस ज्याचे त्याचे योग्यतेप्रमाणें पोषाग दिले. तिकडे त्याच वेळेस सौभाग्यवती जानकीबाईसाहेब विंचूरकर यांनीं माहाराजांचे राण्यांस पैटण्या वगैरे उंची वस्त्रें दिलीं. नंतर माहाराजांची स्वारी तेथून निघाली आणि लासलगांवचे स्टेशनावर स्पेशल टेनात बसून इंदुरास गेली.

मलिका मुआझ्मा यांचे वडील पुत्र युवराज प्रिन्स् आफ वेल्स यांचे हिंदुस्थानांत आगमन. सन १८७५ इसवीचे सेप्टेंबर महिन्यांत युवराज यांची स्वारी इंग्लंड येथें सिरापिज नांवाचे आगबोटीतवसून मुंबईस येण्यास निघाली. ही खबर मुंबईचे गव्हरनर यांस पूर्वीच कळली होती, सबब त्यांनीं मुंबई येथें त्यांचे सत्कारांकरितां उत्तम प्रकारें तयारी केली होती, व त्याचप्रमाणें आपले इलाक्यातील तमाम राजे, संस्थानिक व सरदार यांस युवराजांची स्वारी मुंबईस येण्यापूर्वी

तेथें येऊन राहण्याविषयीं पोलिटिकल एजेंट यांचे मार्फत हुकूम पाठविले होते. त्याप्रमाणें दरोबस्त राजे, संस्थानिक व सरदार हे त्या शहरास येऊन निरनिराळ्या बंगल्यांत आपापले लवाजम्यानिशीं राहिले. या प्रसंगीं विंचूरचे चीफ रघुनाथरावअंणासाहेब यांस ही पुण्याचे एजेंट साहेबांचे मार्फत सरकारचा हुकूम आल्यावरून ते मुंबईस जाऊन गिरगांवांत राहिले.

युवराज यांची स्वारी मुंबई जवळ येऊन पोहोंचल्यावर, त्यांचे पेशवाई करितां अमुक तारिखेस व अमुक वेळेस अमुक बंदरावर हाजिर होण्याविषयीं गव्हरनर साहेबांकडून जमलेले समस्त राजे, संस्थानिक आणि सरदार यांस सूचना झाल्या. त्याप्रमाणें अपालो [ पालव्याचे ] बंदरावर समाज जमला. त्या शिवाय पुष्कळ साहेब लोक व मडमा ही तेथें येऊन खुर्च्यांवर बसल्या होत्या. कांहीं अवकाशानें गव्हरनर साहेब हे कमांडर-इन-चीफ व दरोबस्त इतर कौन्सिलदार व सेक्रेटरी, हायकोर्टाचे चीफजस्टिस व प्युइन्य व मुंबईतील इतरखात्यांचे मोठ्या दर्ज्याचे अधिकारीसाहेब यांस बरोबर घेऊन तेथें आले. त्याजवर थोडक्या वेळानें प्रीन्स साहेबांची स्वारी आगबोटींतून एका नांवेंत उतरून त्या बंदरावर आली. तेव्हां सलामीच्या तोफा सुटल्या. गव्हरनर साहेब पुढें होऊन त्यांनीं युवराज यांचे योग्य रीतीनें आदाब बजाविले. युवराज यांजबरोबर कित्येक प्रीन्स, ड्यूक व इतर थोर पदव्यांचे साहेबलोक होते. शिवाय, त्यांची सर्व प्रकारची व्यवस्था ठेवण्यास्तव मुंबईचे माजी गव्हरनर सर बार्टल फ्रीयर हे ही आले होते. युवराज पुढें चालले तेव्हां सडकेचे दोन्ही बाजूंस जे साहेबलोक व नेटिव राजे, संस्थानिक व सरदार उभे होते त्यांस ओळखून फ्रीयर साहेब हे युवराज यांस त्यांची नांवें सांगत गेले आणि त्यांनीं केलेली कुर्निष* स्विकारून युवराज हे त्यांस सलाम करीत गेले. याप्रमाणें युवराज सुमारें दोनशें कदम

* मुजरा.

पायांनीं चालत गेल्यावर ते घोडयांचे गाडींत बसून पुढें चालते झाले. त्यांजबरोबर त्यांचे जिलेबीचे साहेबलोक हे निरनिराळया गाडयांतून बसून चालते झाले. नंतर सर्व नेटिव राजे, संस्थानिक व सरदार हेही आपापल्या गाडयांतून बसून आपापल्या लवाजम्यानिशीं आपापल्या बंगल्यांस गेले.

वर लिहिलेल्या स्वारींत युवराज यांची गाडी पुढें असून तीचे दोन्हीं बाजूंस त्यांबरोबर इंग्लंडाहून आलेल्या बडे लोकांच्या गाडया होत्या. त्यांचे मागून गव्हरनर, कमांडर-इन-चीफ व इतर कौन्सिलदार, आणि हाय कोर्टाचे चीफ जस्टिस व ज्यडज्य यांच्या गाडया अनुक्रमानें होत्या. युवराज यांचे गाडीपुढें गव्हरनर साहेबांचे बाडीगार्ड ( खासबारदार स्वार ) आणि त्यांचे सन्मानार्थ जे सरकारी स्वार व पायदळ पलटन आणि बाजेवाले आले होते ते चालत होते. ही स्वारी क्यांपाचे मैदानांतून काळकादेवीचा रस्ता व भेंडीबाजार यांमधून परळ येथील सरकारी बंगल्यावर गेली. तेथें गव्हरनर व कमांडर-इन-चीफ यांनीं युवराज यांस उतरून घेऊन त्या बंगल्यांत नेलें. त्यांजबरोबर विलायतेहून आलेले सर्व बडेलोक हे त्याच बंगल्यांत शिरले, नंतर मुंबई येथील त्या स्वारीबरोबर गेलेले दरोबस्त साहेबलोक आपापले बंगल्यांस परत गेले.

दुसरे दिवशीं समस्तराजे, संस्थानिक व सरदार यांनीं युवराज यांस आपापले दरजाप्रमाणें अमोलीक वस्तू नजर केल्या. त्यांचा युवराजांनीं नेमलेल्या कमिटीचे मार्फत स्विकार केला.

युवराज यांचा मुक्काम मुंबई येथें सातआठ दिवस झाला. ज्याज्या ठिकाणीं त्यांची स्वारी गेली व ज्याज्या गोष्टी त्यांनीं केल्या त्यासंबंधीं हकीकत लिहिली तर एक मोठा ग्रंथच होइल, सबब ती येथें न लिहितां त्यातारिखांचे वर्तमान पत्रांतून पाहाण्याविषयीं आम्हीं वाचकांस विनंती करितो.

विंचुरचे चीफ रघुनाथरावअंणासाहेब यांनीं संस्कृत भाषेत प-

ध्यात्मक मानपत्र तयार करून एल्फिन्स्टन कालेंजांतील संस्कृताचे प्रोफेसर मिस्तर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांजकडून त्याचें इंग्रजी भाषांतर करविलें; आणि तें एकंदर संस्कृत व इंग्रजी मानपत्र छापवून त्याची एक छापील प्रत युवराज यांस आदरपूर्वक नजर केली. तिचा युवराज यांनीं संतोषानें स्विकार केला.

मागाहून कांहीं दिवसांनीं युवराज यांजकडून रघुनाथरावभंणासाहेब यांस एकपत्रासह चांदीचे एक मेडल ( पदक ) आलें. त्यावर युवराज यांचा चेहेरा काढलेला असून " रघुनाथराव विठ्ठल विंचूरचेचीफ यांस बक्षिस दिलें अस्से. " असे शद्ब वठविलेले होते.

मुंबई येथें रघुनाथराव यांचा मुक्काम असतां, त्या दरबारास आलेल्या दक्षिणेतील बहुतेक बडेलोकांच्या व त्यांच्या भेटी झाल्या. विंचुरास परत जाण्याचे सुमारास त्यांनीं मंगलदास नथुभाई यांचे गिरगांव येथील वाडींतील बंगल्यांत निजामसरकारचे वजीर सर सालारजंग मुख्त्यार उल-मुल्क्-बाहादूर यांस पानसुपारीस बोलाविले. त्याप्रसंगीं बराच वेळ पर्यंत फुरसतीने शिष्ट सांप्रदाया प्रमाणें परस्पर भाषण झाल्याने पुर्वीचा स्नेहसंबंध आधिक दृढ झाला. नंतर रघुनाथराव लौकरच विंचुरास परत आलें

पुढें युवराज यांची स्वारी बडोद्यास गेली आणि मुंबई येथें माघारी आल्यावर लागलीच रेलवेनें कलकत्यास गेली. तेथून बनारस, अलहाबाद, वगैरे ठिकाणें पाहातपाहात रेलवेनें इंदुरचे रेसिडेन्सीस परत आली; आणि शेवटीं मुंबईस परत येऊन तेथून आगबोटीनें स्वदेशास परत गेली.

सन १८७६ इसवी सालीं माहाराष्ट्र वगैरे दक्षिणहिंदुस्थानांतील सर्व प्रदेशांत पर्जन्य न पडल्यामुळें मोठा भयंकर दुष्काळ पडला. त्यामुळें अन्नपाण्यावांचून हजारों मनुष्यें मरूं लागलीं. या सार्वजनिक संकटाचे प्रसंगीं इंग्रज सरकारानें उदारमनानें लाखों अनाथ लोकांस धर्मार्थ पोशिलें; जागोंजाग मजुरिचीं कामें काढिलीं आणि गरीब लोकांस कामांस लावून त्यांचें पोटास दि-

लें. त्याचप्रमाणें राजेरजवाडे व सावकार लोक यांनीं ही अन्न-सत्रें घालून हजारों गरीब लोकांस त्या संकटांतून मुक्त केलें. रघुनाथराव यांनीं ही आपले जाहागीर गांवांतील शेतकरी लोकांस धान्य पुरवून त्यांचा व त्यांचे कुटुंबांचा बचाव केला. शिवाय, त्यांनीं विंचूर येथें दररोज अजमासें ५०० अनाथ मनुष्यांकरितां बाजरीच्या भाकऱ्या व पिठलें किंवा भाजी किंवा आंबटी तयार करवून प्रत्येक मोठ्या मनुष्यास ३ पासून ५ पर्यंत भाकऱ्या व त्या सोबत खाण्याचा पातळ पदार्थ, व लाहान मुलास २ भाकऱ्या व त्या मानानें सोबतचा पातळ पदार्थ, याप्रमाणें वांटविल्या. हा क्रम सरासरी सवावर्ष चालला. शिवाय, इंदूरचे माहाराज होळकर यांनीं रघुनाथराव यांजकडे १५०० रुपये त्याच प्रकारच्या धर्म कृत्याकरितां पाठविले होते. त्यांचाही रघुनाथराव यांनीं वर लिहिल्या प्रकारेंच व्यय केला.

याशिवाय, रघुनाथराव यांनीं आपले कुलस्वामीचें स्थान निरानरसिंहपूर येथेंही वरलिहिल्याप्रमाणेंच ज्वारीच्या भाकऱ्या व त्या सोबत खाण्याचा पातळ पदार्थ करवून तो गरीब लोकांस कित्येक महिने पर्यंत वांटविला. शिवाय, इंदूरचे माहाराज होळकर यांजकडून त्या क्षेत्रांत खर्च करण्यास्तव रुपये ५०० आले होते. त्यांचा ही रघुनाथराव यांनीं गरीबगुरिबांचे गुजाऱ्यास्तव उत्तम प्रकारें व्यय केला.

याचसालीं मलिका मुआज्झमा यांनीं "केसरे हिंद" ह्मणजे हिंदुस्थानची बादशाहीण ही पदवी धारण केली आणि ती हिंदुस्थानांतील दरोबस्त माहाराज, राजे, नबाब, संस्थानिक, सरदार व सर्व साधारण लोक यांस जाहिर करण्यास्तव त्यांचे व्हाइसराय [ प्रतिनिधि ] व गव्हरनर जनरल लार्ड लिटन साहेब यांनीं संपूर्ण हिंदुस्थानची प्राचीन राजधानी दिल्ली शहर येथें मैदानांत मोठमोठाले तंबू उभे करून त्यांत तारीख १ जान्युआरी सन १८७७ इसवी रोजीं बडा दरबार केला.

त्याचप्रमाणें सदर्हू तारिखेस संपूर्ण हिंदुस्थानचे इंग्रजी राज्यांतील राजधानींचीं शहरें म्हणजे कलकत्ता, मद्रास, मुंबई, आग्रा, लाहोर, कराची, जबलपूर, रंगून, वगैरे शहरांत व प्रत्येक इलाख्यांतील जिल्ह्यांचे शहरांत पोलिटिकल कामगार अगर जिल्ह्याचे कलेक्टर अगर इतर अधिकारी यांनीं आपापले अमलाचे हद्दींतील सरदार, जाहागीरदार, विद्वज्जन, प्रतिष्ठितगृहस्थ वगैरे लोकांस बोलावणीं करून निरनिराळे दरबार केले आणि त्यांत संभाषण करून मलिकामुआझमा यांनीं सदर्हू पदवी धारण केल्याचा मजकूर सर्व आबालवृद्धांस जाहीर केला.

दिल्ली येथील दरबारास येण्याविषयीं दक्षिणेंतील व दक्षिण महाराष्ट्र देशांतील कांहीं संस्थानिकांस दुष्काळाचे कारणानें बोलावणीं झालीं नव्हतीं. त्याचप्रमाणें रघुनाथरावअण्णासाहेब विंचूरकर यांसही बोलावणें आलें नाहीं. परंतु पुण्याचे एजंट यांनीं पुण्यास दरबार केला त्यास व नाशीकचे त्या वेळचे कलेक्टर मि० अर्स्किन यांनीं नाशीक येथें सरकारी वाड्यांत दरबार केला त्यास येण्याविषयीं त्यांस व त्यांचे कनिष्ठ बंधू माधवराव दादासाहेब यांस पत्रें आलीं; परंतु एजंट साहेबांचे पुणें येथील दरबारास न जातां ते उभयतां बंधू पदरचे पुष्कळ मंडळीनिशीं नाशिकास गेले. तेव्हां त्यांचे पेशवाईस प्रिस्काटसाहिब असिस्टेन्ट पोलिस सुपरिंटेन्डन्ट, कलेक्टरचे चिटणीस, नाशीकचे मामलेदार व फौजदार हे नाशीक येथील पोलिसचे स्वार व शिपाई यांनिशीं येऊन त्यांनीं त्यांस बहुमानानें उतरण्याचे वाड्यांत नेऊन पोंहोंचविलें. दुसरे दिवशीं रघुनाथराव व माधवराव हे दरबारचे नेमलेले वेळेस सरकारी वाड्यांत गेले. तेथें नाशिक जिल्ह्यांतील छोटे जाहागीरदार, प्रतिष्ठित गृहस्थ व विद्वज्जन बरेच जमले होते. मि० अर्स्किन साहेब यांनीं उभयतां विंचूरकर बंधूंस जमलेल्या समुदायामध्यें अग्रस्थानीं बसविलें. नंतर कांहीं अवकाशानें त्या साहेबांनीं उभें राहून मलिकामुआझमा यांनीं "केसरे हिंद"

ची पदवी धारण केल्याबद्दल इंग्रजींत निबंध वाचिला. त्याचें स्पष्टीकरण मराठींत होण्यास्तव त्या वेळेस नाशीकचे मामलेदार रावसाहेब काशीनाथ महादेव थत्ते यांनीं उभें राहून मराठींत सुरस संभाषण केलें. नंतर अत्तर, गुलाब व विडे वाटण्यांत येऊन दरबार बरखास्त झाला. या दरबारांत पोलिसचे कांहीं सुभेदारांस " खानबाहादूर ,, वगैरे खिताब देण्यांत आले.

मलिकामुअज्झमा यांनीं सदहू पदवी धारण केल्याबद्दल त्यांस मुबारकबादी देण्यास्तव* रघुनाथराव यांनीं राजेबाहादर यांचे बागेंतील बंगल्यांत तारीख ३ माहे जान्युआरी सन १८७७ इसवी रोजीं सायंकाळीं दरबार केला. त्या दरबारास येण्याकरतां मि० अर्स्किन वगैरे साहेब लोकांस त्यानीं तारीख २ माहे हाल रोजीं विनंतीपत्रें पाठविलीं होतीं. सायंकाळीं सदहू बंगल्यांत रोषनी करून मराठी दरबारचे वहिवाटीप्रमाणें कळवंतीणीचे ताफ्याचा नाच ही उभा करण्यांत आला होता. तेथें मि० अर्स्किन व त्यांचे असिस्टेंट व जाइन्ट ज्यडज्य व इतर कित्येक साहेबलोक व मडमा येऊन खुर्च्यांवर बसल्या. त्या शिवाय नाशिक येथील कित्येक सभ्य गृहस्थ ही तेथें आले होते. रघुनाथराव आंणासाहेब यांणीं मि० अर्स्किन हे जिल्ह्याचे मुख्य कामगार म्हणून त्यांजपुढें आपले क्लार्काकडून इंग्रजींत छापिलेलें मानपत्र वाचवून नंतर तें आदरपूर्वक त्यांचे हातांत दिलें. मग माधवराव दादासाहेब यांनीं उभें राहून या दरबारचे संबंधानें मराठींत कांहीं मिनिटें संभाषण केलें. नंतर अत्तर, गुलाब वगैरे वाटण्यांत येऊन दरबार बरखास्त झाला. सर्व साहेबलोक व मडमा रघुनाथराव यांची रजा घेऊन परत जाण्यास निघाल्या तेव्हां मैदानांत पुष्कळ दारूकाम सोडण्यांत आलें. तेणेंकरून कांहीं वेळ पर्यंत सर्वांचें मनोरंजन झालें.

रघुनाथराव व माधवराव आपले डेऱ्यास परत आल्यानंतर त्यांस एक दुःखकारक वर्तमान कळलें. तेणेंकरून ते कांहीं

* सद्दानंद कळविण्यास्तव.

येळ स्तब्ध बसले आणि दुसरे दिवशीं ते पदरचे मंडळीनिशीं ताबडतोब विंचुरास परत आले. हें वर्तमान असें होतें कीं, त्यांचे बंधू कृष्णराव बापूसाहेब यांची द्वितीय पत्नी सौभाग्यवती बयाबाईसाहेब यांस सातारा येथें नुकतीच देवाज्ञा झाली होती.

सन १८७८ इसवीचे आक्टोबर महिन्यांत रघुनाथराव यांची स्वारी पुण्यांत असतां विंचूर येथें माधवराव दादासाहेब यांची द्वितीय पत्नी सौभाग्यवती सरस्वतीबाईसाहेब यांस देवाज्ञा झाली. या बाई अल्पवयी असून परलोकवासी झाल्यामुळें दादासाहेब यांस किती दुःख झालें असेल त्याचा अजमासच करितां येत नाहीं तथापि त्या बाईस दोन पुत्र व दोन कन्या होत्या त्यामुळें दादासाहेब हे आपले मनास धैर्य देऊन पुढें चिरंजीवांचा प्रपंच जमविण्याची आशा धरून राहिले. त्या दोन पुत्रांचीं नांवें येणेंप्रमाणेः—

१ गणपतराव आबासाहेब.

२ लक्ष्मणराव आपासाहेब.

सौभाग्यवति सरस्वति बाईसाहेब यांचे ह्यातींत दादासाहेब यांनीं सन१८७८ इसवीचे फेब्रुवारी महिन्यांत आबासाहेब यांचें मौंजिबंधन केलें होतें, आणि त्या हक्क झाल्यावर सन १८७९ चे मे महिन्यांत इंदूर येथील होळकर माहाराजांचे फडनवीस बळवंतराव यांचे जेष्ट कन्येबरोबर त्यांचा विवाह केला.

पुढें सन१८८१ इसवीचे मार्च महिन्यांत दादासाहेब यांनीं आपले द्वितीय चिरंजीव आपासाहेब यांचें मौंजिबंधन केलें आणि पुढें सन१८८२ चे मेमहिन्यांत इंदूर येथील होळकर माहाराज यांचे नायब दिवाण आंणासाहेब गरूड यांचे नातीबरोबर त्यांचा विवाह केला.

कृष्णरावबापूसाहेब हे अहमदनगर येथें फर्स्टक्लास सेकंड जेड ज्यडज्याचे हुद्यावर असतां सन१८७९ सालचे आगष्ट महिन्याचे आखेरीस त्यांचे शरीराचे डावे बाजूस एकाएकी अर्धांगवायु होऊन त्यांची प्रकृति अतीशय बिघडली. त्या आजाराच एव-

चार करण्यास्तव त्यांनीं पुण्यास जाऊन तेथें इंग्रजी डाकटराकडून सतत दोन महिने पर्यंत पुष्कळ उपचार करविले; परंतु आराम न होतां शेवटीं सेपटेंबर महिन्यांत त्यांस देवाज्ञा झाली.

हें खेदकारक वर्तमान रघुनाथराव यांस विंचूरयेथें कळतांच ते पुण्यास निघून गेले आणि बापूसाहेबांचे त्रिवर्ग चिरंजीव तेथें होते त्यांचें त्यांनीं पुष्कळ रीतीनें शांतवन करून बापूसाहेब यांची उत्तरक्रिया गोदा तिरीं व्हावी या हेतूनें त्यांनीं त्यांस आपलें इनामगांव सायखेडें येथें आणिलें आणि त्यांजकडून ती उत्तरक्रिया करविल्यानंतर त्यांस विंचूरास नेलें.

मरहूम बापूसाहेब यांची प्रथम लग्नाची स्त्री पंढरपूरकरकानडे सावकार यांची कन्या असून त्या बाईपासून त्यांस तीन पुत्र व दोन कन्या झाल्या. नंतर ती बाई हक्क झाली. त्या पुत्रांचीं नांवें येणें प्रमाणें:—

१ भगवंतराव उर्फ बाळासाहेब.

२ नरसिंगराव उर्फ रावसाहेब.

३ विठ्ठलराव उर्फ नानासाहेब.

---

या तीन पुत्रांपैकीं वडील पुत्र बाळासाहेब हे सन १८६७ इसवी सालीं नाशीक येथें हक्क झाले. द्वितीय पुत्र रावसाहेब हे हालीं निझामाचे मुलकांत बीड येथें अकटींग अव्वल तालुकदार असून त्यांस दरमाहा रुपये ६०० प्रमाणें पगार मिळत आहे. तिसरे पुत्र नानासाहेब हे तीन दिवसांचे वयाचे असतां त्यांची मातुश्री निर्वतली. नंतर रघुनाथराव यानीं त्यांचें पालन पोषण करून त्यांस वाढविलें आणि त्यांचें मौंजिबंधन करून लग्नही करून दिलें. पुढें ते रघुनाथराव यांजपासून निघून आपले बंधू रावसाहेब यांजकडे रोजगार मिळविण्याचे इरायानें गेले; परंतु त्यांस नशीबाची अनकुलता नसल्यामुळें ते अद्यापपर्यंत बेकारच आहेत.

बापूसाहेब यांचें पहिलें कुटुंब निर्वतल्यावर त्यांनीं दुसरा विवाह पंढरपूर येथील जवळेकर आडनांवाचे गृहस्थ यांचे कन्येबरोबर

केला. या बाईपासून त्यांस एक पुत्र झाला. त्यास रामराव उर्फ बाळासाहेब असें ह्मणतात. बाळासाहेब यांचें वय सुमारें १७ वर्षांचें असून हाल्लीं ते पुणें येथें विद्याभ्यास करीत आहेत. बापूसाहेब यांची ही पत्नि निवर्तल्याचा मजकूर आम्ही वर लिहिलाच आहे.

सन १८८१ इसवी सालीं इंदूरचे माहाराज होळकर यांचें विंचूर येथें पुनरागमन. सन १८७३ इसवीचे दिसेंबर महिन्यांत माहाराज तुकोजीराव होळकर यांची स्वारी विंचूर येथें आल्यानें विंचूरकर व होळकर यांच्या घराण्यांमधील मजित झालेला स्नेहसंबंध पुनः नूतन झाला असें आम्ही वर लिहिलेंच आहे. पुढें सन १८८१ इ० चे जान्युआरी महिन्यांत होळकर माहाराजांची स्वारी जेजुरी वगैरे देवस्थानांचे यात्रेकरितां दक्षिणेंत येण्यास निघाली तेव्हां त्यांनीं रघुनाथरावअंणासाहेब यांस आपला विंचुरास भेटीस येण्याचा मानस कळविला. तेणें करून रघुनाथराव यांस आनंद होऊन त्यांनीं आपले कनिष्ट बंधू माधवराव दादासाहेब यांस माहाराजांस सामोरें म्हणून दोनप्रहरीं मनमाडास पाठवून दिलें. तेथें तिसरे प्रहरीं स्पेशलट्रेनीनें माहाराजांची स्वारी येऊन उतरल्यावर दादासाहेब यांनीं त्यांची भेट घेऊन "मी आपल्यास विंचुरास नेण्याकरितां आलों आहें" असें त्यांस कळविलें. माहाराजांनी दादासाहेब यांची खातरकरून त्यांस असें सांगितलें कीं, "विंचूर हें आम्हांस परस्थल असें वाटत नसून अंणासाहेब यांचे भेटीकरितां तेथें आमची येण्याची तयारी आहेच. याकरितां तुम्ही विंचुरास परत जावें. आम्ही मागाहून येतच आहों." मग दादासाहेब यांनीं विंचुरास परत येऊन माहाराजांचे सत्काराची सर्व प्रकारें तयारी करविली. अस्तमानचे सुमारास विंचूरचे वाड्यांत माहाराजांची स्वारी जवळ आल्याची खबर आली. त्यावेळेस रघुनाथराव हे अग्निहोत्राचा सायंकाळचा होम देत होते. सबब दादासाहेब यांनीं माहाराजांस सामोरें जाऊन मोठ्या आदरानें त्यांस वा-

च्यांत आणिलें. कांहीं अवकाशानें माहाराजांनीं होमशाळेचे द्वारापुढें रघुनाथराव यांची भेट घेतली तेव्हां शिष्टसंप्रदायाप्रमाणें कांहींवेळ परस्परें भाषण झालें. त्याचप्रमाणें राणीसाहेब यांची स्वारी घेऊन पोहोंचतांच श्रीमंत सौभाग्यवती जानकीबाईसाहेब विंचूरकर यांनीं त्यांस वाड्याचे दरवाज्यापर्यंत सामोरी जाऊन त्यांचे राहण्याकरितां जी माडी नेमिलेली होती तेथें त्यांस पोहोंचविलें.

दुसरे दिवशीं अंणासाहेब यांनीं माहाराजांस मेजवानी केली. माहाराजांनीं विंचुरापासून पांच कोसांवर आपले जन्मभूमीचें गांव करंजी येथें एक नवीन इमारत तयार करविली असून ती पाहाण्याकरितां त्याच दिवशीं तिसरे प्रहरीं त्यांची स्वारी निघाली, आणि विंचुरास परत न येतां परभारें निफाड गांवावरून चांदवडास जाणार होती सबब अंणासाहेब यांनीं त्यांस व त्यांचे कनिष्ट चिरंजीव जे त्यांजबरोबर होते त्यांस पोषाग देण्यास आणविले; परंतु " आम्ही परस्थळीं आलों नसून केवळ प्रेमभावानें आपल्यास भेटण्यास्तव मुक्काम आलों आहों, सबब पोषागांची जरूर नाहीं. " असें माहाराजानीं त्यांस सांगून ते पोषाग स्विकारिले नाहींत. तथापि " आपले प्रेमाचे आगमनाचें स्मरण राहाण्यास्तव आपण आमचे हातांनीं कांहीं तरी स्विकारिलेंच पाहिजे. " असें अंणासाहेब यांनीं बोलून मोठ्या आदरानें माहाराजांस आपले पागेंतील एक उत्तम घोडा नजर केला. तो माहाराजांनीं अंणासाहेब यांची मर्जी न मोडावी म्हणून स्विकारिला. नंतर माहाराजांची स्वारी करंजीस गेली.

पुढें दोन दिवसांनीं माहाराजांचे जेष्ट चिरंजीव बाळासाहेब यांची स्वारी करंजीस जाण्याकरितां लासलगांव स्टेशनावर आली. तेव्हां अंणासाहेब यांनीं आपले कनिष्टबंधु दादासाहेब यांस स्टेशनावर पाठवून त्यांस बहुमानानें आपले विंचूर येथील वाड्यांत आणिलें. एक दोन दि-

बसांनीं ते करंजीस जाऊन विंचुरास परत आल्यावर इंदुरास जाण्यास तयार झाले, तेव्हां अंणासाहेब यांनीं त्यांस उंची पोषाग देऊन शिष्टसांप्रदायाप्रमाणें बिदा करून दिलें.

सन १८८० इसवीचे फेब्रुआरी महिन्यांत [ माघ शुद्ध १३ या दिवशीं ] रघुनाथराव अंणासाहेब यांनीं अग्निहोत्र ग्रहण करून पुढें एकवर्ष पर्यंत विंचूर मामाचें सीमोल्लंघन न करितां आपले राहाते वाड्यांत सतत अग्न्यार्चन केलेंहोतें. होळकर माहाराजांची स्वारी विंचुरास येऊन गेल्यानंतर दोन महिन्यांनीं त्यांस आपले नरसिंहपूर येथील कुलस्वामीचे सन्निध कांहीं कालपर्यंत क्षेत्रवास कर्ण्याची इच्छा उत्पन्न झाल्यावरून, सन १८८१ इसवीचे एप्रिल महिन्यांत ते विंचुराहून निघून पायमार्गानें होत्राचे अग्नीसह नरसिंहपुरास गेले. तेथें अग्न्यार्चन व श्री नरहरीचें पूजन करून कालक्षेप करीत असतां, सुमारें एक महिन्यानंतर म्हणजे मे महिन्यांत त्यांची पत्नी श्रीमंत सौभाग्यवती जानकीबाई साहेब यांची प्रकृती कफक्षयानें एकाएकीं बिघडून त्या आजारी पडल्या. त्यांस आराम व्हावा म्हणून रघुनाथरावअंणासाहेब यांनीं पुणें व पंढरपूर येथून चांगले प्रवीण वैद्य आणवून उत्तम प्रकारें औषधोपचार करविले; परंतु बाईसाहेब यांस बिलकुल आराम न होतां त्यांची प्रकृती दिवसानदिवस अधिकाधीक बिघडत जाऊन शेवटीं जूनमहिन्यांत त्या पुण्यश्लोक बाईस देवाज्ञा झाली. अंणासाहेब यांस त्या स्त्रीपासून पुत्रसंतान झालें नव्हतें. तत्रापि, बाईचें वय वृद्ध झालें नसल्याकारणानें अद्यापिही आपल्यास पुत्रसंतती होईल अशी त्यांस आशा वाटत होती. परंतु दुर्दैवेंकरून बाईचा देहांत झाल्यामुळें ती आशा भगदीं नष्ट होऊन त्यांचे प्रपंचास मोठा धक्का बसला. शिवाय, त्यांचें अग्निहोत्र ही विच्छिन्न झालें.

वर लिहिलेला विपरीतप्रकार घडल्यामुळें अंणासाहेब यांचे आप्तवर्ग, इष्टमित्र व पदरचे लोक यांस अत्यंत दुःख झालें. अं-

णासाहेब यांस किती दुःख झालें असेल त्याचा तर अजमासच करितां येत नाहीं. सारांष, बाईचा देहांत झाल्यावेळेपासून त्यांचें मन प्रपंचांतून अगदीं उठलें, आणि इतर कांहींच न करितां आपले संस्थानची वहिवाट आपले कनिष्ट बंधू माधवरावदादासाहेब यांचे स्वाधीन करावी, आणि क्षेत्रवास करून आपले आयुष्याचे शेष राहिलेले दिवस तेथें स्नानसंध्येंतच घालवावे असा त्यांनीं निश्चय केला. त्यावेळेपासून त्यांचें कायमचें राहाणें नरसिंहपूर येथेंच आहे. ते जरी कधीं कधीं कारणपरत्वें विंचुरास येतात तरी तेथें पंधरा दिवसांपेक्षां अधिक दिवस मुक्काम न करितां नरसिंहपुरास परत जातात.

रघुनाथराव यांचें मन प्रपंचांतून उठण्यास अणखी एक विशेष कारण झालें. त्या संबंधाची हकीकत आह्मी पुढें लिहितों.

सन १८१८ इसवी सालीं पेशव्यांचें राज्य नष्ट होऊन दक्षिणेंत कंपनी सरकारचा अंमल झाल्यावर नवीन काबीज केलेल्या मुलकांचा बंदोबस्त करण्याचा मुख्य अधिकार आनरेबल मौंटस्टुअर्ट एलफिस्टन्साहेब यांजकडे येऊन त्यांस "सोलकमिशनर" (ह्मणजे कुलकामगार) असें नांव प्राप्त झालें. या साहेबांनीं पेशव्यांचे दरोबस्त लष्करी सरदारांचे उत्पन्नांच्या चौकशा करून ठराव केले त्यावेळेस त्यांनीं विंचूरचे चीफ विठ्ठलरावतात्यासाहेब विंचूरकर [ रघुनाथराव यांचे वडील ] यांचे ही दरोबस्त उत्पन्नांची चौकशी करून त्यांचा सालिना अजमासें बारा लाख रुपयांचे आकाराचा दरोबस्त लष्करी सरंजाम लागलाच खालसा केला. परंतु त्या शिवाय त्यांचा सालिना आजमासें ५०००० रुपयांचे आकाराचा जात सरंजाम होता तो त्यांजकडे सदोदीत चालविण्याविषयीं सरजान मालकम् यांनीं पेशव्यांबरोबर चाललेलें युद्ध समाप्त होण्यापूर्वी त्यांस वचन दिलें असून तें त्यांनीं आपले तारीख ५ जून व तारीख २६ जूलई सन १८१८ इसवीचे पत्रांत आपल्यांस [ सोल कमीशनर यांस ] कळविलें होतें सबब तेव्हढा

मात्र त्यांचे घराण्याचे गुजाऱ्याकरितां त्यांजकडे वंशपरंपरेनें चालवावा असा त्यांनीं ठराव करून त्यांचे ( विठ्ठलरावतात्यासाहेब यांचे ] ताब्यांत दिला; आणि सन १८१९ इसवी सालीं त्यांनीं [ सोल कमीशनर यांनीं ] इंडियाचे गव्हरनर जनरल यांस एकंदर सरंजामपट पाठविला त्यांत विंचूरकर मौसूफ यांचे नांवाचे पत्रकांतील शेवटचे कोष्टकांत त्यांचा सरंजाम वंशपरंपरेनें चालवयाचा असा शेरा लिहिला. सदर्हू एकंदर सरंजामपट गव्हरनर जनरल यांनीं मंजूर केल्यावरून सोलकमीशनर यांनीं सदर्हू सरंजाम वंशपरंपरेनें चालविण्याचे बाबदींत केलेला ठराव कायम झाला. आनरेबल मौंटस्टुअर्ट एलफिन्स्टनसाहेब हे दक्षिणेंत इंग्रज सरकारचे राज्याचा मजबूत पाया घालणारे असून सदर्हू बंदोबस्ताचे कामीं पूर्ण अधिकारी होते आणि त्यांस पेशव्यांचे प्रत्येक पिढीजादे सरदाराचे योग्यतेची पुरी माहितगारी होती याकारणानें त्यांनीं जे ठराव केले ते आखेरचे आहेत असें पुढील अधिकारी मानू लागले. सबब त्यासाहेबांनीं विंचूरकर यांचे जातसरंजामाचे बाबदींत जो ठराव पूर्ण माहितीनें व विचारपूर्वक केला होता त्याबद्दल पुनः चौकशी करण्याचें कारण राहिलें नव्हतें. तथापि पुढें अठरा वीस वर्षांनीं कंपनी सरकारची मुळची राज्यरिती बदलली असें दिसतें, कारण आनरेबल एलफिन्स्टनसाहेब यांनीं अव्वल इंग्रजीस जे ठराव केले होते त्यामुळें दक्षिणेंतील सरदार लोकांचें हातांत पुष्कळ मुलुक राहिला होता असें त्या सरकारचे मुख्य अधिकारी यांस वाटल्यावरून त्यांनीं सन १८३८ इसवी सालीं आनरेबल एलफिन्स्टनसाहेब यांजपासून पुढें लिहिल्याप्रमाणें लेख लिहून घेतला.

" दिल्लीचे बादशाहा व सातारचे राजे यांनीं प्रत्यक्ष दिलेले किंवा मंजूर केलेले सरंजाम मात्र वंशपरंपरेनें चालवावे. बाकी जे सरंजाम इतर अधिकाऱ्यांनीं म्हणजे पेशवे वगैरेनीं दिले असतील ते सरकारचे मर्जी प्रमाणें चालवावे. "

यावरून असें दिसतें कीं आनरेबल मिस्तर एलफिन्स्टनसाहेब यांनीं पुर्वीं सन १८१८ इसवी सालीं दक्षिणेंतील सरंजामांचे बाबदीत ठराव केले होते ते केवळ त्या प्रांतांतील सरदार लोकांचीं मनें तूर्त संतुष्ट करण्यास्तव केलेले असून पुढें फिरविले जाण्यास पात्र होते किंवा कंपनीं सरकारचे लंडन शहरांतील मुख्य कोर्टानें तो लेख एलफिन्स्टन साहेबांपासून सक्तीनें लिहून घेतला असावा किंवा आतां आपण स्वदेशास आलों तेव्हां आपल्यास दक्षिणेंतील सरदारांची काय जरूर आहे ? असें त्या साहेबांस वाटून त्यांनीं तो दिला असावा.

एलफिन्स्टन साहेबांस आपले आयुष्याचे शेंवटचे दिवसांत तो लेख लिहून देण्यास वरलिहिलेलींच कारणें झालीं असतील किंवा इतर झालीं असतील तें बरोबर कळत नाहीं; पण त्या लेखामुळें पुढें दक्षिणेंतील शेंकडों सरदार लोकांचीं नुकसानें झालीं एवढें मात्र ढळढळीत दिसत आहे.

पुढें सन १८४२ इसवी सालीं कंपनी सरकारचे वर लिहिलेले मुख्य अधिकाऱ्यांनीं सदरहू सरंजामांच्या चौकशा करण्यास्तव तीन मुख्य रूल ( कानू ) मुंबई सरकाराकडे पाठवून दिले, ते त्या सरकारानें पुणें येथील त्यावेळचे आपले एजेंट मिस्तर जान वार्डन यांजकडे अमलांत आणण्यास्तव रवाना केले.

सदरहू तीन कानूंतील शर्ती येणेंप्रमाणें:—

१ सन १७५० इसवी सालीं सातारचे शेवटचे राजे शाहूमाहाराज यांचा देहांत झाल्यावर दक्षिणेंत बाळाजी बाजीराव पेशवे हे मुख्य राज्याधिकारी झाले सबब सन १७५१ इसवी साला पूर्वीं दिलेले सरंजाम लष्करी नसतील तर तेव्हडे मात्र वंशपरंपरेनें चालवावें.

२ सन १७५१ इसवी सालापासून सन १७९६ इ० पावेतों म्हणजे माधवराव नारायण पेशवे यांचे अंतकाळापर्यंत जे सरंजाम देण्यांत आले ते अडीच पुस्त चालवावे म्हणजे दोन पुस्त

चालवून तिसरे पुस्ताचे पुरुषास त्याचे वडिलार्जित सरंजामाचे वार्षिक उत्पन्नाचे निम्मे आकारा इतकें पेनशन ताहयात करून द्यावें.

३ सन १७९६ इसवीपासून सन १८१८ इ० पर्यंत जे सरंजाम देण्यांत आले ते म्हणजे शेवटचे पेशवे बाजीराव रघुनाथ यांनीं दिलेले सरंजाम दीड पुस्त चालवावे, म्हणजे ते पहिल्या पुस्ताचे पुरुषास चालवून दुसऱ्या पुस्ताचे पुरुषास त्या सरंजामाचे निम्मे आकारा इतके पेनशन ताहायत करून द्यावें.

हे रूल ( कानू ) करण्यास कंपनी सरकारचे मर्जी शिवाय किंवा आनरेबल मिस्तर एलफिन्स्टन साहेबांचे वर लिहिलेले लेखा शिवाय दुसरा कोणताच आधार दिसत नाहीं, कारण, जो राज्याधिकारी कोणती एकादी देहेनगी देतो ती तो आपले राज्याचा कुलमालिक असतां त्यानें दिली असली तर ती पुढील राज्याधिकाऱ्यानें पूर्ववत चालविणें यथान्याय आहेः ती एक किंवा दोन किंवा अडीच पुस्त चालविण्याचा नियम करून देण्यास पुढील राज्याधिकाऱ्याची मर्जी किंवा त्यानें मनमानेल तसा केलेला कानू यांशिवाय दुसरा आधार दिसत नाहीं. परंतु पेशव्यांचे पदरचे लष्करी सरदार हाल्लीं इंग्रज सरकारची रयत झालें आहेत सबब इंग्रज लोकांनीं केलेले कायदे व कानू कसेही असले तरी, राजानें मारिलें व पावसानें भिजविलें याची दाद सर्व शक्तीमान जगनियंत्या शिवाय कोणापाशींही लागावयाची नाहीं अशी वृद्धांची ह्मण आहे, ती सत्य मानून आपली स्थिती सुधारण्याविषयीं अनंन्यभावेंकरून त्या नियंत्याचीच प्रार्थना करीत असावें एवढा मात्र तरणोपाय दिसतो तो सर्वांनी करून स्वस्थ बसावें. असो.

वर लिहिलेल्या रूलांचे ( कानूंचे ) आधारानें पुढें एजेंटमौसूफ यानीं सदर्हू सरंजामांबद्दल चौकशा केल्या आणि एक सरंजामपट तयार करून तो मुंबई सरकाराकडे पाठवून दिला. हा सरंजामपट कंपनी सरकारचे लंडन शहरांतील मुख्य कोर्टानें ना-

पसंद केल्यावरून त्याबद्दल पुनः पुनः चौकशा झाल्या. रघुनाथराव यांजकडे जो जात सरंजाम हाल्लीं चालत आहे तो सदोदित चालविण्याविषयीं पूर्वीं सरजान मालकम् यांचे वचन मिळालें असून मुख्यत्वेंकरून त्याच वचनाचे आधारानें तो वंशपरंपरेनें चालवावा ह्मणोन आनरेबल मौंटस्टुअर्ट एलफिनस्टनसाहेब यांनीं ठराव केलाहोता सबब त्या संबंधाचे दरोबस्त कागदपत्र मुंबई सरकाराकडून सन १८४९ इ० सालीं कंपनी सरकारचे वर लिहिलेले मुख्य कोर्टापुढें गेले. ते पाहिल्यावर तो दरोबस्त सरंजाम सदोदीत चालविण्याजोगा असण्याविषयीं त्या कोर्टाची खात्री झाली. ( त्या कोर्टाकडून मुंबई सरकारास तारीख२९माहे मे सन १८४९इसवीचें पत्र आलें तें पाहावें. ) तत्रापि, सरजान् मालकम् यांचे वचनाची शाबिती कर्ण्याचा बोझ्या त्या कोर्टानें रघुनाथराव यांचे शिरावर ठेविला. [ सदर्हू वचन सरजान मालकम् यांनीं वर लिहिल्याप्रमाणें विठ्ठलरावतात्यासाहेब ( रघुनाथराव यांचे वडील ) यांस तोंडीं देऊन फक्त आनरेबल मौंटस्टुअर्ट एलफिनस्टन यांस आपले तारीख ५ माहे जून व तारीख २६ जुलई सन १८१८ इसवीचे पत्रांनीं कळविले होतें. ] पैकीं तारीख २६ जुलईचे पत्रांत त्या साहेबांनीं एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, " मी विंचूरकर यांस जें वचन दिलें तें माझे मत्तें लेखीं वचना इतकें मजबूत असून लेखीं वचनाप्रमाणेंच इंग्रजसरकारचा विश्वास गुंतविणारें आहे असे मला मानणे भाग आहे. " त्याच पत्रांत दुसरे ठिकाणीं असें लिहिलें आहे की, " पेशवे शरण आल्यावर ही त्यांचे मदतीची गरज नाहीशी झाली नाहीं. पेशव्यांचे फौजेची दाणादाण करण्यास व त्यांचे बदललेले स्थितीस त्यांचे मन राजी करण्यास त्यांची [ विंचूरकर यांची ] मदत अवश्य पाहिजेहोती व ती त्यांनीं हमेषा मोकळे मनानें दिली. "

सदर्हू वचनाची शाबिती कर्ण्यास सरकारचे रिकार्डांतील दाखल्यांशिवाय दुसरें कांहींच साधन नव्हतें सबब ती शाबिती कर्णे

त्यावेळेस रघुनाथराव यांजकडून घडलें नाहीं. सबब इंग्रज सरकारचे मेहेरबानगीचें एककृत्य म्हणून सदर्हू जातसरंजाम रघुनाथराव यांचे ताहयात चालवून त्यांचे पश्चात त्याचा निम्मे भाग त्यांचे वारिसाकडे चालवावा ह्मणून त्या कोर्टानें सन १८५२ इसवी साली ठराव करून तो मुंबई सरकारास लिहून कळविला व त्या सरकारानें आपले पुणे येथील एजेंटाचे मार्फत रघुनाथराव यांस त्या ठरावाची समज दिली.

पुढें रघुनाथराव यांनीं सदर्हू वचनाची शाबिती करण्यास जो पुरावा पाहिजे होता तो मिळविण्याचा उद्योग चालविला. शेवटीं सन १८५६ इसवी सालीं पुणें येथील त्यावेळचे एजेंट मिस्तर लिजेट यांस त्यांनीं तोंडी विनंती करून सरकारचें इंग्रजी दफ्तर पाहाण्याची परवानगी मिळविली. नंतर त्यांनीं इंग्रजी जाणणाऱ्या एका मनुष्याकडून कितीएक दिवस त्या दफ्तरांतील कांहीं कागद वाचून पाहविले. शेवटी त्यांस सदर्हू सरंजामासंबंधीं कांहीं कागद आढळले, त्यांत सरंजान मालकम् यांची वर लिहिलेलीं दोनपत्रें व आनरेबल मिस्तर एलफिन्स्टन यांचे सरंजामपटांतील सदर्हू सरंजामापुर्ता दाखला वगैरे दाखले होते. त्या दाखल्यांच्या नकला सहीनिशीं आपल्यास देण्याविषयीं रघुनाथराव यांनी एजेंटमौसूफ यांस विनंती केली; परंतु त्यांनीं ती नाकबूल करून बिनसहीच्या नकला करून घेण्याची मात्र परवानगी दिली. त्या प्रमाणें रघुनाथराव यांनीं त्या नकला घेतल्यामुळें त्यांजपाशीं सदर्हू वचनाची शाबिती करण्यापुर्ता मजबूत पुरावा झाला.

कंपनीचें हिंदुस्थानांतील राज्य मलिकामाआझमा यांचे कबजांत जाण्या पूर्वी कोणते हीराजास किंवा संस्थानिकास आपले राज्याचा किंवा संस्थानाचा वारिस कर्ण्यास्तव दत्तक घेण्याची परवानगी देऊनये आसा कंपनीसरकारानें एक नियमकरून ठेविलाहोता. त्यामुळें उत्तर हिंदुस्थानांत झाशी व जालवण आणि दक्षिणेंत सातारा बनागपूर येथीलराज्यें व पटवर्धन यांची कांहीं संस्थानें व त्याच

प्रमाणें कित्येक जाहागिरी रघुनाथराव यांच्या डोळ्यासमूर-खालसाझाल्या शिवाय इनाम कमिशनर यांचे ठरावा मुळें पुर्वी बहुत दिवस चाललेलीं कित्येक इनामे सुध्दां तेडे वारसांचे हरकती मुळें खालसा झाल्यानें संपूर्ण दाक्षिणभर मोठा गवगवा झाला होता. तो बिकट प्रसंग व त्यावेळचे राजनितीची चालू स्थिती पाहून रघुनाथराव यांचे अंतःकर्ण अगदीं चकीत झालें, आणि त्यांस असें वाटूं लागलें कीं कदाचित दुर्दैवेंकरून आपल्यास पुत्रसंतती न झालीतर आपलें संस्थान कंपनी सरकार खचीतच खालसा करील. त्यावेळेस त्यांचे वयास ३३वें वर्ष असून त्यांची संतान होण्याची उमेद खचलीनव्हती. तथापिही त्यांनीं फार दूर दृष्टी पोंहोंचवून, आपल्यास पुत्र न होतां कदाचित आपला देहांत झाला तर आपलें संस्थान आपले कनिष्ट बंधूचे पुत्रसंततीकडे वंशपरंपरेनें चालवावें म्हणून त्यांनीं सन १८५५ इसवीं सालीं मुंबई सरकारास अर्ज केला. त्याजवर इनाम कमिटींत पत्रव्यवहार होऊन शेवटीं कंपनी सरकारचे वरलिहिलेले मुख्य कोर्टाचे मंजुरीनें त्यांचे विनंती प्रमाणें करण्याविषयीं ठराव झाला. पुढें सन १८५७ इसवीं सालीं उत्तर हिंदुस्थानांत लष्करी दंगा माजला, त्यामुळें अशा प्रकारचे सर्व व्यवहार, म्हणजे निपुत्रीक संस्थानिकांचीं संस्थानें व जाहागिरी खालसा करण्याचा क्रम बंद पडला. पुढें सन १८५९ इसवीचे आखेरीस मलिकामाअझमा यांनीं कंपनी सरकारचे हिंदुस्थानांतील राज्याचा कबज्या घेतल्यावर सन १८६१ इसवी सालीं हिंदुस्थानचे त्या वेळचे गव्हरनर जनरल लार्ड क्यानिंग यांचे सिफारिषी वरून हिंदुस्थानांतील दरोबस्त नेटीव राजे व संस्थानिक यांस आपले शास्त्रा प्रमाणें आपलीं राज्यें व संस्थानें यांकरितां दत्तक घेण्याच्या एकदम सनदा करूनद्याव्या असा मलिकामाअझमा यांचे सरकारानें एकसां हुकूम सादर केला. त्या हुकुमा बरहुकूम आपल्यास दत्तक घेण्यास हरकत राहिली नाहीं असें रघुनाथराव यांस वाटून सन १८५६ इसवीं सालीं मिळविलेल्या

पुराव्याचे आधारानें प्रथम आपला दरोबस्त सरंजाम आपल्याकडे वंशपरंपरेनें चालविण्याविषयीं रघुनाथराव यांनीं सन १८६५ इसवी सालीं मलिकामाअझ्मा यांचे सरकारचे मुख्य सेक्रेटरी यांस अर्ज केला; परंतु पूर्वीं सन १८५२ इसवी सालीं माजी कंपनी सरकारचे वर लिहिलेल्या कोर्टानें त्यांचा फक्त निम्मेच सरंजाम वंशपरंपरेनें चालविण्याविषयीं ठराव करून त्या प्रकरणाचा निकाल लावीला होता, सबब त्या प्रकरणाची पुनः चौकशी करण्याचें कारण नाहीं असें त्या थोर अधिकाऱ्यास वाटून त्यानें तो त्यांचा अर्ज नामंजूर केला.

तथापि रघुनाथराव यांनीं आपले विनंतीस अधीक मजबूती येण्यास्तव सन १८५६ इसवी सालीं मिळविलेल्या पुराव्या खेरीज सन १८७३ इसवी सालीं अणखी दस्ताऐवजी पुरावा मिळविला. हा पुरावा सन १७५० इसवी सालीं त्यांचे निपणजे व सदर्हू सरंजामाचे मुळ संपादक विठ्ठल शिवदेव यांचे हातांत सालिना सुमारें ऐंशी हजार रुपयांचे उत्पन्नाचा मुलुक असून शिवाय त्या सालीं त्यांस स्वतःचे वार्षिक तैनातीबद्दल पन्नास हजार रुपये मिळाळे असें दाखविणारा होता. तों पर्यंत ही रघुनाथराव यांस पुत्रसंतान झालें नाहीं. आणि त्या पुढें ही नझालें तर त्यांचें देहांतानंतर त्यांचें संस्थान व त्यांचें नांव चालविण्यास त्याचे देहाचा सिधा वारिस म्हणून कोणीच राहाणार नाहीं. याकरितां आपले उभयतां बंधूंचे पुत्रां पैकीं एक पुत्र सरकारचे परवानगीनें दत्तक घेऊन त्याचे नावानें आपलें सांप्रतचें दरोबस्त संस्थान आपले पश्चात वंशपरंपरेनें चालेल असा बंदोबस्त आपले हयातींत करून ठेवणें हें त्यांचे जन्मांतील शेवटचें कर्तव्यकर्म होतें. सबब त्यांनीं तारीख १७ माहे डिसेंबर सन १८७७ इसवी रोजीं मालिकामाआझमा यांचे सरकारचे हिंदुस्थानाबद्दलचे मुख्य सेक्रेटरी यांस मुंबई सरकारचे मार्फत तफसीलवार अर्ज करून त्यांत आपल्यास दत्तक घेण्यास्तव सनद मिळावी आणि

जो दत्तक आपण घेतील त्याजकडे आपला सांप्रतचा दरोबस्त सरंजाम वंशपरंपरेनें चालवावा अशा दोन विनंत्या केल्या. हा अर्ज तफसीलवार होता यामुळें त्यांत वर लिहिलेला दरोबस्त पुरावा दाखल केलेला असून पेशवाई अमलांत त्यांचे ( रघुनाथ राव यांचे ) पुर्वज किती थोरपदवीचे लष्करी सरदार होते व त्यांनीं काय पराक्रम केले होते व इंग्रज सरकारचे जनरल त्यांस किती मानीतहोते हें दाखविण्यास्तव इंग्रज कामगारांचे पत्रव्य-वहारांतील अनेक उतारे व त्याचप्रमाणें आपले घराण्याचा संक्षिप्त इतिहास येणेंप्रमाणें विचाराकरितां विनयपूर्वक पुढें केलेलें होतें. या शिवाय रघुनाथराव यांनीं रावबाहादूर गोपाळरावहरीदे-शमुख यांचे मार्फत आपले कनिष्ट बंधू कृष्णरावबापुसाहेब यांस असें कळविलें कीं, " मला जो दत्तक घ्यावयाचाआहे तो मीं तुमचे पुत्रां पैकींच घेईन, याकरितां सांप्रतचें दरोबस्त संस्थान पुढें वंशपरंपरेनें चालण्यास्तव मीं जो उद्योग चालविला आहे त्यांत तुम्हीं माझे विरुद्ध वर्तन करूंनये, कारण, तसें तुम्हीं वर्तन करण्यासारिखें मी पूर्वी तुम्हां बरोबर वर्तन केलेंनाहीं. तुम्ही उभयतां बधूंनीं इतकेंच करावें कीं मीं केलेल्या अर्जाबद्दल आपली राजीरजामंदी सरकारास कळवावी. हें नहोईल तर माझे अर्जावर तक्रारअर्ज तरी करूंनका. " परंतु रघुनाथराव यांच्यावर लिहिलेल्या म्हणण्याकडे कृष्णरावबापूसाहेब यानीं बिलकूल लक्ष न देतां आपले कनिष्ट बंधू माधवरावदादासाहेब यांस आपले घेतांत सामील करून घेतलें. नंतर लौकरच उभयतां बंधूनीं सन १८७८ इसवीचे फेब्रुआरी महिन्यांत रघुनाथराव यांचे वरलिहिलेले अर्जावर तक्रारअर्ज सरकाराकडे गुजरा-विला. त्यांत मुख्य विनंती अशीहोती कीं, आम्हांउभयतां अर्ज दारांचे वंशाकडे हाल्लींचे संरजामाचा निम्मे भाग चालविण्या विषयीं सन १८६६ इसवी सालीं जो ठराव झालाआहे त्यांत फेरफार होऊंनये. असें वर्तन करणें उभयतां बंधूंस अगदीं

अनुचित होते, कारण, सुदैवें करून दरोबस्त सरंजाम चालविण्याविषयीं ठराव झालाअसतातर विंचूरसंस्थानांतील सर्व लोकांचें, विशेषेंकरून उभयतां तक्रारअर्जकरणाऱ्याबंधूंचे निःसंशय हीत झालें असतें. या उभयतां बधूंनीं सन १८४५ इसवी सालापासून हरएक विशेषप्रसंगीं आपले वडीलबंधू व विंचूरसंस्थानेचे मालिक यांचे इच्छेनुसारच वर्तन केल्याचीं उदाहरणे आढळतात. असेंअसतां, यामहत्प्रसंगीं त्यांजकडून त्यांचे इच्छेविरुद्ध वर्तन झालें हें त्या संस्थानांतील सर्व लोकांचें दुर्दैवच होय असें ह्मणण्यास हरकत दिसतनाहीं. शेवटीं, उभयतांबंधूंचे तक्रारअर्जामुळें किंवा दुसरेकांहीं कारणामुळें, मलिकामाआझमा यांचे सरकारानें, रघुनाथराव यांनीं आपले तारीख १७ माहे डिसेंबर सन १८७७ इसवीचे अर्जांत दाखल केलेल्या दस्ताऐवजी पुराव्याकडे लक्ष नपुरवितां पूर्वीं सन १८६६ इसवी सालीं झालेला ठराव आखेरचाआहे असा त्या अर्जाचा जबाब मुंबई सरकाराकडे पाठविला आणि मुंबई सरकारानें तो आपले ताब्यांतील मध्यभागाचे कमिशनर यांचेमार्फत त्यांस सन १८७९ इसवीचे जुलई महिन्यांत कळविला. त्यामुळें आपण इतके झटून केलेले सर्व परिश्रम निर्फल होऊन आपलें संस्थान पुढें आपले देहाचे वारिसाकडे नचालतां आपले देहांताबरोबर सरकार त्यांचानिम्मेभाग अन्यायानें खालसा करणार असें त्यांस वाटलें; आणि त्यावाटण्यांत प्रपंच्यांतील नाउमेदीचीं इतरकारणें हीं सामील झालीं असतां, प्रापंच्यांत बिलकूल सुख नसून तो सर्व दुःखाचें कारण आहे असें त्यांचे मनांत पक्कें ठसलें.

याप्रमाणें आम्ही यथामती विंचूरकर यांचे घराण्याचा इतिहास तयारकरून सांप्रतकाळापर्यंत आणून पोंहोंचविला आहे. हा पुराकरण्यांत आह्मी आपल्या तर्फेनें याघराण्याकरितां दोन ओळी पुढें लिहितों.

पेशवाई अमलांत हें घराणें पुरातन सरदारलोकांचे घराण्यांमध्यें मोठें नामांकित असून याचें एकंदर वार्षीक उत्पन्न सरासरी वीस लाख रुपयां इतकें होतें आणि याचे हाताखालचे स्वारांची कायमची संख्या पांचहजारां पेक्षां कमी नव्हती. असेंअसतां या जगांतील इतर क्षणभंगुर गोष्टींप्रमाणें कालक्रमेंकरून याचे मुख्याचे हाताखालची दरोबस्त फौज गेली व त्यामानानें याचें उत्पन्न ही कमी होऊन हाल्लीं सालीना सरासरी साठ हजार रुपयांचें राहिलें आहे. * तेव्हडयानें सुद्धां याघराण्याच्या मुळच्या महत्वाचें कांहींसें चिन्ह राहिलें आहे; परंतु याघराण्याचे सांप्रतचे चीफ ( मुख्य मालिक ) रघुनाथरावअंणासाहेब यांचे पश्चात या घराण्याचा निम्मे भाग सरकारखालसा करून बाकीचा निम्मेभाग मात्र पुढें वंशपरंपरेनें चालवावा असा केसरे-हिंद यांचे सरकारानें पूर्वींच ठराव करूनठेविलाआहे. शिवाय, पुढें चालणाऱ्या निम्मे भागाच्या सरंजामांत ही दोन वांटण्या होणार आहेत असें कळून येतें. असें झालें असतां संस्थान ह्मणून मुळींच न राहातां जसे कोणी सामान्य किरकोळ जाहागीरदार असतात तद्वत सांप्रतचे चिफांचे कायममुकाम रहातील आणि या घराण्याचे मुळचे ऐश्वर्याची छाया सुद्धां राहाणार नाहीं ही मोठे दुर्दैवाची व दुःखदायक गोष्ट होईल. याकरितां सर्वशक्तिमान परमेश्वरापाशीं आमची अंतःकरण पूर्वक अशी प्रार्थना आहे कीं या घराण्याचे सांप्रतचे चीफ रघुनाथरावअंण्णासाहेब यांचे आयुष्याचीं पूरीं शत वर्षें भरत तों पर्यंत यांचें सर्वप्रकारें रक्षण करावें. असें झालें असतां, किमानपक्ष आमचे, विशेषेंकरून सांप्रतचे पिढीचे डोळ्यां देखत तरी या घराण्याचें सांप्रतचें ऐश्वर्य कायम राहील. ईश्वर करो आणि असें होवो म्हणजे सर्व झालें !

---

* हें उत्पन्न सरासरी मुळच्या सरंजामाच्या बत्तीसाव्या अंशाबरोबर आहे.

# परिशिष्ट ( क )

सन १७८३ इसवी सालीं माहादजी शिंदे यांनीं दिल्लीचे बादशाहा यांजकडून पेशवे माधवरावनारायण यांस पत्र आणिलें त्यांत पेशवे यांस खिताब लिहिला होता तो येणें प्रमाणें:—

अमारत् व अयालत् मर्तबत् हषमत् व पौकत् मंजिलत् जुबदय रफी उस् षान दौलत्ख्वाह उमदयखैर अंदषान बिला इष्तिबाह कसीरुलइक्तिदार अकीदत् दिसार सइफे मस्लुले मैदान षुजाअत उमदे मसकुले मिजमारे जलादत मदार असनाफ् अवताफ् मोहोब्बत् अन्वाये अल्ताफ् मवरदे इनायत जिल्ले मष्मूल अत्रातिफ जमील वकिलेमुतलक आमीर–उल–उमरा मुखतार–उल्–मुमालिक् मदार उल-मोहाम सलतनत् उमदय आराकिन खिलाफत् यार वफादार सिदङ इखलास सआदतमंद व जानपयवंद फरजंदे खास-उल्-खास मुरव्वज माहाराजाधिराज पंडितपरधान सवाईमाधवराव नारायण बाहादूर फिद्दीय षाहआलम् बादषाहे गाजी.

## सदर्हूचा मराठींत तरजमा.

मानपात्रता व संपत्ती यांचे अधिकारी; सेना व संपत्ती यांचें स्थान; मित्रतेचे चिन्हानें चिन्हितांतील केवळसार; राज्याभिष्ट चिंतक; निःसंशयपणें कल्याण इच्छकांतील अतिउत्तम; विश्वास वृद्धिकारक; भरवशाचेंचिन्हआहेज्यांस; रणभूमींतील केवल नग्न तलवार; रणकंदनांतील माहाशूरत्वाचे केवल तीक्ष्णधारेचा भालाच; माहाश्रेष्ट; परमविश्वासू; स्नेहभावाचे सुलक्षणाचा आसमंतात् भाग; नानाप्रकारचे कृपापात्र; सर्व कृपा उतरण्याचें स्थान; कृपेचे छायेनें वेष्टित; अतिसर्वोत्तम.

स्वतंत्र कामचालविणारे; सर्वअमिरांचेअमीर; ( सर्व वडेलोकांत प्रमुख ) सर्व देशाचा स्वसत्तात्मकपणें कार-

भारचालविणारे, दौलतिचे सर्व कामांचा भरंवसा आहे ज्यांजवर, राज्याधाराचे केवळ स्तंभच, अशा सर्व कारभारी मंडळीतील अति सर्वोत्तम; स्नेहभाव सिद्धीस नेणारे सुमित्र; सेनापती सुदैववान; व जिवास जीव देणार; सरकारचे केवळ सुनिश्चित पुत्रच; असे जे माहाराजाधिराज सवाईमाधवराव पंडीत प्रधान बाहादूर हे षाहआलम बादषाहा महान्वीर याचे ताबेदार.

---

या खिताबाशिवाय पेशवे माधवराव यांस खिल्लत (पोषाक) आली त्यांतील पाच्यें (वस्त्रें) येणेंप्रमाणें:—

१ दस्तार. (पागोटें)
१ निमास्तिन (अर्ध्या अस्तिण्यांची बंडी.)
१ चीरां.
१ कंबरबंद. (कंबरपटका)
१ दुशाला. (शालजोडी.)

१ जामा. (पायजमा)
१ चारकुबा.
१ बाकबंद.
१ दुमटा.
१ झगा.

## हात्यारें वगैरे.

१ षमसेर. (तरवार)
१ ढाल.
१ कलमदान.
१ शिक्केदउत.

१ मोर्च्येल जोडी.
१ हत्ती.
१ घोडा.
१ नालकी.
१ पालखी.

## जवाहीर दागिने.

१ मोत्यांचीमाळ पदकसुद्धां.

१ शिरपेंच.
१ कलगी.

---

माहादजी शिंदे यांस खिताब मिळालातो;—राजे माहादजी शिंदे, मदार–उल–मोहाम (सर्व कामात भरंवशाचे.)

शिवाय, वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडा, माहीमरातब, नाळकी आणि पालखी. येणेंप्रमाणें त्यांस मिळालें.

वरलिहिलेली बादशाही देहेनगी पेशवे यांनीं स्विकारूंनये असें कित्येक मुत्सद्दी मंडळींचें मत होतें; परंतु सातारचे माहाराज ( ज्यांस रामराजे असें लोक म्हणत होते ) त्यांची परवानगी आणवून नंतर पेशवे यांनीं दरबार करून त्यांत ती दरोबस्त देहेनगी मोठ्या समारंभानें स्विकारिली.

नंतर माहादजी शिंदे यांनीं आपल्यास बादशाहाकडून मिळालेली देहेनगी पेशवे यांचे आज्ञेवरून स्विकारिली. नंतर ते पालखींत बसून आपले छावणीस गेले.



# परिशिष्ट (ख)

## विंचूर संस्थानचें एकंदर वार्षिक उत्पन्न वगैरे दाखविणारा तखता.

| गांवांचें नांव. | रकबा जमीन. | कमाल आकार. | तनखा बेरीज. | वसली आकार. |
|---|---|---|---|---|
| | बिघे. पांड. काठ्या. | रुपये. आणे. पै. | रु. आ. पै. | रु. आ. पै. |
| **इनामीगांव** (नाशिक जिल्ह्यांत.) | | | | |
| कसबें विंचूर | १३१९० ५ | १४२७४ ५ ६ | ८००१ | ७४७६ ४ ६ |
| मौजे सायखेडें | ३१९४ २ ३ | २९१९ ११ ११ | २०४७ ८ | २५०३ २ ३ |
| | १६३८४ ७ ३ | १७१९४ २ ५ | १००४८ ८ | ९९८९ ६ ९ |
| **सरंजामी गांव.** (नाशिक जिल्ह्यांत.) | | | | |
| मौजे टाकळी. | ६००१ ७ २॥ | ५८०७ ५ ३ | ४०१२ ६ | ३६७३ १ १० |
| कोटमगांव नजीक. | ३५१५ १९ १० | २८८२ ३ १ | १९९५ | १९६२ १२ ४ |
| निंबगांव वांकडा. | २४०९ | २२२६ | ९८७ ९ | १३७२ १० २ |
| पींपळगांव नजीक. | १४६४ ५ १८ | १०५८ | ७०७ ८ ६ | ९७२ २ |

| | बि. पा. का. | रु. आ. पै. | रु. आ. पै. | रु. आ. पैं. |
|---|---|---|---|---|
| मनमाड. | ६६९२॰१॰६॥ | ३६८९॰११॰९ | २३३८॰१३ | ४२१९८॰१ |
| दहीगांव. | १५१९॰८ | ७३२॰७ | ४१८॰१२॰९ | ५७१ |
| कोंकण खेडें | २०४० | १०७७॰१२ | ८५८॰१० | ८००॰५ |
| दरेगांव. | १३५५ | ८५७॰८ | ७५९॰४ | ८३८॰५॰३ |
| मेसनखेडें. | ११५२॰१५ | ३७०॰१२ | २९१॰३॰३ | २३३॰१ |
| वाद. | ७१० | ३४८ | ३०७॰॰६ | २९८॰६॰६ |
| डोणगांव. | ९२८ | ४०१॰१२॰५ | ३५४॰१॰६ | ३६६॰११॰९ |
| डोंगरगांव. | ९६० | ४३९ | ३३४॰८॰६ | ४४२॰६ |
| गंगावें. | ९२०॰५ | ९८६ | ७१४॰८ | ७१३॰८ |
| धोडंबें. | ३३६० | २२९६॰२ | १८०० | १७१५॰१॰८ |
| पाटोदें. | ४८०० | ४८३६ | २५०५॰११॰६ | २२१५॰४॰११ |
| वळदगांव. | १५७० | १२०२॰१२॰९ | ७३८॰११॰६ | १०००॰१ |
| पींपळगांवलेप. | ३६१५ | ३३६८ | १९२३॰३ | २७६३॰१२॰१० |
| आडगांवरेपाळ. | २४५९ | २३०५ | ७४१॰६॰६ | १६०८॰७॰७ |
| सातारें. | १२०० | ११३४ | ६६२॰१०॰६ | ८९९॰१२ |
| वाभुळगांव बुजुर्ग. | १९२० | ९६९ | ५७४॰१५॰३ | ८३२ |
| वाभुळगांव खुर्द. | १८०० | १३१६॰२ | ६८१॰१३ | [illegible] |

